# जीवितकर्तव्य

अथवा

## संसारकर्तव्य




हा ग्रंथ

दा राइट ऑनरेबल लॉर्ड ए...

एफ्. आर. एस्., डी. सी. एल्., एल्एल्. डी.

( जे आजपर्यंत सर जॉन लबक् म्हणून विश्रुत होते.

ह्यांच्या

"The Use of Life" ह्या ग्रंथाधारें

**दत्तात्रेय नारायण नाबर, बी.ए., एल्एल्.बी.**

ह्यांनीं लिहिला.

---

प्रकाशक

**बळवंत गणेश दाभोळकर**

---


पुणें

शकवर्ष १८२३—इ० सन १९०१.

## प्रस्तुत ग्रंथाच्या किंमतीची सवड

ह्या ग्रंथ पाहण्यांत आल्यावर पुष्कळांस घ्यावासा वाटणार आहे. सबब जून महिना अखेरपर्यंत १॥ रुपया किंमतीस देण्यांत येईल. पुढें किंमत रुपये दोन पडेल. आमच्या ग्रंथांच्या कायमच्या आश्रयदात्यांनीं आपले स्नेह्यांस शिफारस केली असतां त्यांस सदहु मुदतींत कायमच्या वर्गणीदारांच्या दरानें पुस्तकें देऊं.

नारायण पेठ, घर नंबर १०१, पुणें सिटी. } **बळवंत गणेश दाभोळकर.** प्रकाशक.

छापत आहे.

# गेलीं ६४ वर्षें

अर्थात्

# राणीच्या कारकीर्दीतील सार्वभौम इंग्लिश राज्याचा सविस्तर इतिहास

परम भाग्यशाली **महाराणी व्हिक्टोरिआ** ह्या सिंहासनारूढ झाल्या तेव्हांपासून त्या परलोकवासी झाल्या तेथपर्यंत (इ० सन १८३७ ते १९०१ पर्यंत) इंग्लंडच्या राज्यासंबंधी जगावर झालेल्या महत्त्वाच्या उलाढालींचा ह्या ग्रंथांत इतिहास आहे. ग्रंथकार **नारायण लक्ष्मण फडके, बी. ए.** हे प्रसिद्धच आहेत. त्यांनीं **जस्टिन् मॅकार्थी** ह्या प्रसिद्ध इतिहासकाराच्या अनेक हृदयंगम ग्रंथांच्या आधारानें ह्या ग्रंथ लिहिला आहे. विषय शास्त्रीय नसल्यामुळें दुर्बोध असण्याचें किंवा त्यांत डोकें घालून बसण्याचें

कारण नाहीं. इतकेंच नाहीं, तर रा० फडके ह्यांनीं हा इतिहास फार चटकदार व मनोरंजक भाषेनें लिहिला आहे, व तो शिकले-ल्या प्रत्येक माणसानें वाचून संग्रह करण्याला आवश्यक असा झा-लेला आहे. मराठी भाषेंत अशा प्रकारचा हा पहिलाच ग्रंथ होय. सदरील ग्रंथाची पृष्ठसंख्या "जीवितकर्तव्य" ह्या सांचाची कमींत कमी ८०० पर्यंत होईल. परंतु तसा ग्रंथ अवजड होईल, व किं-मत जास्त बसेल, म्हणून बारीक टाइपांत व सांचा बदलून छापीत आहों. पुण्यांत वर्गणीदार होणारांस किंमत २ रुपये व बाहेरगांव-च्यांस व्ह्याल्युपेएबलनें २।८५ पडतील.

येत्या नवंबर महिन्यांत ग्रंथ प्रसिद्ध होईल.

**बळवंत गणेश दाभोळकर.**

---

## आतांपर्यंत प्रकाशित झालेले
## माझे उपयुक्त ग्रंथ

**नीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें**—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "The Data of Ethics" ह्या ग्रंथाच्या आधा-रानें प्रो० **चिंतामण गंगाधर भानु**, बी. ए. ह्यांकडून लिहविला.—प्रती शिल्लक नाहींत.

२. **न्यायतत्त्वें**—सदरप्रमाणें "Justice" ह्या ग्रंथाच्या आधारानें. किंमत २ रुपये; टपालहंशील ३ आणे.

३. **ज्योतिर्विलास** अथवा **रात्रीची दोन घटका मौज**—रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांकडून लिह-विला.—प्रती शिल्लक नाहींत.

४. **संसारसुख**—दी राइट ऑनरेबल सर **जॉन लबक्** एम्. पी. ह्यांच्या "The Pleasures of Life" ह्या ग्रंथाच्या आधारानें रा० सा० **कृष्णाजी परशुराम गाडगीळ** ह्यांकडून लिहविला.—प्रती शिल्लक नाहींत.

५. **शास्त्ररहस्य**—रा० रा० **ना० ल० फडके**, बी. ए.; रा० रा० **शं० बा० दीक्षित**; प्रि० **म० शि० गोळे**, एम्. ए.; प्रो० **वि० बा० भाटे**, बी. ए.; प्रो० **धों० के० कर्वे**, बी. ए.; रा० सा० **कृ० प० गाडगीळ**; प्रो० **चिं० गं० भानु**, बी. ए.; रा० रा० **ह० ना० आपटे** व रा० रा० **रा० भि० जोशी** ह्या नऊ विद्वानांकडून निरनिराळ्या ९ विषयांवर निबंध लिहवून एकत्र तयार केला.—प्रती शिल्लक नाहींत.

६. **आत्मनीतीचीं तत्त्वें** आणि **परोपकार**—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "The Ethics of Individual Life" व "Beneficence" ह्या ग्रंथांच्या आधारानें यथाक्रम रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. व प्रो० **धोंडो केशव कर्वे**, बी. ए. ह्यांकडून लिहवून एकत्र केला.—प्रती शिल्लक नाहींत.

७. **नीतिशास्त्राचे सामान्य सिद्धान्त**—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "The Inductions of Ethics" ह्या ग्रंथाच्या आधारानें प्रो० **धोंडो केशव कर्वे**, बी. ए. ह्यांकडून लिहविला.–किंमत १॥ रुपये; टपालहशील ३ आणे.

८. **धर्ममीमांसा–नैसर्गिक धर्म** आणि **भौतिक धर्म**—भट्ट **मोक्षमूलर** ह्यांच्या "Natural Religion" व "Physical Religion" ह्या ग्रंथांच्या आधारानें रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांकडून लिहविला.–किंमत २॥ रुपये; टपालहशील ३ आणे.

९. **राजनीतीचीं मूलतत्त्वें** ( भाग १ )—हेनरी सिजविक ह्यांच्या "The Elements of Politics" ह्या ग्रंथाच्या आधारानें रा० रा० **वासुदेव बळवंत पटवर्धन**, बी. ए. व प्रो० **धोंडो केशव कर्वे**, बी. ए. ह्यांकडून लिहविला.–किंमत २॥ रुपये; टपालहशील ३ आणे.

१०. **अज्ञेयमीमांसा** ( स्पेन्सरचरित्रासह )—हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "First Principles" ह्या ग्रंथाच्या "The Unknowable" भागाच्या आधारानें रा०

रा० नारायण लक्ष्मण फडके. बी. ए. ह्यांकडून लिहवि-ला.—किंमत १॥। रुपये; टपालहंशील ३ आणे

११. **धर्ममीमांसा–पितृमूलक धर्म** आणि **आध्यात्मिक धर्म**—भट्ट मोक्षमूलर ह्यांच्या "Anthropological Religion" व "Psychological Religion" ह्या ग्रंथांच्या आधारानें रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांकडून लिहविला.-किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१२. **जीवशास्त्राचीं सामान्य तत्त्वें** ( पुस्तक १ )—रा० रा० **विठ्ठल बाळकृष्ण भाटे**, बी. ए., फर्ग्युसन कॉलेजांतील "प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र" ह्यां शास्त्रांचे प्रोफेसर ह्यांकडून स्वतंत्रग्रंथरूपानें लिहविला.—किंमत १॥। रुपये; टपालहंशील ३ आणे.

१३. **ज्ञेयमीमांसा** ( पूर्वार्ध )—**हर्बर्ट स्पेन्सर** ह्यांच्या "First Principles" ह्या ग्रंथाच्या "The Knowable" भागाच्या पूर्वार्धाच्या आधारानें रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. ह्यांकडून लिहविला.—किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१४. **भारतवर्षीय भूवर्णन** ( प्राचीन )—रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांनीं लिहिला. किंमत १॥। रुपये टपालहंशील ३ आणे.

१५. **ज्ञेयमीमांसा** ( उत्तरार्ध )—**हर्बर्ट स्पेन्सर** ह्यांच्या "First Principles" ह्या ग्रंथाच्या "The Knowable" भागाच्या आधारानें रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. ह्यांकडून लिहविला.–किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१६. **जीवितकर्तव्य** अथवा **संसारकर्तव्य**—दी राइट ऑनरेबल **लार्ड एव्हबरी** ह्यांच्या "The Use of Life" ह्या ग्रंथाच्या आधारें रा० रा० **दत्तात्रेय नारायण नाबर** बी. ए., एलएल्. बी. ह्यांनीं लिहिला.

# कायम वर्गणीदार आणि त्यासंबंधानें माहिती

प्रतिवर्षी दोन नवीन ग्रंथ मी प्रसिद्ध करित असतो: एक साधारणपणें मे-जून महिन्यांत व दुसरा नवंबर-डिसबरांत. हे ग्रंथ आधुनिक शास्त्रांवर, विद्वानांस श्रमांचा मोबदला देऊन, भाषांतररूपानें अगर स्वतंत्रग्रंथरूपानें मी मुद्दाम लिहवितो. आतांपर्यंत निरनिराळ्या शास्त्रांवर विद्वानांकडून १६ मराठी ग्रंथ मीं लिहविले व प्रसिद्ध केले. शास्त्रीय ग्रंथ बहुधा कोणासहि रूक्ष व नीरस वाटणारे असतां, इतके ग्रंथ मी प्रसिद्ध केले कसे, हे खरोखर आश्चर्य वाटण्यासारखे आहे. परंतु सुशिक्षित व समंजस माणसांच्या मदतीचें, आणि माझ्या अल्पसंतोषाचें, सतत उद्योगाचें व दीर्घ परिश्रमाचें हें फल आहे. मजकडून प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक ग्रंथाच्या अमुक प्रती घेत जाऊं अशाबद्दल आजरोजी सुमारें ५०० सभ्य गृहस्थांचें मजजवळ लेखी वचन आहे. आणि जोपर्यंत त्यांत कमतरता येणार नाहीं तोंपर्यंत आणखी कांहीं ग्रंथ लिहवीन व प्रसिद्ध करीन अशी माझी उमेद आहे. कायम वर्गणीदारांखेरीज ह्या ग्रंथास सुमारें ३०० इतर वर्गणीदार आहेत. त्यांपैकीं ज्यांस ह्या उद्योगास मदत करणें योग्य वाटेल व सोय असले त्यांस पुढीलप्रमाणें नियमांनी कायम वर्गणीदार होतां येईल.

( १ ) प्रत्येक ग्रंथाच्या अमुक प्रती घेण्याबद्दलचें लेखी वचन असावें.

( २ ) आवडीप्रमाणें अमुक विषयाचा ग्रंथ हवा अगर अमुक विषयाचा ग्रंथ नको, असें म्हणतां यावयाचें नाहीं. प्रसिद्ध होत जाईल त्या प्रत्येक ग्रंथाच्या वचन दिल्याप्रमाणें तितक्या प्रती स्वीकारल्या पाहिजेत.

प्रत्येक ग्रंथाची किंमत १॥ किंवा २ रुपये असते. म्हणजे, वर्षाचे कांठीं ३ किंवा ४ रुपये किंमतीचे ग्रंथ प्रसिद्ध होतात. आणि पुढें प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथाची तपशीलवार माहिती अगोदरच्या ग्रंथांत प्रसिद्ध होते. तसेंच परगांवच्यांस व्हॅल्युपेएबलनें व पुण्यांतल्यांस प्रती घेऊन येणाराजवळ किंमत द्यावी लागते

**कायम वर्गणीदारांस फायदा पुढेप्रमाणें आहे'—**

( १ ) पुण्यांतील कायम वर्गणीदारांस, अगाऊ वर्गणीदार हो-णारांकरितां ठविलेल्या किमतींत ४ आणे कमी पडतील.

( २ ) परगांवच्यांस टपालहंशील व व्ह्याल्युपेएबल मनीआ-र्डरचा खर्च पडावयाचा नाहीं.

( ३ ) बाहेरगांवी ५ प्रता एकत्र घेणारांस टपाल व व्ही. पी. चा खर्च न पडतां ५ प्रतींऐवजी ६ प्रती मिळतील.

**बळवंत गणेश दाभोळकर.**

---

पुस्तक नंबर १८

## भारतवर्षीय भूवर्णन

(प्राचीन)

( फार थोड्या प्रती शिल्लक आहेत. )

---

## अभिप्राय

**रा० रा० बाळ गंगाधर टिळकः**—"हा ग्रंथ कै० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनी लिहिला असून तो रा०रा० दाभोळकर यांनी प्रसिद्ध केला आहे. कै. दीक्षितांच्या इतर ग्रंथांप्रमाणें हा ग्रंथहि उपयुक्त माहितीनें भरलेला आहे. ऋग्वेद वगैरे वैदिक ग्रंथ, मनुस्मृत्यादिक स्मृति, महाभारत, रामायण आणि पुराणें, व त्याचप्रमाणे विक्रमशकापूर्वी अथवा त्यानंतर मुसलमानी राज्य होण्यापर्यंत झालेल्या ग्रंथांतून सांगितलेले हिंदुस्थानांतील निरनिराळे प्रांत, देश, नद्या, शहरें अथवा डोंगर यांचा कोणकोणत्या ठिकाणीं आणि कोणत्या नांवानें उल्लेख आलेला आहे व त्यांचीं हल्लींच्या प्रचारांतील नांवें काय आहेत याचें या ग्रंथांत सप्रमाण आणि व्यवस्थित वर्णन केलें आहे. सारांश, भारतवर्षाचा हा प्राचीन भूगोलच आहे

असें म्हटलें तरी चालेल. महाभारतांतील किंवा पुराणांतील नद्या अथवा प्रांत यांपैकीं कांहींचा हल्लीं पुरा पत्ता लागत नाहीं. पण जितक्यांचा लागतो त्यावरून भारतवर्षाच्या प्राचीन इतिहासासंबंधानें युरोपियन विद्वानांनीं पुष्कळ निरनिराळीं अनुमानें काढलीं आहेत. उदाहरणार्थ ऋग्वेदांतील नद्या घ्या. ऋग्वेदांत ज्या नद्यांचीं नांवें वारंवार येतात त्यावरून तत्कालीन वस्ती पंजाब व अफगाणिस्थान या देशांत होती असें अनुमान केलेलें आहे. भारत व रामायण यांतील देशादिकांवरूनहि अशाच प्रकारचीं अनुमानें काढतां येतात. या अनुमानाला मूळ साधनीभूत जी माहिती ती सर्व या पुस्तकांत दिली आहे. केवळ संस्कृत ग्रंथांतीलच माहिती आहे असें नाहीं, तर ग्रीक व चिनी ग्रंथकार यांच्या ग्रंथांतून किंवा जुने शिलालेख अथवा नाणीं यावरून जी माहिती मिळते तिचाहि यांत समावेश केला आहे. हें पुस्तक मूळ दक्षिणा प्राइझ कमिटीच्या जाहिरातीवरून तयार केलें. त्यास आज १७ वर्षें झालीं. इतक्या मुदतींतील हिंदुस्थानच्या प्राचीन भूगोलासंबंधीं झालेले शोध यांत सामील केले असते तर बरें झालें असतें. पण ग्रंथकारांच्या अकालिक मृत्यूमुळें ती गोष्ट करणें आतां शक्य नव्हतें. असो; ह्या पुस्तकांत जी माहिती आहे ती मराठी वाचकांस नवीच आहे व ती एकत्र करण्याकरितां जे श्रम के० दीक्षित यांस पडले ते प्रकाशकांनीं फुकट जाऊं दिले नाहींत ह्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. हिंदुस्थानचा प्राचीन भूगोल हा एक आतां स्वतंत्र विषय झाल्यासारखा झाला आहे, व खरें म्हटलें म्हणजे त्या बाबतींत आपल्या शक्त्यनुसार आह्मीं नव्या पद्धतीप्रमाणें शोध करावयास पाहिजेत. पण तें काम न झाल्यास निदान त्यासंबंधानें आजपर्यंत झालेल्या शोधांसंबंधाची माहिती असणें तरी जरूर आहे. तशा प्रकारची माहिती देणारें ह्या पुस्तकाखेरीज मराठींत दुसरें पुस्तक नाहीं."

—केसरी, ता० २८-८-१९००.

## रा० रा० श्रीधर गणेश जीनसीवाले, एम्. ए.

" रा० रा० शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं तयार केलेला "प्राचीन भारतवर्षीय भूवर्णन" नांवाचा ग्रंथ मीं पाहिला. हा फार महत्त्वाचा आहे असें म्हणण्यास मला फारच आनंद होत आहे. रा० दीक्षित यांनीं वेदांतील, भारतांतील व पुराणांतील पुष्कळ आधारवचनें शोधून काढिलीं आहेत व कांहीं आलीकडील प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांतूनहि भरपूर माहिती दिली आहे. "Cunningham's Ancient Geography of India" ह्या फार उपयोगी ग्रंथाचा बराच उपयोग केलेला आहे. व शिवाय खिस्त शकाचे ५।६।७ ह्या शतकांत हिंदुस्थानांत चीन देशांतून बुद्धधर्मानुयायी प्रसिद्ध यात्रेकरी व प्रवासी "फाहियान" "ह्युएनस्यांग" वगैरे ह्यांनीं त्या वेळच्या हिंदुस्थानाचीं चिनी भाषेंत जीं पुस्तकें लिहून ठेविलीं आहेत व ज्यांचीं आलीकडील तीस वर्षांत इंग्रजींत "स्यामुएल बील" सारख्या पंडितांनीं भाषांतरें छापून प्रसिद्ध केलीं आहेत, त्यांतूनहि फारच उपयुक्त माहिती कै० दीक्षित यांनीं योग्य स्थलीं दिली आहे. एकंदरींत सर्व दृष्टीनें पाहतां हा ग्रंथ मराठी भाषेंत ह्या विषयांत पहिलाच आहे, तरी तो इतका सुंदर बनला आहे कीं सर्व महाराष्ट्र व हिंदुस्थान देशावर कै० दीक्षित यांचे बहुत उपकार आहेत असें कबूल करणें आवश्यक आहे. ग्रंथ सर्व प्रकारें लोकादरास पात्र आहे, व दरएक वरिष्ठ प्रतीच्या मराठी शाळेंत संग्रहणीय आहे.

पुणें, ता० २ मार्च १९००.

माझे प्रिय आणि पूज्य वडील बंधु

**बाजी नारायण नावर**

( जे परलोकवासी होण्यापूर्वी ठाणें हायस्कूलचे हेड्मास्तर होते, व कांहीं वर्षांपूर्वी पुणें एथें दक्षिणाप्राइज् कमिटीचे सेक्रेटरी आणि मराठी ट्रान्स्लेटर होते. )

ह्यांच्या

**कर्तव्यनिष्ठा–सत्यप्रीति–सुजनता–प्रेमळ व निरभिमानवृत्ति** आदिकरून गुणांचे स्मरणार्थ

हा ग्रंथ

**मराठी भाषेचे अभिमानी यांस**

सन्मानपूर्वक सादर केला आहे.

**दत्तात्रेय नारायण नावर**

# प्रस्तावना

ज्या ग्रंथकाराच्या कृतीच्या आधारें हें पुस्तक रचिलें आहे त्याचें नांव मराठी वाचकांस " संसारसुख " ह्या पुस्तकाच्या द्वारें पूर्वींच विश्रुत आहे. मूळ ग्रंथ मी सहज वाचावयास घेतला असतां मला तो इतका रम्य वाटला कीं त्याचें मराठी भाषांतर करावें अशी माझ्या मनास स्फूर्ति झाली. त्याप्रमाणें कांहीं भाषांतर मीं केवळ आपल्या मनाच्या हौसेकरितां म्हणून केलें. त्या वेळीं तें छापून प्रसिद्ध करावें अशी कल्पना माझ्या मनांत नव्हती. पण पुढें तें भाषांतर पुरें करून प्रसिद्ध करावें व आपल्या जन्मभाषेची यथामति सेवा करावी असा विचार मनांत येऊन मूळ ग्रंथकार सर जॉन लबक् ह्यांजपाशीं भाषांतराची परवानगी मागितली, व ती त्यांनीं आपल्या नेहमींच्या उदार स्वभावास अनुसरून मोठ्या खुषीनें दिली.

सर जॉन लबक् हे इंग्लंड देशांतील एक धनिक गृहस्थ आहेत. त्यांनीं मनांत आणिलें तर केवळ ऐषआरामांत रहाण्यासारखें त्यांचें वैभव आहे. तथापि आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजाविणें, व आपल्या देशबांधवांचें आपल्या हातून होईल तेवढें कल्याण करणें ह्यांतच त्यांना सौख्य वाटतें. ते आपलीं खासगी कामें सांभाळून मोठमोठ्या सार्वजनिक कामांत निमग्न असतात. असें असून त्यांनीं आजपर्यंत नानाविध विषयांवर अत्यंत मनोहर आणि उपयुक्त अशीं वीस पुस्तकें लिहिलीं आहेत. व तीं जगांत जेथे जेथे इंग्रजी भाषेचा प्रसार झाला आहे त्या

सर्व देशांत फार लोकप्रिय होऊन त्याच्या पुनःपुनः आवृत्त्या निघत आहेत. ह्या थोर गृहस्थांची योग्यता ध्यानांत आणून सरकारानें त्यांस मोठमोठे किताब दिले आहेत. व गेल्या वर्षी त्यांस ब्यारन् ही पदवी देण्यांत आली. म्हणून ह्यापुढें ते लॉर्ड एव्हबरी ह्या नांवानें लोकांस माहीत होतील.

आपल्या जीविताविषयीं आपण विचार करूं लागलों म्हणजे दोन प्रश्न मनापुढें उभे राहतातः—पहिला, ह्या जगांत माझें काय कर्तव्य आहे? दुसरा, ह्या संसारांत कांहीं सौख्य आहे किंवा नाहीं? ह्यांपैकीं दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर "संसारसुख (The Pleasures of Life)" ह्या ग्रंथांत दिलें आहे, व पहिल्याचें उत्तर प्रस्तुत (The Use of Life) पुस्तकांत दिलें आहे. म्हणून हीं दोन्ही पुस्तकें एकाच ग्रंथाचे दोन भाग आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ह्या पुस्तकांत मूळ ग्रंथाचा सर्व भावार्थ यथामति आणण्याचा प्रयत्न केला आहे. कांहीं ठिकाणीं देशकालवर्तमान ह्यांस अनुसरून अवश्य तो फेरफार करणें भाग पडलें आहे. उदाहरणार्थ, देशभक्ति ह्या प्रकरणांत केवळ भाषांतर करून निर्वाह लागला नसता. कारण मूळ ग्रं-

* जाहिरात प्रसिद्ध झाल्यावर व ग्रंथाचीं बरींच पृष्ठें छापून झाल्यानंतर रा० रा० बाळ गंगाधर टिळक यांनीं ह्या ग्रंथास "संसारकर्तव्य" हें दुसरें नामाभिधान सुचविलें आहे. तें यथार्थ आहे, आणि एका भागाचें नांव संसारसुख व दुसऱ्याचें संसारकर्तव्य ह्या योजनेलाहि युक्त आहे, म्हणून मुखपृष्ठावर व बाइंडिंगचे कव्हरावर दोन्ही नांवांचा उल्लेख करण्यांत आला आहे. **ब० ग० दाभोळकर.**

थांत इंग्लंड देशास अनुलक्षूनच त्या विषयाचा विचार केला आहे. तो मराठी वाचकांसाठीं लिहिलेल्यां पुस्तकांत सर्वथा अस्थानीं झाला असता. त्याचप्रमाणें दुसऱ्या कांहीं थोड्या स्थळीं मूळ ग्रंथाचें धोरण लक्षांत ठेवून नवीन मजकूर घालण्याचें धाष्ट्र्य निरुपायास्तव केलें आहे.

मूळ ग्रंथांत इंग्रजी कवींचीं पद्यें ठिकाठिकाणीं घालून शोभा आणिली आहे. त्यांपैकीं बहुतेकांचा भावार्थ पद्यरूपानें मराठींत आणण्याचा प्रयत्न अल्पमतीनें केला आहे. व संस्कृत आणि प्राकृत ग्रंथांतील समानार्थक पद्यें अवलोकनांत आलीं तेवढीं घातलीं आहेत.

हें पुस्तक तयार करण्याच्या कामीं रा० रा० नारायण चिंतामण केळकर, बी. ए., श्रीनिवास त्र्यंबक द्रवीड, बी. ए., एल्एल्. बी., व तुकाराम विठ्ठल ठाकूर ह्यांनीं साहाय्य केलें आहे, व रा० रा० दत्तात्रेय बळवंत पारसनीस ह्यांनीं कांहीं उपयुक्त सूचना केल्या आहेत, त्याबद्दल त्या सर्वांचा मी आभारी आहें. फ्रेंच व लॅटिन् भाषेंतील वचनांचा अर्थ करण्याच्या कामीं रेव्हरंड् मि० हेन्री ब्रूस ह्यांनीं मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

सरतेशेवटीं, मराठीभाषेचे निःसीम भक्त रा० रा० बळवंत गणेश दाभोळकर ह्यांनीं ह्या पुस्तकास आपल्या अमूल्य ग्रंथमालिकेंत स्थान देऊन त्याचा बहुमान केला, व प्रकाशनाचें काम चांगल्या रीतीनें तडीस नेलें, ह्याबद्दल त्यांचे आभार मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

द० ना० नावर

# अनुक्रमणिका आणि प्रस्तावना

( ओंवी-अर्ध )

प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थी पंचीकरण ॥

—रामदास

“ ह्या जगांत माझें काय कर्तव्य आहे? ” ह्याचें उत्तर हा प्रस्तुत ग्रंथांतील विषय असल्याबद्दल ग्रंथकर्त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे. माझ्या मतें सर **जॉन लबक्** ह्यांनीं आपल्या विचारसरणींत **ऐहिक** आणि **पारमार्थिक** अशा दोन्ही दृष्टींनीं त्या विषयाचें प्रतिपादन केलेलें आहे. प्रकरण १ ते १३ ऐहिक कर्तव्याविषयीं आहेत; आणि प्रकरण १४ ते १९ हीं पारमार्थिक विचाराचीं आहेत. आतां सर **जॉन लबक्** ह्यांची विचारमालिका कशी सुरू होते तें पाहूं.

ह्या सृष्टीचें क्षणभर अवलोकन केलें असतां आपणांस असें दिसून येईल कीं आपण ह्या सर्वांचे अधिपति आहों: सकल स्थावरजंगमात्मक वस्तु आपणांकरितांच निर्माण झालेलें आहे. मग असें आहे तर, प्राणिमात्रांप्रमाणें प्रजोत्पादन करून लय पावणें एवढीच मनुष्यजन्माची इतिकर्तव्यता आहे, कीं जीवित सफल होण्यास श्रेष्ठ असें आपलें कांहीं संसारकर्तव्य आहे? मनुष्य लक्षांत घेईल तर हा **अत्यंत महत्त्वाचा प्रश्न** सकृद्दर्शनीं त्याच्या पुढें उभा राहील. ( प्रकरण १—पृष्ठ १ )

ह्या प्रश्नाचें उत्तर देऊं लागलों म्हणजे ऐहिक दृष्टीनें विचार करतां, कोणतेंहि संसारकर्तव्य नीटनेटकें बजावितां

येण्यास द्रव्याची प्रथमतः अपेक्षा दिसून येते. कारण द्रव्याच्या अनुकूलतेनें सर्व कांहीं साध्य होतें. मात्र तें संपादन करण्यास व्यवहारचातुर्य आधीं असावें लागतें. ( प्रकरण २—पृष्ठ ३९ व प्रकरण ३—पृष्ठ ५९ )

पण व्यवहारचातुर्य हें नैसर्गिक आहे, तें मुद्दाम ओढून ताणून आणूं म्हटलें तरी त्यापासून व्हावा तसा कार्यभाग होणार नाहीं. म्हणून द्रव्यसंपादनाकरितां पुष्कळांना श्रमच करावे लागतील आणि श्रम करणारास विश्रांतीची किंवा मनोरंजनाची अवश्यकता मागोमाग आलीच. ( प्रकरण ४—पृष्ठ ८९ )

आतां श्रम किती करावे आणि विश्रांति किती घ्यावी ह्याचा तरी मेळ पाहिजे. म्हणजे मनुष्यानें आपल्या आरोग्याकरितां जपलें पाहिजे. ( प्रकरण ५—पृष्ठ १०७ )

एथपर्यंत विचार झाल्यानंतर पुढें असें दिसूं लागतें कीं, मनुष्य कितीहि चतुर असला किंवा त्यानें कितीहि श्रम केले तरी त्याला एकट्याला द्रव्यसंपादनाचा मार्ग सुसाध्य होणार नाहीं. तो ज्या राष्ट्रदेहाचा अवयव असेल त्याची अवस्था जर उत्तम असेल, म्हणजे त्या राष्ट्राची सांपत्तिक स्थिति जर बरी असेल, तरच त्याला सर्वांबरोबर द्रव्यसंपादनाचा मार्ग सुखकर होईल. म्हणून राष्ट्रत्वाकरितां, त्याच्या उन्नतीकरितां, किंवा राष्ट्रीय शिक्षणाकरितां प्रत्येकानें आपणांकडून होईल तेवढा प्रयत्न केला पाहिजे. ( प्रकरण ६—पृष्ठ १२९ )

पुढें असा विचार होतो कीं, राष्ट्र म्हणजे अनेक व्यक्तींचा समुदाय आणि त्या अनेक व्यक्तींपैकींच आपण

एक, त्या अर्थी राष्ट्रीय शिक्षण म्हणजे प्रत्येकाचें **आत्म-शिक्षणच** होय. (प्रकरण ७–पृष्ठ १४३)

आतां आत्मशिक्षण हें **वाचनानें** प्राप्त होतें. म्हणजे मागच्यास ठेंच पुढचा शहाणा ह्या न्यायानें पूर्वीच्या लोकांच्या अनुभवाचें शिक्षण वाचनानें मिळतें. आणि तें गरिबांपासून श्रीमंतापर्यंत सर्वांस साध्य करून घेण्याचा **पुस्तकालयें** हा राजमार्ग असून, सांप्रतकालीं तो खुला आहे (प्रकरण ८–पृष्ठ १६१ व प्रकरण ९–पृष्ठ १७३)

वाचनाचा परिणाम **देशभक्ति** हा आहे. कै० महादेव **गोविंद रानडे** हे देशभक्तीचे मूर्तिमंत पुतळे होते ते तसें त्यांचें वाचन होतें म्हणूनच होत. (प्रकरण १०–पृष्ठ १८९)

देशाविषयीं एकदां प्रीति उत्पन्न झाली म्हणजे प्रत्येक **नागरिकाचें** आपल्या देशाविषयीं काय **कर्तव्य** आहे हें मनांत येतें. (प्रकरण ११–पृष्ठ २०१) व आपण ज्या समाजांत राहतों त्या समाजाविषयींचें प्रेम दुणावून **सामाजिकवर्तनाचा** आळा आपणांला बसतो (प्रकरण १२ पृष्ठ २२१)

अर्थातच देशाच्या कल्याणाकरिता मनुष्यानें, आपला अमोल वेळ फुकट दवडूं नये. देशभक्तीच्या **उद्योगांत** त्याचा अंत व्हावा. (प्रकरण १३–पृष्ठ २४९)

एवंच द्रव्य ह्या मध्यबिंदूपासून देशकल्याणाविषयीं सतत उद्योगापर्यंतच्या त्रिज्येनें जें वर्तुल काढितां येईल त्याच्यां आंत संसारसंबंधी मनुष्याचें ऐहिक कर्तव्य संपतें. कारण देशभक्ति ही एक प्रकारें ईशभक्तिच आहे, आणि देशका-

जांत गढून जाणें ही ऐहिक दृष्टीनें परमेश्वराशीं तद्रूपताहि आहे. प्रस्तुत ग्रंथाचा पहिला भाग एथे पुरा होतो.

आतां उद्योगानें ( तपानें ) माणूस बुद्धिमान् होतो, म्हणजे स्वयंजोति होतो. ( पृष्ठ २५०८ ह्यावरील टिपेंत ह्याविषयीं मीं उल्लेख केला आहे. ) ही ज्योति सदैव प्रकाशित राहण्याकरितां उद्योगाचे ठायीं श्रद्धा असली पाहिजे. पारमार्थिक दृष्टीनें परमेश्वरप्राप्तीचा निर्झर श्रद्धेपासून उगम पावतो. ( प्रकरण १४–पृष्ठ २६७ )

उद्योगाचे ठायीं श्रद्धा असावी, त्याप्रमाणेंच तो सदिच्छेनें, सद्धेतूनें किंवा सताविषयीं आशेनें करावा; आणि प्राणिमात्रांच्या कल्याणाकारितां औदार्यानें किंवा सुजनतेनें करावा. ( प्रकरण १५–पृष्ठ २८१ व प्रकरण १६ पृष्ठ २९५ )

मात्र त्या सुजनतेची पात्रता अंगीं येण्यास सद्वर्तन आवश्यक आहे. इतकेंच नाहीं तर, परमेश्वरप्राप्तिरूप वर्तुलाचा तो मध्यबिंदुच आहे. ( प्र० १७–पृष्ठ ३०९ )

कारण सद्वर्तनानें शांति आणि सौख्याचा लाभ होतो. आणि हेंच मानवधर्माचें किंवा संसारकर्तव्याचें सार आहे. ( प्रकरण १८ पृष्ठ ३३१ व प्रकरण १९–पृष्ठ ३५१ ). एथे प्रस्तुत ग्रंथाचा दुसरा भाग पूर्ण होतो.

एकंदरीनें पाहतां, वित्तशुद्धीनें ऐहिकदृष्ट्या आणि चित्तशुद्धीनें पारमार्थिक दृष्ट्या परमेश्वरप्राप्ति करून घेणें हा मानवजीविताचा किंवा संसाराचा उद्देश होय, हा प्रस्तुत ग्रंथांतील विषयाचा इत्यर्थ आहे.

**बळवंत गणेश दाभोळकर.** प्रकाशक.

( ओंवी )

धन्य धन्य हा नरदेहो । एथील अपूर्वता पहा हो ॥
जों जो कीजे परमार्थ लाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १

—रामदास

# प्रकरण १

## अत्यंत महत्त्वाचा प्रश्न

ह्या संसारांत आपणास पुष्कळ गोष्टी शिकावयाच्या आहेत. त्यांपैकीं अत्यंत महत्त्वाची गोष्ट ह्या जगांत कसं रहावें ही होय. लोक आपल्या जीविताच्या संरक्षणासाठीं जितकी काळजी वाहतात तितकी दुसऱ्या कशाचीहि वहात नसतील. पण तें जीवित उन्नत आणि सफल होण्याकरितां मनापासून खटपट करणारे लोक फार थोडे असतात.

जीवित सफल करून घेणें ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. हिपॉक्रेटिस् ह्यानें आपल्या वैद्यक ग्रंथाच्या आरंभीं असें म्हटलें आहे कीं " आयुष्य अल्प आहे, ज्ञान अनंत आहे; अनुकूल समय थोडे व चंचल आहेत; अनुभवजन्य ज्ञान संशयात्मक आहे. व सत्य अनुमानें फार कठिण आहे. " एका संस्कृत कवीची अशाच अर्थाची उक्ति आहे.

( श्लोकार्ध )

*अनंत पारं किल शब्दशास्त्रं । स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्ना: ॥

—सुभाषित

---

( श्लोकार्थ )

* शास्त्रें फार अपार जीवित तुझें अत्यल्प कीं मानवा ।
तेंही विघ्नशताभिभताचि असे नाहींच रे वानवा ॥

ह्या जगांत सुख आणि यश ह्या दोहोंची प्राप्ति आ-ह्मां मनुष्यांच्या स्थितीपेक्षां देखील कृतीवर जास्त अ-वलंबून आहे. मनुष्याच्याच कृतीमुळें असंख्य लोकांचा नाश झालेला आहे. पंचमहाभूतांकडून नाश पावलेले लोक त्या मानानें फार कमी असतील. मनुष्यांच्या हातून जित-क्या घरांदारांचा व शहरांचा विध्वंस झाला आहे त्या मानानें वादळ व धरणीकंप ह्यांनीं केलेला नाश कांहींच नाहीं. नाश दोन प्रकारचे आहेत. एक कालगतीमुळें झालेला व दुसरा मनुष्यांच्या कृतीनें झालेला.

मनुष्यकृतीनें होणारा नाश सर्वांत भयंकर आहे. व मनुष्याचे अत्यंत दुष्ट शत्रु मनुष्याच्याच हृदयांत वास करितात.

" आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैवरिपुरात्मन: "

ह्या गीतावाक्यांत सांगितल्याप्रमाणें आपलें हित किंवा अहित करून घेणें हें आपल्या स्वाधीन आहे. पुष्कळ लोक इतरांस दुःख देण्याचाच धंदा करितात, अथवा अशा प्रकारचे धंदे करितात कीं त्यांपासून दुसऱ्यांस त्रासच होतो. तारुण्याच्या धुंदींत मनुष्याच्या हातून अनन्वित कर्में घडतात आणि वृद्धपणीं त्यांचा त्याला पस्तावा हो-तो. पण मग पस्तावा होऊन काय उपयोग ? जी गोष्ट एकदां झाली ती कांहीं केल्यानें नाहींशी होणार नाहीं. मनुष्यें स्वार्थ साधण्याच्या नादांत शहाणपणास अगदीं रजा देतात. त्यामुळें त्यांचा स्वार्थहि साधत नाहीं व त्यांच्या हातून इतरांचें नुकसान होतें.

( ओंव्या )

कडाडीं लोटला गाडा । कां शिखरौनी सुटला धोंडा ॥
तैसा न देखे जो पुढां । वार्धक्य आहे ॥ १
कां आड वोहळा पाणी आलें । कां जैसें म्हैसयाचें झुंज माजलें॥
तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जया ॥ २
न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी ॥
चिंतूं नये तें विचारी । जयाची मति ॥ ३
रिघे जेथ न रिघावें । मागें जें न घ्यावें ॥
स्पर्शे जेथ न लगावें । अंग मन ॥ ४

—ज्ञानेश्वरी

मनुष्याला ह्या जगांत अनेक प्रकारचीं संकटें व दुःखें प्राप्त होतात, ही गोष्ट खरी आहे. परंतु पुष्कळ दुःखें टाळण्यासारखीं असून लोक तीं टाळीत नाहींत, व पुष्कळ सौख्य मिळण्यासारखें असून तें मिळवीत नाहींत. म्हणून मनुष्यास होणाऱ्या दुःखांसंबंधानें बऱ्याच अंशीं तो स्वतःच दोषास पात्र असतो; व त्यामुळें तर मनास अधिकच उद्वेग होतो; कारण

( आर्या )

जिव्हेनें उक्त तसें लेखनिनें लिखित शब्द बहु असती ॥
" करितां, झालें असतें " यांसम दुःखद दुजे न मज दिसती ॥ १

—व्हिटियर

पुष्कळ वेळां असें घडतें कीं, ज्या गोष्टी आपण वाईट समजतों त्या मूळच्या कांहीं वाईट नसतात. चांगल्या गोष्टींचा दुरुपयोग किंवा अतिरेक झाल्यामुळें त्या वाईट होतात. यंत्रांतील एकादें चक्र योग्य ठिकाणीं असतें, तोंपर्यंत तें सुरळीत चालतें. परंतु तें स्वस्थानापा-

सून यत्किंचित् हालले तर सर्व यंत्राचा बिघाड होतो. त्याचप्रमाणें आपण सृष्टिनियमांच्या विरुद्ध वागूं लागलों म्हणजे आपणास दुःख भोगावें लागणें हें साहजिकच आहे. धैर्य हा गुण चांगला आहे. पण त्याचाच अतिरेक झाला तर विवेकशून्यता होते. प्रेमाचा अतिरेक झाला तर मानसिक दुर्बलता येते. मितव्ययाचा अतिरेक झाला म्हणजे लोभ होतो. जी गोष्ट एकाला अमृतप्राय आहे, तीच दुरुपयोगामुळें दुसऱ्याला विषप्राय होते. सृष्टिनियम आहेत त्याहून भिन्न असते तर चांगलं झालें असतें, असें कोणाच्यानें म्हणवणार नाहीं. कोणी मनुष्य पडला आणि त्याचा पाय मोडला तर हा त्याच्या निष्काळजीपणाचा परिणाम होय. त्याबद्दल गुरुत्वाकर्षणाच्या नियमास दोष देण्यांत काय अर्थ आहे? गुरुत्वाकर्षणाच्या नियमांत फेरफार केल्यानें हल्लींपेक्षां चांगली स्थिति प्राप्त होईल असें मुळींच नाहीं.

आपलीं बहुतेक दुःखें आपल्याच दोषांमुळें आपणांस प्राप्त होतात. आपल्या हातून दोन प्रकारचे दोष घडण्याचा संभव असतो. एकादी गोष्ट नीतीविरुद्ध किंवा अयोग्य आहे असें कळत असून ती केल्यामुळें होणारे दोष हे एका प्रकारचे होत; व आपल्या अज्ञानामुळें व गैरसमजुतीमुळें होणारे हे दुसऱ्या प्रकारचे होत. ह्यांपैकीं पहिले दोष आपल्या हातून घडूं नयेत म्हणून आपणास आपली हृदयस्थ सद्बुद्धि नेहमीं सांगत असते. असें असून तिचें न ऐकतां जर ते प्रमाद आपण केले तर ते जाणून बुजून केले असें म्हटलें पाहिजे.

( श्लोक )

यत्कर्म कुर्वतोऽस्य स्यात्परितोषोऽन्तरात्मनः ।।
तत्प्रयत्नेन कुर्वीत । विपरीत तु वर्जयेत् ।।

—मनु

**भावार्थः**—आपल्या अंतरात्म्यास जे केल्यानें संतोष वाटेल तें कृत्य प्रयत्नानें करावें व त्याच्या उलट प्रकारचें कृत्य आपल्या हातून होऊं नये अशी खबरदारी घ्यावी.

दुसऱ्या प्रकारचे दोष टाळण्याकरितां आपली विचार-शक्ति, आपल्या वडिलांचा व मित्रांचा सल्ला, व आपलें शिक्षण ह्यांची मदत घेतली पाहिजे. आपलें शिक्षण चांगलें होण्याविषयीं आपण फार काळजी घेतली पाहिजे. आपणां सर्वांस आमरणांत निदान एका शिष्यास तरी शिकविणें भाग आहे. तो शिष्य दुसरा कोणी नाहीं, तर स्वतः आपणच होय.

मनुष्य स्वतःच्या प्रयत्नानें जें शिक्षण मिळवितो तें जसें त्याच्या अंगीं बाणून जातें, तसें दुसऱ्याचें शिक्षण बाणत नाहीं. पुष्कळांची अशी कल्पना असते कीं, शाळा सोडली म्हणजे आपलें शिक्षण संपलें. पण खरोखर म्हटलें तर त्यावेळीं शिक्षणास कोठें नुकती सुरुवात होते व मनुष्य मरेपर्यंत तें चालूच असतें. सेनेका म्हणतो, "लोक आपल्या बुद्धीचा जर चांगला उपयोग करितील, आणि सुख मिळण्याकरितां जशी खटपट करितात त्याप्रमाणें सद्गुण संपादण्याकरितां करितील, तर किती तरी कल्याण होईल बरें ! "

आमच्या ह्या हिंदुस्थान देशांत प्राचीन काळापासून दैवावर भरंवसा ठेवण्याचा प्रघात चालत आला आहे.

दैववादी लोकांना असें वाटतें कीं, पुढें होणाऱ्या सर्व गोष्टी ठरलेल्याच असतात आणि मनुष्यानें कांहीं केलें तरी होणार तें चुकत नाहीं.

( श्लोक )

यदभावि न तद्भावि । भावि चेन्न तदन्यथा ॥
इति चिंताविषघ्नोऽयं । अगदः किं न पीयते ॥ १

—हितोपदेश

भावार्थः—

( आर्या )

होणार तें चुकेना, होणार न जें घडे कदा तें न ।
चिंताविषशामक हें औषध ऐसें किमर्थ सेविसि न ॥ १

ह्या लोकांना असें वाटतें कीं, मनुष्यप्राणी हे केवळ ईश्वरानें आपल्या खेळाकरितां निर्मिलेल्या कळसूत्री बाहुल्या आहेत. आतां हें मत खरें आहे कीं काय ? जीवितासंबंधानें कांहीं सिद्धांत आपणास ठरवितां येतील कीं नाहींत ? व संसारसागरांतून आपली नाव इष्ट दिशेनें चालविण्याची शक्ति मनुष्याच्या अंगीं आहे किंवा नाहीं ? अथवा ती नाव जिकडे यदृच्छेनें जाईल तिकडे मनुष्यास जाणें भाग आहे ? आमच्या मतें ह्या प्रश्नांचें उत्तर अगदीं उघड आहे. मनुष्यप्राणी हा कळसूत्री बाहुलीप्रमाणें नसून त्याच्या अंगीं पराक्रम आहे, व आपली स्थिति बरी-वाईट करून घेण्याचें सामर्थ्यहि आहे. जर मनुष्याची स्थिति चांगली नसली तर हा त्याचाच दोष आहे. एका संस्कृत कवीनें म्हटलें आहे कीं,

(श्लोकार्ध)

उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः ।

दैवेन देयमिति का पुरुषा वदन्ति ॥

—हितोपदेश

**भावार्थः—**

( आर्या )

उद्योगी नरसिंहा लक्ष्मी येउनि स्वयेचि की वरिते ।
दैवचि देणार असें वदती पुरुषार्थहीन केवळ ते ॥ १

आतां, जर आपली भावी स्थिति चांगली-वाईट करण्याचें आपल्या हातांत आहे, तर ह्या जगांत आपणास काय कर्तव्य आहे व ह्या जीवितात्रें उत्तम सार्थक कोणत्या रीतीनें होईल ह्याचा प्रथम विचार केला पाहिजे. कांहीं लोकांस ह्या जगांत आपणास कांहीं कर्तव्य आहे असें वाटत नाहीं; म्हणून त्यांच्या सर्व क्रिया आणि आचरण ह्यांत कांहीं धरबंद नसतो. कांहीं लोक ह्या जगांत आपलें कर्तव्य ओळखितात, आणि आपलें आचरण त्या कर्तव्याच्या अनुरोधानें ठेवितात. आपलें पहिलें कर्तव्य म्हटलें म्हणजे आपणामध्यें जी सत्कार्यशक्ति आहे तिचा अपव्यय होऊ न देतां, तिच्याकडून जेवढें कार्य घडण्यासारखें आहे तेवढें उत्तम रीतीनें करून घेणें हें होय.

हंबोल्ट म्हणतो, " प्रत्येक मनुष्यानें आपल्या सर्व गुणांचा उत्तम विकास होईल, आणि आपली सर्व बाजूंना उन्नत अवस्था होईल असा यत्न करावा. " पण हा यत्न केवळ स्वार्थबुद्धीनें करितां कामा नये. कारण तशा बुद्धीनें केल्यास त्यांत मुळींच यश येणार नाहीं हें खास समजावें. बेकन म्हणतो, " स्वतःचें हित साधणें हा ह्या जीवितास शोभण्यासारखा हेतु नाहीं." बुद्ध,

प्लेटो, आरिस्टाटल, सेंटपाल्, ज्ञानदेव, तुकाराम, ह्यांसारख्या अत्यंत थोर पुरुषांनीं जी आत्मोन्नति करून घेतली, ती स्वार्थ साधण्याकरितां नव्हे. केवळ स्वार्थ साधून त्यांना कधींहि संतोष झाला नसता. ह्यावरून आपली उन्नति करावयाची ती परहिताकरितां करावयाची हें उघड आहे. अशा दृष्टीनें पाहिलें असतां आपलें आयुष्य अत्यंत मनोहर आहे असें दिसून येईल. स्वार्थलंपट मनुष्याच्या आयुष्यांत कांहीं मौज नाहीं, कारणः—

(श्लोक)

दानं पाणिर्न तु कंकणेन । श्रोत्रं श्रुतेनैव न कुंडलेन ॥
विभाति कायः करुणापराणां । परोपकारैर्न तु चंदनेन ॥ १

—भर्तृहरि

भावार्थः—

(श्लोक)

श्रुतेंचि की श्रोत्र न कुंडलानें । दानेंचि की पाणि न कंकणानें ॥
साज तसा देहहि हा न आनें । परोपकारें नच चंदनानें ॥ १

—वामन

ज्याप्रमाणें एकाद्या मनुष्यास श्रीमंत होण्याची इच्छा असल्यास आपला आदा आणि खर्च काय आहे हें पहाणें जरूर आहे, त्याचप्रमाणें आत्मोन्नति करण्याची ज्याला इच्छा आहे त्यानें नेहमीं आत्मपरीक्षण करण्याची संवय ठेविली पाहिजे. "तूं स्वतःची ओळख करून घे" अशा अर्थाचें ग्रीक भाषेंत एक वचन आहे. व संस्कृत ग्रंथांतहि आत्मज्ञानाचें महत्त्व फार वर्णिलें आहे

(श्लोक)

नानाशास्त्र पठेल्लोके । नानादैवतपूजनम् ॥

आत्मज्ञानं विना पार्थ । सर्वं कर्म निरर्थकम् ॥

—गीता

**भावार्थः**—मनुष्य नाना शास्त्रें पठण करो, किंवा नाना दैवतांची पूजा करो; आत्मज्ञानावांचून सर्व निरर्थक आहे.

ह्यावरून आपणा स्वतःची ओळख आपण करून घेणें हें काम जसें फार महत्त्वाचें आहे, तसेंच कठिणहि आहे असें दिसून येईल. मॉंटेन म्हणतो,

" 'अहं' ह्या व्यक्तीसारखा राक्षस किंवा अद्भुत पदार्थ ह्या जगांत अद्यापि माझ्या पाहण्यांत आला नाहीं."

सर टी. ब्राऊन नामक एका विख्यात इंग्रजी ग्रंथकाराचे आयुष्यांत विशेष महत्त्वाची किंवा चळवळीची अशी एकहि गोष्ट घडली नाहीं परंतु त्याला आत्मज्ञान करून घेण्याची संवय असल्यामुळें त्याचें आयुष्य किती मनोरंजक झालें तें पहा ! तो म्हणतो, " माझ्या आयुष्याचीं तीस वर्षें म्हणजे केवळ चमत्कारपूर्ण अशीं मला वाटतात. त्यांची हकीकत सांगितली असतां ऐकणारास ती इतिहासासारखी न वाटतां कवितारूप व काल्पनिक भासेल."

( श्लोक )

प्रत्यहं प्रत्यवेक्षेत । नरश्चरितमात्मनः ॥
किं नु मे पशुभिस्तुल्यं । किं नु सत्पुरुषैरिति ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—प्रति दिवशीं मनुष्यानें आपल्या वर्तनाचें निरीक्षण करावें, व तें पशूंच्याप्रमाणें होत आहे किंवा सत्पुरुषांच्या प्रमाणें होत आहे हें पहावें.

दुसऱ्यांनीं केलेला उपदेश आजपर्यंत कोणास आ-

वडला नाहीं. तथापि जे पहिल्या प्रथम फुकटच्या सल्ला घेणार नाहींत, त्यांना कधीं ना कधीं तीच सल्ला पश्चात्तापाच्या रूपानें भारी किंमतीस विकत घ्यावी लागेल. म्हणून ज्याला ह्या जगांत कांहीं कर्तव्य आहे, व ह्या आयुष्याचें सार्थक करून घ्यावयाचें आहे, त्याला कांहीं उपयुक्त सूचना कराव्या हाच ह्या ग्रंथाचा मूळ उद्देश आहे.

सत्कार्य करण्याची सोन्यासारखी संधि आली असतां मनुष्यें ती कशी दवडून टाकितात, ह्याचा विचार केला असतां अत्यंत खेद वाटल्यावांचून रहाणार नाहीं. जिच्या योगानें हजारों गोरगरीबांस सुखी करितां आलें असतें अशी सामग्री हातीं असूनहि तिचा व्यर्थ अपव्यय करणार लोक थोडे आहेत काय ?

आपण ज्या सुखांचा उपभोग घेतों तीं सुखें सत्य आहेत किंवा मिथ्या आहेत ह्याचा आपण विचार केला पाहिजे, व जीं मिथ्या सुखें आहेत त्यांचा त्याग केला पाहिजे. पुष्कळ गोष्टी सुख ह्या नांवानें मोडतात एवढ्याच कारणावरून त्या आपण करितों. पण त्यांनाच जर दुसरें कांहीं नांव दिलें तर त्यांचा आपणास तिटकारा वाटेल. कांहीं उपयुक्त काम केल्याशिवाय वेळ घालविणें ह्यांतच कितीएकांस सुख आहे असें वाटतें. जो मनुष्य निरुद्योगी असतो त्याचें "सुखाचें शरीर" आहे, असें म्हणण्याचा परिपाठ आहे. कितीएकांस असें वाटतें कीं सौख्य काय तें पंचेंद्रियांचेंच होय. मानसिक आनंदाची त्यांना कल्पनाच नसते. पण

खरोखर म्हटलें असतां मानसिक सौख्य शारीरिक सुखापेक्षां अधिक सरस आणि टिकाऊ असतें.

आपण आपल्या शरीराची हयगय करितों. कधीं कधीं बेपर्वाईनें शरीरास अपाय करून घेतों. पण शरीर एक वेळ बिघडल्यावर आपल्या हातून काय काम होणार आहे? आपले मानसिक व्यापार सुरळीत चालणें हें देखील शरीराच्या सुस्थितीवर अवलंबून आहे. कलाकौशल्याचे पदार्थ पाहून आपणास किती मौज वाटण्यासारखी आहे! पण मुंबई शहरांतील कितीसे लोक तेथील चित्रशाळा पहाण्यास जात असतील? शास्त्रीय चमत्कारांपासून होणारा आनंद अनुभविण्यास आपण आपल्या अंगीं पात्रता आणीत नाहीं. अजबखाना पहाण्यास जाणारे कितीसे लोक असतील? व तेथील चमत्कारिक वस्तु पाहून खरा आनंद पावणारे कितीसे लोक आहेत? ज्या पृथ्वीवर आपण राहतों व ज्या आकाशाचें आपल्यावर छत आहे, त्यांतील अनंत सुंदर वस्तु व बहुविध चमत्कार ह्यांपासून होणाऱ्या उत्कृष्ट आनंदाचा लाभ आपण घेत नाहीं. संगीताचा आपण बराच उपभोग घेतों. तरी पण ती कला आपल्या देशांत दुर्गुणी लोकांच्या हातीं अधिक गेल्यामुळें संगीताचा आनंद आपणास व्हावा तसा होत नाहीं. आपण मनुष्यें विचारवंत आहों. पशूंना केवळ उपजतबुद्धि मात्र असते. आह्मी त्यांच्यापेक्षां फार श्रेष्ठ आहों असा आह्मी गर्व वाहतों. पण आमच्या विचारशक्तीच्या योगानें आह्मीं मनुष्यजातीच्या सुखांत कितीशी भर घातली आहे

बरें ? कित्येकांच्या मतें तर विचारशक्तीपासून मनुष्यें सुखापेक्षां दुःखच अधिक भोगतात. मनुष्यें व्यर्थ काळ-जीनें झुरणीस लागतात. पण पशु आपणास मुळींच त्रास करून घेत नाहींत. “वाजे पाऊल आपुलें। म्हणे मागें कोण आलें॥” ह्या न्यायानें भलत्याच शंका, भलत्याच प्रकारचें भय, व भलतीच काळजी मनांत आणून मनुष्य आपणास कष्टी करून घेतो. ह्या जगांत पुष्कळ गोष्टींचा आपणास खुलासा होत नाहीं, म्हणून त्याबद्दल विनाकारण त्रासून उपयोग नाहीं.

चिंतेनें आपणास व्यापून घेणें जरी इष्ट नाहीं, तरी पण अगदींच बेफिकीर रहाणें हेंहि चांगलें नाहीं. आपण नेहमीं सावधगिरीनें वागलेंच पाहिजे. ज्या कामांत आपल्या हातून मुळींच चूक होणार नाहीं अशी खातरी आहे त्यांत देखील सावधपणा ठेविला पाहिजे. लॉर्ड चेस्टरफील्ड म्हणतो, “आपल्या सद्गुणांचा उपयोग करण्यांतच जास्त खबरदारी ठेवण्याची जरूर असते. दुर्गुण टाळण्यास तेवढ्या सावधपणाची जरूर नाहीं. कारण दुर्गुणाचें खरें स्वरूप इतकें ओंगळ आहे कीं तें पहातांच आपणास त्याची किळस वाटण्यासारखी आहे. परंतु दुर्गुण बहुधा सद्गुणाचें सोंग घेत असतो व म्हणूनच आपण त्याच्या मोहांत पडतों.” आपल्या सर्वांच्या पहाण्यांत असे पुष्कळ लोक येतात कीं त्यांच्यामध्यें बरेच चांगले गुण असून ते हळूहळू निर्दय आणि पाषाणहृदयी बनतात. लार्ड पामर्स्टन ह्याचें असें म्हणणें होतें कीं, “सर्व मुलें जन्मतात तेव्हां चांगलींच असता-

त." ह्या त्याच्या म्हणण्यावर बरीच टीका झाली होती परंतु कसेंहि असलें तरी एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं, कोणीहि मनुष्य पक्का दुष्ट बनावयास बराच काळ लागतो.

" जगांत मनुष्यावर दुर्गुणाचा पगडा बसतो ही मोठी वाईट गोष्ट आहे ह्यांत संशय नाहीं. पण त्यांतल्या त्यांत सुदैवाची गोष्ट ही आहे कीं, आपला मूळचा स्वभाव बदलून आपणास पक्के दुष्ट होण्यास बराच अवकाश लागतो व बरीच खटपट करावी लागते. आपण सद्गुणांपासून पतन पावतो पण आकाशांतील उल्कांप्रमाणें आमचा अधःपात एका क्षणांत होत नाहीं. "[1]

आतां व्यक्तीला क्षणभर सोडून एकंदर मनुष्यजातीकडे वळलें असतां किती असंख्य सुखसाधनांची हेळसांड आपणाकडून होत आहे हें दिसून येईल. न्यूटन ह्यानें आपल्या सर्व शोधांअंतीं आपल्या अज्ञानाविषयीं जे उद्गार काढले, तेच उद्गार हल्लीं देखील मनुष्यजातीस लागू पडण्यासारखे आहेत. आपण सर्व मनुष्यें समुद्रकिनाऱ्यावर खेळणाऱ्या लहान मुलांप्रमाणें आहोंत. मुलांना जशी एकादी चकचकीत शिंप सांपडावी किंवा समुद्रांतील एकादी चमत्कारिक वनस्पति भरतीच्या वेगानें किनाऱ्यास लागलेली सांपडावी, तद्वत् आह्मांस आजपर्यंत लागलेल्या शोधांची स्थिति आहे. पण ज्ञानाचा जो अफाट महासागर तो आह्मापुढें तसाच असून त्यांतील अनंत अमोलिक रत्नांचा शोध अद्यापि झालेला नाहीं. असा एकहि पदार्थ नाहीं कीं ज्याचे एकंदर गु-

[1] सर टी. बाउन्.

णधर्म आपणांस कळले आहेत. आपण निर्वाहाकरितां रात्रंदिवस खपतों. पण सृष्टींतील निरनिराळ्या शक्ति व जड पदार्थांचे गुणधर्म हे हल्लीं आपणांस कळतात त्याहून जरा जास्त कळतील तर आपल्या निर्वाहाची योग्य सामग्री एक दोन तासांच्या श्रमानें मिळवितां येईल, आणि आपल्या मनाची उन्नति व गुणांचा विकास करण्यास आपणांस हवी तेवढी फुरसद सांपडेल. वाफेच्या शक्तीचा उपयोग जेवढा होण्यासारखा आहे तेवढा अद्याप आपणांस करून घेतां येत नाहीं. विजेचा उपयोग आपल्या बाळपणांत फारसा ठाऊक नव्हता; व हल्लीं नुकता कोठें समजूं लागला आहे. नद्यांच्या जलौघाची शक्ति अजून बहुतेक फुकट जात आहे. शस्त्रप्रयोगाच्या दुःसह वेदना नष्ट करणारें औषध जर पूर्वींच सांपडलें असतें तर किती मनुष्यांच्या व जनावरांच्या यातना चुकल्या असत्या! अशा प्रकारचीं उदाहरणें देऊं लागल्यास एक मोठा स्वतंत्र ग्रंथ होईल. ह्यावरून आणखी लक्षावधि शोध होण्यासारखे आहेत ह्याबद्दल कोणाला शंका वाटणार नाहीं. व ते शोध कदाचित् आपल्या नजरेच्या आटोक्यांतले देखील असतील. ह्याप्रमाणें ज्ञानाच्या महासागराचें मंथन करणें हें जें सर्व जगास अत्यंत कल्याणकारक काम, तें तसेंच पडून राहिलें आहे. असें असून जीं राष्ट्रं आपणांस ख्रिस्तानुयायी म्हणवितात तीं एकमेकांचा नाश करण्यांत व जमिनीसाठीं पशूंप्रमाणें झगडण्यांत अगणित द्रव्याचा चुराडा करितात हें मोठें आश्चर्य नव्हे काय?

मागच्या पिढीच्या वेळीं मुलांस लिहिणें वाचणें शिकविण्याची जरूर आहे असें लोकांस वाटत नसे. व हल्लीं देखील शेंकडा ९० मुलांस लिहितां वाचतां येत नाहीं. असें असून शिक्षण फार होत आहे अशी ओरड करणारे लोक आहेतच. ह्या ओरड करणारांपैकीं कांहींच्या म्हणण्याचा खरा भावार्थ असा असतो कीं जें शिक्षण मिळतें तें लोकांच्या स्थितीस अनुरूप असें नाहीं. हें म्हणणें कांहीं अंशीं खरें आहे. कांहीं लोकांस मुलांच्या शिक्षणार्थ खर्च करावासा वाटत नाहीं. पण त्यांना असें समजत नाहीं कीं अज्ञानापासून होणाऱ्या नुकसानीपुढें शिक्षणाचा खर्च कांहींच नाहीं. हल्लीं बहुतेक मुलांस शिक्षण मिळण्याची सोय झाली आहे. परंतु शिक्षणपद्धति ज्या प्रकारची असावी त्या प्रकारची नाहीं एथें ह्या विषयासंबधानें विशेप चर्चा करणें अप्रासंगिक होईल. परंतु एवढें तरी सांगणें जरूर आहे कीं, आमच्या शाळांमधून नैतिक शिक्षणाची अगदीं हयगय होते. ह्यामुळें कांहीं वाईट परिणाम झाले आहेत. उदाहरणार्थ कित्येकांची अशी कल्पना झालेली दिसते कीं " नीतिविरुद्ध कांहीं आचरण घडल्यास तें अयोग्य आहे हें खरें, व त्यापासून कदाचित् इतर लोकांस त्रास होईल; पण तें करणारास निदान ह्या जन्मांत तरी अधिक सुखाचा व समृद्धीचा लाभ होईल. त्याचप्रमाणें विषयासक्ति, अनियमित वर्तन, लोभ, आलस्य इत्यादि दुर्गुण कितीहि निंद्य असले तरी त्यांपासून फार झालें तर इतर मनुष्यांचें नुकसान होईल, पण

आपली स्वतःची तरी चैन होईल. कोणालाहि काय, आपल्या स्वतःपुरतें पाहिलें असतां सुख आणि स्वस्थता ह्यांशिवाय दुसरें काय पाहिजे? सद्वर्तन, परोपकार इत्यादि गोष्टी फार चांगल्या व प्रशंसनीय असतील, पण त्यांच्यासाठीं आपणास सभ्य प्रकारच्या मौजा देखील टाकून द्याव्या लागतील, व सारा जन्म स्वार्थत्यागांतच घालवावा लागेल."

( श्लोक )

वृथा चिंताडोहीं अहह बुडुनि नित्य खपणें ।
वृथा गोपवृत्ती धरुनि लघु कर्मेंहि करणें ॥
वृथा वाग्देवीची अनवरत सेवा, वद खरें ।
प्रियें संगें कुंजीं बसुनि रमणें श्रेष्ठ न बरें? ॥ १*

पण खरोखर पाहिलें असतां, ही त्यांची कल्पना किती मिथ्या आहे बरें! दुर्गुणापासून मनुष्यास स्वतंत्रता व स्वस्थता मिळते हें म्हणणें अगदीं खोटें आहे. एवढेंच नाहीं तर, दुर्गुणी मनुष्यास ज्या धन्यांच्या गुलामगिरींत रहावें लागतें त्यांसारखे दुष्ट धनी त्रिभुवनांत नसतील. हे धनी कोण म्हणाल तर त्याचेच अंतःकरणांतील काम दिक षड्रिपु हे होत.

तसेंच कितीएक तरुण लोकांस असें वाटतें कीं, दुर्व्यसन हें पुरुषार्थाचें लक्षण आहे. पण तसें म्हणावें तर अगदीं दुबळे आणि मूर्ख लोक देखील दुर्व्यसनी असूं शकतात. खरोखर म्हटलें तर सद्गुणी होण्यासच पुरुषार्थाची जरूर आहे. सद्गुणी मनुष्यच खरोखर स्वतं-

---

* मिल्टनचें लिसिडस् नामक काव्य

त्र असतो. दुर्व्यसन म्हणजे गुलामगिरीच होय. ज्या वर्तनाच्या योगानें मनुष्याची अवनति होते तें वर्तन नीतिविरुद्ध आहे असें आपण म्हणतों. पण असें समजा कीं, लोकांच्या नैतिक कल्पनांमध्यें कांहीं विलक्षण फेरफार होऊन ज्याला आज दुर्वर्तन म्हणतात त्याला उद्यां सद्वर्तन हें नांव मिळालें, तरी त्या वर्तनापासून मनुष्याचें सुख व शांति ह्यांचा नाश पूर्वीप्रमाणें होणारच. म्हणून अमुक एक प्रकारचें वर्तन मनुष्याची अवनति करितें, ह्याचें कारण त्याला लोक दुर्वर्तन म्हणतात हें नव्हे; तर उलट पक्षीं तें वर्तन अवनति करणारें असतें म्हणून त्याला दुर्वर्तन म्हणतात.

दुःख आणि दुराचरण ह्यांचा निकट संबंध आहे असें दाखविणारीं वचनें धर्मग्रंथांमध्यें पुष्कळ आहेत. पण ह्या विषयावर लौकिक व्यवहारांत निष्णात अशा एका मनुष्याचें मत दिलें असतां अधिक प्रासंगिक होईल असें वाटतें. लार्ड चेस्टरफील्ड ह्यानें आपल्या मुलास पाठविलेल्या एका पत्राच्या शेवटीं म्हटलें आहेः—" माझ्या मुला, सद्गुणापासून मोठमोठे लाभ होतात. व जर तुला मोठेपणा व सुजनता मिळवावयाची असतील तर तूं सद्गुणी मनुष्यांचा कित्ता वळीव. तोच सुखप्राप्तीचा खरा मार्ग आहे. "

प्रसिद्ध फ्रेंच तत्त्ववेत्ता डेकार्ट ह्यानें आपल्या वर्तनासंबंधानें चार नियम केले होतेः—पहिला, ज्या धर्मांत व ज्या कायद्यांच्या अमलाखालीं आपण लहानाचे थोर झालों तो धर्म व ते कायदे पाळणें. दुसरा, जेव्हां

कोणतेंहि कृत्य करण्याचा प्रसंग येईल तेव्हां चांगला विचार करून ताबडतोब तें करणें, व परिणामाबद्दल खंती न बाळगणें. तिसरा, आपल्या इच्छा तृप्त करण्याचा प्रयत्न न करितां त्यांचें दमन करणें ह्यांतच सौख्य समजणें. चौथा, सत्यशोधन हा आपला नित्यव्यासंग समजून त्यांतच सारा जन्म घालविणें.

लिली ह्यानें आपल्या एका ग्रंथांत उपदेश केला आहे:-" रात्रीं लवकर निजावें आणि पहांटेस पक्षी उठतात तेव्हां उठावें. आनंदी वृत्ति ठेवावी पण विनय सोडूं नये. गंभीरपणानें वागावें पण अगदींच उदास होऊं नये. धैर्य धरावें पण अविचारी होऊं नये. आपला पोषाख नीटनेटका ठेवावा. आहार परिमित व पथ्यकर असा ठेवावा. आपलें मनोरंजनाचे विषय अपायकारक नसावे. कारणावांचून कोणावर विश्वास ठेवूं नये व अविश्वासहि धरूं नये. त्याचप्रमाणें अंधपणें ज्याच्या त्याच्या तंत्रानें वागूं नये.* आपल्याच मतासंबंधानें विनाकारण दुराग्रह धरून बसूं नये. देवाची सेवा करावी. देवास भिऊन वागावें. देवावर भक्ति ठेवावी म्हणजे तो आपलें कल्याण केल्यावांचून राहणार नाहीं."

जे लोक अविचारी, दुष्ट आणि स्वार्थपरायण असतात ते आपलें काल्पनिक हित साधण्याच्या नादांत स्वतःस व दुसऱ्यांस असुखी करतात यांत मोठेंसें नवल नाहीं. पण पुष्कळ सन्मान्य लोक व ग्रंथकार ह्यांचे

* मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः । कालिदास
**भावार्थः**—मूर्ख मनुष्य दुसऱ्याच्या तंत्रानें वागतो.

ह्यातूनहि जाणून बुजून नव्हे पण चुकीनें अशा प्रकारचे परिणाम होतात; असें सांगितलें तर कितीएकांस कदाचित् आश्चर्य वाटेल. त्यांनीं पापयुक्त जीवित हेंच सुखमय जीवित असें वर्णन केलें आहे. त्यांनीं सद्गुणास स्वार्थत्याग हें नाव दिलें आहे; आणि तापसवृत्तीलाच धर्म ही सञ्ज्ञा दिली आहे. ह्यामुळें त्यांच्या उपदेशांचा असा अर्थ होतो कीं, ज्यांना सद्गुणी, पुण्यवंत आणि धर्मनिष्ठ व्हावयाचें असेल, त्यांनीं ह्या जगांत सुख म्हणून भोगतां कामा नये; पण दुःख मात्र सोसलें पाहिजे. अशा प्रकारच्या उपदेशामुळें लक्षावधि लोक पुण्यप्राप्तीसाठीं म्हणून शरीरास नानाप्रकारें दंडितात व अनेक प्रकारच्या यातना भोगतात. धर्माच्या नांवानें जगांत अगणित लोकांचा छळ झालेला आहे, व हजारों लोकांचे जीव बळी पडले आहेत. ज्या लोकांनीं हा छळ केला ते धर्मनिष्ठ होते, सदय अंतःकरणाचे होते, व सुस्वभावी होते. पण धर्माच्या संबंधानें त्यांच्या कल्पना अगदीं चुकीच्या होत्या. हल्लीं देखील नेहमीं आपल्या पहाण्यांत कांहीं सन्मान्य लोक येतात; त्यांचें असें मत असतें कीं ज्या ज्या गोष्टी सुखप्रद आहेत त्या त्या नीतिविरुद्ध असल्याच पाहिजेत. त्यांच्या मतें धर्माचें स्वरूप कुब्जेप्रमाणें वांकडें, दुर्मुखलेलें व उदासीन असें आहे. ह्या सृष्टीमध्यें आनंददायक, सुखकर, सुंदर आणि रमणीय अशा ज्या ज्या वस्तु आहेत त्या त्या इष्ट नसून अनिष्ट आहेत. त्या वस्तु म्हणजे आम्हांस आनंद आणि सुख व्हावें म्हणून त्या कल्याणनिधान परमेश्वरानें

दिलेल्या सर्वोत्कृष्ट देणग्या नव्हत; तर पड्रिपूंनीं आह्मांस पकडण्यासाठीं पसरलेले ते कपटपाशच आहेत.

( आर्या )

दुःखाचा लवलेशहि जेथें ठाउक नसे असा स्वर्ग ॥
साधाया खचित नसे दुःखपथाविण जनीं दुजा मार्ग ॥ १

—कूपर

आतां ही गोष्ट खरी आहे कीं, ह्या संसारांतून मार्गक्रमण करीत असतांना आपणास दुःखाचे प्रसंग कधीं ना कधीं यावयाचेच. पण ज्याप्रमाणें ऊन आहे तेथे सावली असतेच, त्याप्रमाणें सुख आहे तेथे दुःख असावयाचेंच. आयुर्मर्यादेमुळें आपल्या इष्टमित्रांच्या वियोगाचें आपणां सर्वांस भोगावें लागणारें दुःख अपरिहार्यच आहे. पण त्याखेरीजहि दुसरीं पुष्कळ दुःखें भोगावीं लागतात व तीं भोगावीं लागणें साहजिकच आहे. ह्याचें कारण एक तर असें आहे कीं, आपल्या जीविताचा अनेक गोष्टींशीं संबंध आहे, व ज्ञानासंबंधानें जग अद्यापि बाल्यावस्थेंतच आहे. आपल्या जीवितरक्षणाचीं सर्व साधनें अद्याप आपणांस कळलेलीं नाहींत. आपल्या सभोंवतालच्या पदार्थांचें व शक्तींचें स्वरूप आणि गुणधर्म आपणांस पूर्णपणें अवगत झाले नाहींत. अशी स्थिति आहे तोंपर्यंत आपणांस बरींच दुःखें भोगावीं लागणारच. पण कूपर कवीच्या वर निर्दिष्ट केलेल्या उक्तीप्रमाणें स्वर्गास जाऊं इच्छिणारानें ह्या जगांत दुःखच सोसलें पाहिजे. नाहींतर त्याला स्वर्गप्राप्ति व्हावयाची नाहीं. म्हणजे जो मनुष्य ह्या जगांत सुख भो-

गील, त्याला पुढें यमयातनाच भोगाव्या लागणार असा अर्थ होतो. अशा प्रकारच्या चुकीच्या कल्पनांमुळें पुष्कळ लोकांच्या मनाला विनाकारण त्रास, काळजी, व अस्वस्थता उत्पन्न झालेली आहे. इंग्लंडसारख्या देशांत देखील पुष्कळ तरुण मनुष्यें, आपण आनंद व सुख भोगलें हें पाप झालें असें समजून त्याबद्दल खेद पावतात, व स्वतःस व्यर्थ दोष लावून घेतात. खरोखर म्हटलें तर त्यांना खेद करण्याचें कांहीं कारण नसून उलट असें सुख आपणास प्राप्त झालें, व दुःखानें आणि रोगानें गांजलेल्या लोकांस आनंदी करण्याची अमोलिक शक्ति आपणांमध्यें आहे, ही ईश्वराची मोठी कृपा आहे, असें त्यांनीं समजलें पाहिजे. आपल्या हिंदुस्थान देशांत तर अशा विचारांची प्रवृत्ति पुष्कळच आहे. हें जग म्हणजे केवळ मिथ्या आहे; आपलीं बायकामुलें वगैरे आपले कोणी नव्हत; संसार असार आहे; संसारांत कांहीं सौख्य नाहीं; अशा प्रकारच्या कल्पना संस्कृत व मराठी ग्रंथांत जागोजाग आढळतात. त्याच कल्पनांच्या अंमलाखालीं आपल्या देशांत अनेक लोक घरदार व संसार सोडून संन्यास व अरण्यवास पतकरीत आले आहेत. ह्या मार्गाला निवृत्तिमार्ग असें म्हणतात. ह्या निवृत्तिमार्गाचा अतिरेक होऊं लागला म्हणून भगवद्गीतेमध्यें प्रवृत्तिमार्ग व निवृत्तिमार्ग ह्यांचा मेळ घालून दिला आहे.

( श्लोक )

नकर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ॥

नच संन्यसनादेव । सिद्धिं समधिगच्छति ॥ १
नियतं कुरु कर्म त्वं । कर्म ज्यायो ह्यकर्मणः ॥
शरीरयात्रापि च ते । न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ २
कर्मेंद्रियाणि संयम्य । य आस्ते मनसा स्मरन् ॥
इंद्रियार्थान् विमूढात्मा । मिथ्याचारः स उच्यते ॥ ३
यस्त्विंद्रियाणि मनसा । नियम्यारभतेऽर्जुन ॥
कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ४

**भावार्थः—**

( आर्या )

नैष्कर्म्य तो न पावे, कर्मांचा जो करी अनारंभ ॥
केवळ संन्यासाने पुरुषास न मुक्तिचा समारंभ ॥ १

( श्लोक )

कर्मत्यागाहुनी कर्म । श्रेष्ठ ते नित्य तूं करीं ॥
देहनिर्वाह हि तुझा । न घडे कर्म टाकितां ॥ २

**—वामन**

( आर्या )

कर्मेंद्रियांसि दमुनी, विषय स्मरतो मनामधें मूढ ॥
म्हणती त्यातें ज्ञानी मिथ्याचारी सदा महामूढ ॥ ३

( श्लोक )

अर्जुना इंद्रियांतें जो । मनें करुनि आंवरी ॥
कर्मेन्द्रियें कर्मयोग । करी निष्काम थोर तो ॥ ४

**—वामन**

निवृत्तिमार्गालाच अनुलक्षून तुकाराम बोवांचा खालील अभंग आहे.—

नको त्यजूं क्रियापोर । बांधी सोपे माझ्या घर ॥
आल्या अतीथा आदर । याहुनि धर्म कोणता ॥ १

आपण ह्या जगांत कोठून आलों, कोठें जाणार, वगैरे प्रश्न फार गूढ आहेत. त्या प्रश्नांचीं उत्तरें आपणांस मिळत नाहींत, म्हणून मनाचा संताप करून घेणारे पुष्कळ लोक आहेत. पण जे साधु आणि शहाणे आहेत ते असें कधीं करीत नाहींत. कधीं त्यांना ह्या जगांतील लोकांच्या दुराचरणाबद्दल राग येत असेल, व कधीं लोकांच्या दैन्यावस्थेबद्दल कींव येत असेल. पण ज्यांनीं म्हणून ह्या जगांत आपलें कर्तव्य बजाविलें आहे त्यांना आपल्या स्थितीबद्दल कधींहि असंतोष वाटत नाहीं.

( आर्या )

ईश दयामय आहे ऐसें वाटे सुनिश्चयें ज्याला ॥
त्यालाच ह्या जगाचा कळला गूढार्थ, तो न अन्याला ॥

—व्हिटियर

सेनेका म्हणतो " जगांत असें एकहि कर्तव्य नाहीं कीं, जें केल्यानें मनुष्यास आनंद प्राप्त होणार नाहीं. त्याचप्रमाणें दुराचरणास प्रवृत्त करणारा असा एकहि मोहपाश नाहीं कीं, जो मनुष्यास तोडतां येणार नाहीं. "

मिल्टन् कवीनें म्हटलें आहे:—

( आर्या )

निंदूं नको विधीला, त्यानें कर्तव्य आपुलें केलें ॥
तूं आचरी स्वधर्मा, ह्याहुनि कांहीं दुजें नसे उरलें ॥ १

सृष्टीपासून आह्मां मनुष्यांस आनंद व्हावा असाच सृष्टिकर्त्याचा हेतु स्पष्ट दिसतो. कारण, तसा हेतु नसता तर त्यानें ही सृष्टि सौंदर्यमय आणि संगीतपूर्ण

केली आहे तशी केली नसती. तेंव्हां मिल्टननें म्हटल्या-प्रमाणें सृष्टिकर्त्यानें आमच्याकरितां जें करावयाचें तें केलें आहे. आपण सन्मार्गानें वागून आपलें कर्तव्य करणें व तसें करून आपणा स्वतःस अनुपम आनंदाचा लाभ करून घेणें व आपल्या इष्टमित्रांस शांतीचा लाभ करून देणें हें काम आपलें आहे.

हल्लींच्या काळांत जेवढे शोध लागले आहेत, व जे चमत्कार दृष्टीस पडतात व जी प्रगति झाली आहे, तशी पूर्वीं कधींहि नव्हती. अशा काळांत आपला जन्म झाला हें आपलें भाग्य समजलें पाहिजे. त्याबद्दल गर्व वाहण्याचें कांहीं कारण नाहीं, तर देवाचे उपकार मानले पाहिजेत.

ईश्वरानें दिलेल्या असंख्य देणग्यांचा अव्हेर न करितां आपण संतोषानें व कृतज्ञतेनें त्यांचा पूर्ण उपभोग घेणें हेंच योग्य आहे. पण आपणास दुःखाचे व काळजीचे प्रसंग कधींच येऊं नयेत, अशी आशा करणें व्यर्थ आहे. वालपोल् ह्यानें म्हटलें आहे कीं, " विचारशील लोकांना संसार हा हास्यरसप्रधान नाटकाप्रमाणें भासतो. आणि विकारवश लोकांना शोकरसप्रधान नाटकाप्रमाणें भासतो." खरोखर म्हटलें तर संसारांत शोकाचे प्रसंग फार थोडे व आनंदाचे प्रसंगच फार असतात. आणि संसार सुखमय किंवा दुःखमय होणें हें बऱ्याच अंशीं मनुष्याच्या स्वतःच्या वर्तनावर अवलंबून असतें.

( श्लोकार्ध )

सुखस्य दुःखस्य न कोपि दाता । परो ददातीति कुबुद्धिरेषा ॥

—अध्यात्म रामायण

**भावार्थः**—सुख आणि दुःख हीं दुसऱ्यापासन प्राप्त होतात ही कल्पना अगदीं मिथ्या आहे.

साक्रेटीस् ह्याचें तर असें म्हणणें आहे कीं, " जो खरा साधु आहे त्याला, जिवंतपणीं किंवा मरणानंतर देखील, कांहीं विपत्ति प्राप्त होत नाहीं. "

( श्लोक )

या विवेकविकासिन्यो । मतयो महतामिह ॥
न ता विपदि मज्जंति । तुंबकानीव वारिणी ॥ १

—योगवासिष्ठ

**भावार्थः**—ज्याप्रमाणें भोपळे पाण्यांत बुडत नाहींत त्याप्रमाणेंच विवेकवान् मनुष्यें विपत्तीच्या प्रसंगी शोकसागरांत बुडत नाहींत,

कसेंहि असलें तरी संसार कष्टमय आहे म्हणून सांगणाऱ्या साधुसंतांपेक्षां तो सुखमय आहे असें सांगणाऱ्या साधुसंतांचेंच म्हणणें अधिक खरें आहे. पण आपण काय करितों कीं, सुखामध्यें वर्षांचीं वर्षें जातात त्याचा मुळींच विचार करीत नाहीं; पण दुःखामध्यें जो अल्पकाळ जातो त्याचा मात्र ध्यास लावून घेतों. आपले सर्वच प्रयत्न सफल होतील अशी आशा करूं नये. सृष्टिनियमाचे व्यापार देखील कधीं कधीं बिनचूक घडत नाहींत. मग आपली काय कथा? पण "आरोग्य, बल आणि संपत्ति ह्यांची अनुकूलता असेल तेव्हां

मदोन्मत्त होऊं नये. तसेंच, विपत्ति आली असतां धैर्य सोडून निराश होऊं नये."

कित्येकांना असें वाटतें कीं, सन्मार्ग फार बिकट आणि त्रासदायक आहे; आणि कुमार्ग फार सोपा आणि रमणीय आहे. पण ज्यांना चांगलें शिक्षण मिळालें आहे त्यांना सन्मार्गच सुलभ आणि रमणीय वाटतो, व कुमार्गाविषयीं त्यांना फार तिरस्कार वाटतो. सन्मार्ग आवडणें किंवा कुमार्ग आवडणें हें बऱ्याच अंशीं संवयीवर अवलंबून आहे. म्हणून लहानपणापासून सन्मार्गाकडे मन वळविण्याची संवय ठेविली पाहिजे.

तथापि अनीतीचे कित्येक प्रकार सकृद्दर्शनीं फार मोहक दिसतात व त्यांपासून क्षणमात्र सुखाचा अनुभवहि येतो, ही गोष्ट कबूल केलीच पाहिजे. आणि पुष्कळ लोकांचें कुमार्गांत पाऊल पडतें त्याचें हेंच कारण आहे. पण जे लोक अशा मोहांत पडतात त्यांना एक क्षणभर सुख वाटेल, पण पुढें दीर्घकालपर्यंत दुःख भोगावें लागेल. राईएवढा लाभ होईल, पण पर्वताएवढी हानि होईल. त्यांनीं एका मेजवानीकरितां आपली सर्व मिळकत विकल्यासारखें होईल. सारांश, ह्या जगापुरतीच ज्यांची नजर आहे त्यांना देखील सुख पाहिजे असेल तर त्यांनीं सन्मार्गानेंच वागलें पाहिजे. आत्मनिग्रहानें जेवढें सुख प्राप्त होईल त्याचा लक्षांशहि स्वैरवर्तनापासून होणार नाहीं.

संपत्ति आणि सुख हीं नेहमीं एकत्र असतातच असें

१ आलफ्रेड धि ग्रेट

नाहीं. सुखाचीं सर्व साधनें अनुकूळ असतांहि पुष्कळ लोकांची स्थिति अगदीं बापुडवाणी दिसण्यांत येते. नशिबानें पुष्कळ दिलें तरी त्यापासून संतोष होणें हें मनाच्या स्वाधीन आहे.

( अभंग )

मन करा रे प्रसन्न । सकलसिद्धीचें कारण ॥
मोक्ष अथवा बंधन । सुखसमाधान इच्छा ते ॥
चित्त समाधाने । तरी विष वाटे सोनें ॥
चित्ताच्या तळमळें । चंदनेंहि अंग पोळे ॥ २

—तुकाराम

संपत्ति, अधिकार, आणि मानमरातब ह्या गोष्टी सर्वांसच साध्य नाहींत. सौजन्य, औदार्य आणि शहाणपणा हे गुण प्रत्येकास जोडितां येण्यासारखे आहेत. मनुष्याच्या मिळकतीपेक्षां त्याच्या आंगचे गुण हीच त्याची खरी संपत्ति समजली पाहिजे. " संसार हें एक नाटक आहे. मनुष्यें त्यांतील नट आहेत. राजा, प्रजा, श्रीमंत, गरीब, इत्यादि त्यांतील निरनिराळ्या भूमिका आहेत.* हें आयुष्य संपल्यावर हें नाटक बंद होईल, व एथील नाटकी पोषाक काढून टाकावा लागेल. मग दरएक मनुष्याच्या बऱ्या-वाईट कर्मांचा निवाडा होईल. श्रीमंती, अधिकार, मोठेपणा, वगैरे गोष्टी त्या-

१ सट क्रिस्टोम

( श्लोक )

* एकदां तरुण, बाल एकदां । भाग्यवंतहि अभाग्य एकदां ॥
एकदां जरठ जाय सत्वरी । धर्मराजसदना नटापरी ॥ १

—वामन

त्याबरोबर येणार नाहींत." त्या निवाड्याच्या वेळीं आपलीं कर्में चांगलीं ठरतील असें आपण आचरण ठेविलें पाहिजे.

( श्लोक )

धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे । भार्या गृहद्वारि जनः स्मशाने ॥
देहश्चितायां परलोकमार्गे । कर्मानुगो गच्छति जीव एकः ॥ १

—भर्तृहरि

भावार्थः—

( श्लोक )

व्रजांत धेनू धन तें निधानीं । स्त्री मंदिरीं बंधुजन स्मशानीं ॥
चितेंत काया, परलोकपंथें । जीवासवें कर्मचि एक जातें ॥ १

आपल्या कर्मांचा निवाडा कोणत्या तत्त्वावर होईल बरें? आम्हीं किती कामें केलीं याचा विचार व्हावयाचा नाहीं, तर आम्हीं किती प्रयत्न केला ह्याचा विचार होणार. जगांत आम्हीं यशस्वी झालों कीं नाहीं हें पाहण्यांत येणार नाहीं; तर यशस्वी होण्याची आमची योग्यता होती किंवा नाहीं ह्याचा विचार होईल.

( श्लोक )

कर्मण्येवाधिकारस्ते । मा फलेषु कदाचन ॥
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोस्त्वकर्मणि ॥ १

—भगवद्गीता

**भावार्थः**—कर्तव्य करावें एवढाच मानवाचा अधिकार आहे. त्या कर्तव्याच्या फलाविषयीं त्यानें आसक्ति ठेवूं नये, व कर्तव्य करण्यास कधींहि चकूं नये.

( अभंग )

धन्य तोचि प्राणी क्षमा ज्याचे अंगीं । न भंगे प्रसंगीं धैर्यबळ ॥

न म्हणे कोणासी उत्तम वाईट । महत्त्व वरिष्ठ जेथे नसे ॥ १
अंतरीं सबाह्य सारिखें निर्मळ । हृदय कोमळ गंगारूप ॥
तुका म्हणे काया कुरवंडीन तया । ठेवीन मी पायां मस्तक हें ॥२

—तुकाराम

खरें सुख मिळण्याकरितां आपण शहाणपणानें व सन्मार्गानें वागलें पाहिजे. कुमार्गानें वागून व विषयासक्त होऊन सुख मिळणार नाहीं. सारांश, सद्गुण हेंच खरें स्वार्थसाधन आहे व अनीति हाच खरा स्वार्थनाश आहे.

( श्लोक )

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते । कार्याकार्यव्यवस्थितौ ॥
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं । कर्मकर्तुमिहार्हसि ॥ १

—भगवद्गीता

भावार्थः—

( आर्या )

कार्याकार्य विचारीं यास्तव शास्त्र प्रमाण तुज ताता ॥
जाणुनि शास्त्रविधीतें कर्म करायासि योग्य हो आतां ॥ १

( ओवी )

जो दुसऱ्याचें अंतर जाणे । देश काल प्रसंग जाणे ।।
तया पुरुषा काय उणें । भूमंडळीं ।। १

—रामदास

# प्रकरण २

## व्यवहारचातुर्य

संसारांत मनुष्याला यश येण्यास बुद्धीपेक्षांहि धोरण असण्याची फार जरूरी आहे. पण ज्यांच्या अंगीं हा गुण स्वभावतःच नसतो त्यांना तो सुलभ रीतीनें प्राप्त होण्याजोगा नाहीं. तथापि अमुक अमुक प्रसंगीं दुसऱ्या मनुष्यास काय आवडण्याचा संभव आहे ह्याचा विचार करण्याची संवय ठेविली असतां धोरण हा गुण मनुष्यास कांहीं अंशीं मिळवितां येईल.

दुसऱ्यांना संतुष्ट करण्याची संधि मिळाल्यास ती कधीं व्यर्थ दवडूं नये. सर्वांशीं सौजन्यानें वागणें आपणास अत्यंत आवश्यक आहे. सौजन्यानें वागण्यापासून आपलें कांहीं खर्च होत नाहीं, पण आपणास सर्व गोष्टी प्राप्त होतात. ज्या गोष्टी निवळ द्रव्यानें प्राप्त होण्यासारख्या नाहींत त्या सौजन्यानें सहज प्राप्त होतात. म्हणून ज्या ज्या मनुष्याशीं आपला संबंध येईल, तो तो मनुष्य आपलासा करून घेण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. बर्ले हा एकदां एलिझाबेथ राणीस म्हणाला कीं "आपण लोकांचीं अंतःकरणें आपणाकडे ओढून घेतलीं म्हणजे त्यांचीं मनें व धनें हीं आपणास सहज साध्य होतील."

ज्या ठिकाणीं शक्तीचा कांहीं उपयोग होत नाहीं त्या ठिकाणीं धोरणानें काम करून घेतां येतें.

( श्लोकार्ध ).

उपायेन हि यत्कुर्यान्न तच्छक्यं पराक्रमैः ॥

—हितोपदेश

भावार्थः—युक्तीनें जें कार्य होईल तें पराक्रमानेंहि होणार नाहीं.

सूर्य आणि वायु ह्यांच्या गोष्टीचें देखील तात्पर्य हेंच आहे. ती गोष्ट अशी कीं, एकदां सूर्य आणि वायु ह्यांच्यामध्यें मोठा कोण अशाबद्दल भांडण लागलें. तेव्हां एक मनुष्य रस्त्यानें चालला होता त्याच्या आंगावरची घोंगडी जो उडवील तो मोठा असें ठरलें. नंतर वायूनें मोठा जोर करून घोंगडी उडविण्याचा यत्न केला. परंतु वारा जसजसा सोसाट्यानें वाहूं लागला तसतशी त्या मनुष्यास थंडी लागून तो आपली घोंगडी आपल्या अंगाभोंवतीं घट्ट गुंडाळून घेऊं लागला. नंतर सूर्यानें आपल्या किरणांनीं त्याची थंडी नाहींशी करून त्याच्या अंगांत उष्णता आणिली. तेणेंकरून त्या मनुष्यानें आपली घोंगडी फेंकून दिली आणि आंगरखाहि काढून टाकला. वायूनें हा प्रकार पाहून सूर्य मोठा आहे असें कबूल केलें.

ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवावी कीं, मनुष्य गोडीगुलाबीनें जें कांहीं करील तें जुलमानें करणार नाहीं. आणखी केव्हां झालें तरी मनुष्यावर सक्ति न करितां त्याला खुष ठेवून त्याजकडून काम करून घ्यावें. शेक्सपिअर कवीनें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं,

(ओंवी)

खड्गानेंही मान कापितां । जें कृत्य न करी मानव सर्वथा ॥
तेंही करील तो तत्वता । स्मितवदनें संबोधितां ॥ १

राजनीतीचा असा एक उत्कृष्ट नियम आहे कीं, " राजानें प्रजेवर करडा अंमल गाजविण्याचा यत्न सह‌सा करूं नये. "

ज्या ज्या मनुष्याशीं आपला संबंध जडेल त्याचा आपणावर विश्वास बसावा, व त्याच्या विश्वासास आपण पात्र व्हावें अशा रीतीचें वर्तन ठेवावें. पुष्कळ लोकांचें जें वजन असतें त्याला त्यांच्या हुशारीपेक्षां त्यांची इभ्रत हीच विशेषतः कारणीभूत असते. फ्रान्सिस् हॉर्नर ह्या नांवाचा एक गृहस्थ होता. तो एकाद्या मोठ्या हुद्यावर नसूनहि त्याचें सरकारदरबारांत फार वजन असे. त्याच्या संबंधानें सिडनी स्मिथनें म्हटलें आहे कीं, सदाचरणाचे सर्व नियम त्याच्या चेहेऱ्यावर जणूं काय कोरल्याप्रमाणें दिसत होते.

दुसऱ्यांची इच्छा तृप्त करण्याचा यत्न करावा. पण तो शहाणपणानें व रास्त प्रकारानेंच करावा. जेथे नाहीं म्हणण्याची अवश्यकता असेल तेथे नाहीं म्हणण्यास भिऊं नये. 'होय' असें पुष्कळ म्हणूं शकतील पण लोक खुष होतील अशा रीतीनें 'होय' म्हणण्याचें काम सर्वांसच साधत नाहीं. आणि नाहीं म्हणणें तर त्याहि‌पेक्षां कठिण आहे. ज्या ठिकाणीं नाहीं म्हटलें पाहिजे त्या ठिकाणीं नाहीं म्हणण्याचा धीर न झाल्यामुळें पुष्कळ लोक नाश पावले आहेत. 'भीड भिकेची बहीण' अशी आपणांत एक म्हण आहे. प्लूटार्क म्हणतो कीं, एशियामायनरमधील लोकांनीं आपलें स्वातंत्र्य गमावलें ह्याचें कारण योग्य प्रसंगीं त्यांस 'नाहीं'

ह्या शब्दाचा उपयोग करितां आला नाहीं हें होय. म्हणजे स्पष्ट व निर्भीड भाषणाच्या उणीवीमुळें हें इतकें नुकसान झालें. व्यवहारांत नाहीं म्हणणें हें कधीं कधीं जरूर असतें. पण तें दुसऱ्यांस न दुखवितां म्हणतां आलें पाहिजे. आपल्याजवळ कांहीं कामासंबंधानें लोक आले असतां आपल्याशीं व्यवहार करण्यांत त्यांना आनंद वाटेल, व पुनः आपल्याजवळ कामासंबंधानें त्यांना यावेंसें वाटेल, अशा रीतीनें आपण त्यांच्याशीं वर्तन ठेवावें. मनुष्याच्या मनोवृत्तींचा व्यवहाराशीं पदोपदीं किती संबंध येतो हें पुष्कळांस ठाऊक नसतें. आपणास दुसऱ्यांनीं प्रेमानें व आदरानें वागवावें असें प्रत्येकास वाटत असतें. मोकळेपणाची व संतोषकारक वागणूक ठेवल्यानें एकादा सौदा जसा ठरवून घेतां येईल तसा किंमतींत कांहीं फेरफार केल्यानेंहि येणार नाहीं.

आपली वागणूक दुसऱ्यांस संतोषकारक होईल असें करणें हें फारसें अवघड नाहीं.

( ओंवी–अर्ध )

हें आपणाकडेचि येतें । राजी राखणें समस्तांतें ॥ १

—रामदास

" दुसऱ्यांस खुष करण्याचें मनांत असलें म्हणजे तसें करण्याची निम्मे खुबी साधली म्हणून समजावें. "[1] तसेंच ज्याला इतरांस खुष ठेवण्याची मनापासून इच्छा नाहीं, त्याला लोक कधींहि वश होणार नाहींत. हा महत्त्वाचा गुण जर लहान वयांतच संपादन केला नाहीं

१ चेस्टरफील्डचीं आपल्या मुलास पत्रें.

तर पुढें तो आपल्या अंगीं आणण्याचें काम फार कठिण जाईल. अंगांत दुसरा कांहीं विशेष गुण नसतां, फक्त चांगल्या रीतीभातींच्या योगानेंच पुष्कळ लोक जगांत सर्वांचा लोभ संपादन करितात. आणि उलटपक्षीं असेहि पुष्कळ लोक असतात कीं, त्यांच्यामध्यें बरेच चांगले गुण असतात, त्यांचें अंतःकरण उदार असतें, व त्यांचे हेतूहि चांगले असतात; पण फक्त त्यांची लोकाशीं वागणूक दिसण्यांत जराशी आडदांड असल्यामुळें पुष्कळ लोक त्यांचा तिटकारा करितात. लोकांस खुष करितां येत असलें म्हणजे आपलें काम साधतें एवढेंच नाहीं, तर त्यापासून आपल्या मनालाहि एक प्रकारचें सौख्य वाटतें. ह्याचा अनुभव सहज घेतां येण्यांजोगा आहे.

कसाहि प्रसंग असला तरी सावधपणा राखून चित्त शांत ठेवावें. मन उदार असावें. कोणत्याहि व्यवहारासंबंधानें बोलणें करीत असतां चित्ताचा स्थिरपणा व शांतपणा हे गुण फार अमोलिक आहेत. अडचणीच्या व संकटाच्या प्रसंगीं हे गुण असल्यास बहुतकरून आपलें संरक्षण होईल.

आपणापेक्षां कमी हुषार लोक भेटले असतां त्यांचा अवमान करणें योग्य नाहीं. एकादी जिनगी आपणास वारसपणाच्या हक्कानें प्राप्त झाली असतां जसें गर्व मानण्याचें कारण नाहीं, त्याचप्रमाणें आपल्या अंगीं असलेल्या हुषारीबद्दल वृथा अभिमान वाटण्याचें कारण नाहीं. संपत्ति किंवा हुषारी ह्यांचा चांगला उपयोग क-

रण्यांत कायतो खरा मोठेपणा आहे. दुसरें असें कीं, पुष्कळ लोक खरोखर फार हुषार असून ते बाह्यतः तसे दिसत नाहींत, म्हणून ते हुषार नाहींत असें समजणें चुकीचें होईल.

मनुष्याची परीक्षा करण्याचें काम पुस्तकवाचनापेक्षां फार कठिण आहे. एकाद्या मनुष्याच्या स्वभावाची परीक्षा त्याच्या मुद्रेवरून बऱ्याच अंशीं करितां येते. " जेव्हां मनुष्याच्या बोलण्यावरून त्याचा हेतु एक प्रकारचा दिसतो व चर्येवरून दुसऱ्या प्रकारचा दिसतो, तेव्हां अनुभवी लोक चर्येवरून दिसलेलाच हेतु खरा मानितात. "[1]

( श्लोक )

आकारैरेव चतुरास्तर्कयन्ति परेङ्गितम् ॥
गर्भस्थं केतकीपुष्पमामोदेनैव षट्पदाः ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—चतुर लोक दुसऱ्याचें हृद्गत चर्येवरून ओळखतात. पानांमध्यें झांकलेलें केतकीपुष्प भ्रमर हे वासानेंच ओळखतात.

एकाद्या मनुष्यानें आपल्याविषयीं अतिशय प्रेम दाखविलें असतां त्याच्यावर फाजील विश्वास ठेवूं नये. मनुष्यांचें प्रथमच्याच भेटीसरसें एकमेकांवर प्रेम बसत नसतें. म्हणून जर एकाद्या अपरिचित मनुष्यानें आपणाविषयीं अत्यादर दाखविला, किंवा कांहीं मोठी गोष्ट करण्याचें वचन दिलें, तर त्या मनुष्याच्या बोलण्यावर फारसा विश्वास ठेवूं नये. जरी त्याचें बोलणें

१ इमरसन्

कपटाचें नसलें, तरी तो मनांत आहे त्यापेक्षां जास्त बोलून दाखवीत आहे, किंवा त्याच्या मनांत आपणाकडून कांहीं तरी फायदा करून घ्यावयाचा आहे, असें खास समजावें.

( अभंग )

मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥
जैशी वृंदावन कांति । उत्तम धरूं नये हातीं ॥
बक ध्यान धरी । सोंग करून मासे मारी ॥ १

—तुकाराम.

ह्यासाठीं, जो जो मनुष्य मित्रत्व दाखवितो, तो तो आपला मित्रच आहे, असें समजूं नये. तसेंच, क्षुल्लक कारणावरून एकादा मनुष्य आपला शत्रु आहे असें समजूं नये.

आह्मी मनुष्यें विचारी व बुद्धिमान् प्राणी असल्याबद्दल फुशारकी मारितों. पण मनुष्यें नेहमीं विचारानेंच वागतात असें समजूं नये. मनुष्यप्राणी मोठा विचित्र आहे. तो कधीं विचारानें वागतो, पण पुष्कळ वेळां दुराग्रह आणि विकारवशता ह्यांचा त्याच्यावर अंमल चालतो. म्हणून लोकांस आपलेसे करून घ्यावयाचे असल्यास केवळ तार्किक प्रमाणांनीं त्यांची खातरी करून कार्य होत नाहीं, तर त्यांच्या मनोवृत्तीहि वळविल्या पाहिजेत. हा नियम व्यक्तींस लागू आहेच, पण जनसमुदायासंबंधानें तर विशेष लागू आहे.

वादविवाद करण्यापासून कधीं कधीं अनिष्ट परिणाम होतात. त्यापासून मित्रांमित्रांमध्यें उदासीनता व

गैरसमज होण्याचा संभव असतो. वादविवादांत आपण आपल्या मित्रांस जिंकल्यानें त्यांची मैत्री नाहींशी होण्याचा संभव असतो. व तसें झाल्यास एकंदरींत आपला तोटाच होईल. वादविवाद करण्याची जरूर पडेल, तेव्हां ज्या गोष्टी आपणास कबूल असतील त्या कबूल कराव्या. पण अमुक मुद्याकडे तुमचें दुर्लक्ष झालें आहे असें आपल्या प्रतिपक्ष्यास सविनय कळवावें. वादविवाद करतेवेळीं बहुतेक लोकांस आपली चूक कळत नाहीं, व ज्यांना कळते त्यांना ती कबूल करावीशी वाटत नाहीं. बरें, वादविवादांत आपण हरलों असें त्यांना वाटलें तरी त्यांची वादाच्या मुद्यासंबंधानें खातरी होते असें नाहीं. तार्किक प्रमाणांनीं एकाद्याची खातरी करणें बहुधा अशक्य आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. आपले विचार सुबोध रीतीनें व थोडक्यांत त्याला सांगावे. आणि तेणेंकरून त्याचा स्वतःच्या मतावरील विश्वास कांहींसा उडाला तरी पुष्कळ झालें असें समजावें. त्याचें मतांतर होण्याचा तो आरंभ समजावा.

संभाषण चांगल्या रीतीनें करितां येणें ही तरी एक स्वतंत्र कलाच आहे. ज्याच्यापाशीं पुष्कळ ज्ञानसंचय आहे त्याला उत्तम प्रकारें संभाषण करितां येईलच असा नियम नाहीं. चेस्टरफील्ड ह्यानें म्हटलें आहे कीं, " पुष्कळ लोक केवळ पलटणीचे कप्तान असूनहि इतकें उत्तम संभाषण करितात कीं, डेकार्ट अथवा न्यूटनसारख्या तत्त्ववेत्त्याच्या संगतीपेक्षां त्यांचीच सं-

गति मला आवडेल." पण ह्या म्हणण्यांतहि फार अतिशयोक्ति आहे.

चांगल्या प्रकारचें संभाषण करितां येणें जसें अवश्य आहे, त्याचप्रमाणें दुसऱ्याचें भाषण शांतपणें ऐकून घेणें हेंहि महत्त्वाचें आहे. व हें जरी फारसें अवघड नाहीं तथापि फार सोपेंहि नाहीं. दुसऱ्याचें सर्वच भाषण आपण टीकाकार किंवा न्यायाधीश या नात्यानें ऐकून उपयोग नाहीं. उतावळीनें आपलें मत होऊं देतां कामा नये. बोलणाराच्या मनोवृत्तीशीं आपली तद्रूपता ककरावी. दुसऱ्याचें भाषण प्रेमानें व कळकळीनें ऐकलें तर आपली सल्लामसलत घेण्यास लोक वारंवार येतील. पुष्कळ लोकांस काळजीच्या व विपत्तीच्या समयीं आपणापासून साहाय्य होऊन त्यांचें सांत्वन होईल. व आपणांसहि त्यामुळें समाधान वाटेल.

आपण लहान वयांत असतांना आपल्या बोलण्यास फार मान मिळण्याची आशा धरूं नये. त्यावेळीं आपण स्वस्थ बसून दुसऱ्याचें बोलणें ऐकावें, व आपल्यासभोंवतीं काय होतें तें पहावें. " खेळ चालत असतां खेळणारापेक्षां बाहेर उभे असलेल्या लोकांसच खेळ चांगला दिसतो" अशी इंग्रजी भाषेंत एक म्हण आहे. आपल्यासभोंवतीं ज्या गोष्टी चालत असतात त्यांत आपलें कांहीं अंग नसलें, व आपणाकडे कोणाचें लक्ष नसलें, तरी त्या गोष्टी अवलोकन करण्यास आपणास कांहीं अडचण पडते असें नाहीं. उलट असें आहे कीं, कांहीं कांहीं गोष्टी अदृश्यपणानें आपणास पहा-

ण्यास मिळाल्या तर त्यांत फायदाच आहे.

पुष्कळ लोकांस विचार करण्याचा कंटाळा असतो. असे लोक तुमची योग्यता तुम्ही दर्शवाल तीच खरी मानतील. तुमच्या गुणांची खरी परीक्षा करण्यास लागणारी मेहनत त्यांच्यानें होत नाहीं "जगांत आपली किंमत कमी-जास्त होणें हें आपल्या स्वाधीन आहे."

आपण कोणाचें शत्रुत्व संपादन करूं नये; कारण त्यासारखी हानिकारक दुसरी गोष्ट नाहीं.

( ओंवी–अर्ध )

वैर करितां वैरचि वाढे । आपणास दुःख भोगणें पडे ॥

—रामदास

"मूर्ख मनुष्यास मूर्खासारखाच जबाब देऊं नये, नाहींतर तुम्ही त्याच्याप्रमाणेंच मूर्ख आहां असें दिसून येईल." "रागावलेल्या मनुष्याचा राग मृदु उत्तरानें शांत होतो." रागाचें उत्तर देणें हें वेडेपणाचें आहे. पण एकाद्याची थट्टा करणें, हें त्याहीपेक्षां मूर्खपणाचें काम होय. शेंकडा नव्वद लोक शिव्यागाळी किंवा एकादी दुखापत सोसतील, पण त्यांना कोणीं हांसलेलें खपणार नाहीं. तुम्हीं त्यांना दुसरें कांहीं केलें तरी ते विसरतील, पण त्यांची टवाळकी केली तर ते त्याचा राग मनांत ठेवितील.

( ओंवी–अर्ध )

वेड्यास वेडें म्हणों नये । वर्म कदापि बोलों नये ॥

—रामदास

१ लॅब्रेयर २ इंग्रजी म्हणी

( ओंवी )

हृदयीं तप्तलोहाचें सळ। साहों येईल चिरकाळ ॥
परि दुष्ट शब्दांची जळजळ । मरणांतींहि शमेना ॥ १

—रामदास

मनुष्यास भ्रम असलेला आवडतो, पण त्याचा भ्रम कोणी नाहींसा केला तर त्याला तें आवडत नाहीं. ट्रासिलस नांवाचा एक मनुष्य अथेन्स शहरांत होता; त्याला वेड लागलें होतें, व त्याला असा भ्रम झाला होता कीं, बंदरांतील सर्व जहाजें आपलीं आहेत. त्याला क्रिटो ह्या नांवाच्या गृहस्थानें बरा केला, तेव्हां त्याचा भ्रम नाहींसा झाला. त्याबद्दल त्याला कांहीं उपकार न वाटतां उलट तो आपणास लुटलें म्हणून आक्रोश करूं लागला. लार्ड चेस्टरफील्ड म्हणतो, "थट्टेच्या मौजेसाठीं आपला मित्र गमावणारा मनुष्य मूर्ख खराच. पण आपला मित्र नाहीं किंवा शत्रुहि नाहीं अशा मनुष्याची थट्टा करून त्यास आपला शत्रु करणें हेंहि मूर्खपणाचेंच लक्षण आहे."

( ओंवी )

बहुकाळींचा मित्रसंबंधु । तोडी एक वोखटा शब्दु ॥
जैसा कांजीचा स्वल्प बिंदु । घटचि नाशी दुग्धाचा ॥ १

—रामदास

दुसऱ्यांनीं आपला अपमान केला, अथवा ते आपणासच हांसत आहेत, अशा प्रकारचा संशय क्षुल्लक कारणावरून मनांत आणूं नये. " ते पोट धरून हांसत होते, ह्यावरून ते माझ्याच संबंधानें बोलत असावे "

असा तर्क करूं नये. पण खरोखर तुमची थट्टा कोणीं केली, तर राग येऊं देऊं नये; व मनापासून हांसावें, म्हणजे थट्टा करणाराची फजिती करण्याची आपणास संधि सांपडते. आपली थट्टा केली असतां जो मनुष्य रागावत नाहीं तो सर्वांस आवडतो, कारण त्या मनुष्याच्या ठिकाणीं सुस्वभाव व तारतम्य आहे असें दिसून येतें. आपली थट्टा झाली असतां आपणच हांसलों म्हणजे लोक थट्टा करण्याचें सोडून देतात.

आपलीं कोणत्याहि विषयासंबंधानें मतें असतील, तीं निर्भीडपणें सांगण्यास भिऊं नये. कधीं कधीं त्यामुळें आपला उपहास होईल, पण त्यामुळें आपणास कांहीं अपाय होणार नाहीं. आपलीं खरीं मतें एक प्रकारचीं असून तीं दुसऱ्या प्रकारचीं आहेत असें ढोंग करणें हें मोराचीं पिसें धारण करणाऱ्या डोमकावळ्याप्रमाणें हास्यापद आहे. पण आपलीं मतें जशीं आहेत तशीं लोकांच्या नजरेस आल्यास त्यांत कांहीं लाजेचें कारण नाहीं. कांहीं लोक कधीं कधीं केवळ काल्पनिक कारण मनांत आणून त्यामुळें त्रास करून घेतात, व दुसऱ्यांवर रागावून त्यांचा स्नेह तोडतात, तसें आपण करूं नये.

मोकळ्या मनानें वागावें, पण ज्या गोष्टी बोलण्यासारख्या नाहींत त्या बोलूं नयेत. स्वतःविषयीं फार बोलूं नये, स्वतःस अनुकूल किंवा प्रतिकूल असेंहि कांहीं बोलूं नये. पण दुसरे लोक स्वतःविषयीं कांहीं बोलत असले, तर त्यांस खुशाल बोलूं द्यावें. त्यांस तें आव-

डतें म्हणून ते बोलतात. व तुम्हीं त्यांचें बोलणें लक्ष देऊन ऐकलें तर त्यांचें तुमच्याविषयीं चांगलें मत होईल. निदान कोणी मनुष्य मूर्ख अथवा जडबुद्धि आहे असें आपणास वाटलें तर तसें त्यास बहुधा समजूं देऊं नये. जेथे तसें समजूं देणें आपलें कर्तव्यच असेल तेथे मात्र तसें करावें. जर विनाकारण आपण तसें केलें तर त्या मनुष्याचा अन्याय केल्यासारखें होईल. कदाचित् आपलें मत चुकीचें नसेल कशावरून ? त्याचेंहि आपणाविषयीं तशाच प्रकारचें मत झाल्यास त्याचा फारसा अन्याय होणार नाहीं.

बर्क साहेबानें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, "मी एकाद्या सबंध राष्ट्रावर कसलाहि आरोप कधींहि आणणार नाहीं." त्याप्रमाणेंच एकाद्या जातीच्या किंवा धंद्याच्या सर्व लोकांवर दोपारोप करणें ह्यांत वेडेपणा व अन्याय आहे. एकट्याच मनुष्यास दुःखविलें असलें तर तो तुमचा अन्याय विसरेल किंवा त्याबद्दल क्षमा करील. पण लोकसमाजाकडून तसें होण्याची आशा नसते. आणि एकटा मनुष्य देखील नुकसानीबद्दल क्षमा करील, पण अपमानाबद्दल करणार नाहीं. आपली कोणी फजिती केली असतां ती गोष्ट मनुष्याच्या हृदयांत जशी सलते तशी दुसरी कोणतीहि सलत नाहीं. दुसऱ्यांस चिडविलें किंवा त्यांचा मूर्खपणा उघड केला तर त्यापासून आपलें कार्य कधीं साध्य होणार नाहीं.

गेटी नामक प्रसिद्ध जर्मन् तत्त्ववेत्त्यानें एकरमन नामक मनुष्याशीं संवाद ह्या नांवाच्या आपल्या एका ग्रन्थांत इंग्रज लोकांविषयीं असें म्हटलें आहेः—

" हे लोक एखाद्या जनसमाजांत येतांना पाहावे. त्यांच्या चेहऱ्यावरून व वागणुकीवरून त्यांची शांतता व स्वावलंबन हीं दिसून येतात. ते जेथे जातात तेथले ते जणूं काय धनीच आहेत आणि सर्व जगांवर जणूंकाय त्यांची सत्ता आहे असें वाटतें.

एकरमन—जर्मन् लोकांपेक्षां इंग्लिश लोक जास्त बुद्धिमान् किंवा सुशिक्षित अथवा उदार मनाचे असतात असें तुमचें म्हणणें आहे काय ?

गटी—माझ्या बोलण्याचा मुद्दा तुह्मी समजला नाहीं. मी इंग्लिश लोकांची तारीफ करितों ती तुम्ही म्हणतां त्या गुणांसंबंधानें नाहीं. त्यांचें श्रेष्ठत्व वरील गुणांवर किंवा त्यांच्या कुळावर किंवा संपत्तीवर मुळींच अवलंबून नाहीं. ज्या गुणामुळें ते श्रेष्ठ आहेत तो हा कीं, ईश्वरानें त्यांना जसे केले आहेत तसे आपण आहों असें दाखविण्याचें त्यांना धैर्य आहे. त्यांच्यामध्यें अर्धवटपणा नाहीं. त्यांचा जो कांहीं गुण असेल तो पूर्ण असतो. ते शहाणे असले तर पुरे शहाणे असतात. कधीं कधीं पुरे मूर्खहि असतात हें मी कबूल करितों. पण अर्धवट शहाण्यापेक्षां पुरा मूर्ख बरा असें मी समजतों."

कोणतेंहि काम करीत असतां किंवा बोलणें चालवीत असतां शांतपणा ठेवावा. पुष्कळ लोकांना आपलें सर्व बोलणें तुम्हीं ऐकून घ्यावेंसें वाटतें. मग त्यांची विनंति तुह्मीं मान्य केली नाहीं तरी त्यांना फारसें वाईट वाटणार नाहीं. वाद करण्याची हौस ज्याला आहे असा मनुष्य भेटला असतां त्याला यथेच्छ बोलूं द्यावें.

म्हणजे तो कंटाळून आपोआप बोलणें बंद करितो.

कांहीं झालें तरी क्रोध येऊं देऊं नये. आणि जर राग आला तर तोंड आवरून धरावें. व राग आला असें लोकांस कळूं देऊं नये.

( दिंडी )

क्रोध सोडुनियां शांतचित्त व्हावें।
क्षुब्ध होतां मन कुमार्गाचि धांवे ॥
सौम्य शब्दांनीं कोप शांत होतो ।
तीव्र शब्दें मानवा क्रोध येतो ॥ १

—इंग्रजी म्हणी

( ओंवी )

क्रोध तोचि अपस्मार । क्रोध तोचि भूतसंचार ॥
क्रोधें कीजे पिशाच नर । परम चतुर विवेकी ॥ १

—मुक्तेश्वर

ज्या ठिकाणीं तुमची जरूर नाहीं तेथें जाऊन आगंतुकी करूं नये. तुम्हाला कांहीं सत्कृत्य करावयाचें असल्यास जगांत पुष्कळ जागा आहे. जेम्स राजा एकदां एका माशीला उद्देशून बोलला,

" माझीं एवढीं मोठीं तीन राज्यें असतां तूं माझ्या डोळ्यांतच कां उडतेस ? तुला दुसरी जागाच मिळत नाहीं कीं काय ? "

कित्येकांस भलत्याच वेळीं भलतीच गोष्ट बोलण्याची वाईट लकब लागलेली असते. ज्या गोष्टीपासून पूर्वीच्या दुःखाची आठवण होईल, किंवा मतभेद उत्पन्न होईल अशा गोष्टीचा ते अवेळीं उल्लेख करितात.

मनुष्यस्वभावाचें ज्ञान असणें ही गोष्ट फार मह-

त्वाची आहे. कोणावर विश्वास ठेवावा व कोणावर ठेवूं नये, तसेंच कोणावर किती व कोणत्या बाबतींत विश्वास ठेवावा, ह्याचा निर्णय शहाणपणानें करितां आला पाहिजे. पण ही गोष्ट कांहीं सोपी आहे असें नाहीं. आपल्याबरोबर व आपल्या हाताखालीं काम करण्यासाठीं लागणारे लोक चांगल्या परीक्षेनें पसंत करितां येणें फार महत्त्वाचें आहे. तसेंच, जो मनुष्य ज्या कामास योग्य त्याची त्याच कामावर योजना करितां येणें हेंहि फार अवश्य आहे. नाहींतर 'घोड्यावर हौदा व हत्तीवर खोगीर' असा प्रकार होतो.

"एकाद्या मनुष्याविषयीं तुमच्या मनांत कांहीं संशय असल्यास त्याला कामावर लावूं नये. व ज्याला कामावर लाविला त्याच्याविषयीं संशयखोर असूं नये."[1]

संशयखोर लोकांचा संशय चुकीचा असण्याचा बराच संभव असतो. विश्वास ठेवणाऱ्या लोकांचा विश्वास अपात्रीं असण्याचा संभव त्या मानानें फार कमी. विश्वास पूर्ण असावा; पण अविचाराचा नसावा. मर्लीन ह्या नांवाचा एक मनुष्य होता तो फार शहाणा होता. व्हायव्हेन नांवाच्या एका कपटी स्त्रीनें त्याला सांगितलें कीं, माझ्यावर तूं पूर्ण विश्वास तरी ठेव, नाहींतर मुळींच ठेवूं नको. हें तिचें म्हणणें त्यानें वेडेपणानें कबूल केल्यानें त्याचा सर्वस्वीं नाश झाला.

नेहमीं फार धूर्तपणानें वागावें. आपली मसलत गुप्त ठेवावी. जर तुम्हीं आपली मसलत गुप्त ठेविली नाहीं तर

१ कान्फ्युशस्

लोक तरी कां ठेवितील? " शहाण्याचें तोंड त्याच्या हृदयांत असतें, व मूर्खाचें हृदय त्याच्या तोंडांत असतें " अशी इंग्रजींत एक म्हण आहे. म्हणजे शहाण्या मनुष्यास जें जें वाटेल तें सर्वच तो बोलून दाखवीत नाहीं. पण मूर्ख मनुष्य जें मनांत येईल तें विचार न करितां बोलून टाकतो.

आपल्या विचारशक्तीचा उपयोग करावा. आपली विचारशक्ति नेहमीं बिनचूक असते असें जरी नाहीं, तरी तिची मदत घेतल्यानें आपल्या हातून पुष्कळ कमी चुका होतील.

" भाषण हें रुप्यासारखें आहे किंवा असलें तरी पाहिजे. पण मौन हें सोन्यासारखें आहे" अशी इंग्रजींत म्हण आहे. तिचा अर्थ असा कीं, पुष्कळ प्रसंगीं बोलण्यापेक्षां मौनच जास्त श्रेयस्कर असतें.

पुष्कळ लोक भाषण करितात तें त्यांच्यापाशीं कांहीं बोलण्यासारखें असतें म्हणून नाहीं, तर कांहींतरी बोलण्याची त्यांना हौस असते म्हणून बोलतात. विचार करून जे शब्द येतील तेच बोलावे. जिभेला येतील ते बोलूं नयेत. वाचाळपणा किंवा कांहींतरी बोलण्याची हौस ज्याला असते त्याला बहुधा आपल्या कामांत यश येणार नाहीं. " पुष्कळ लोक बोलण्याच्या भरांत जें मनांत असतें त्याहून भलतेंच कांहीं तरी बोलून जातात. व मग त्यांना वाटतें कीं, असें आपण बोललों नसतों तर बरें झालें असतें. किंवा ते कांहीं तरी गैरशिस्त गोष्ट बोलतात. ती बोलण्यांत त्यांचा कांहीं हेतु असतो

असें नाहीं. पण त्यांच्या जिभेला कांहीं तरी चाळा करावासा वाटतो. अशा प्रकारची बेसुमार बडबड करण्याची ज्याला संवय आहे त्याला संसारांत अनेक अडचणी व त्रास उत्पन्न होतात. ज्याला उद्देशून ती बडबड असेल त्याच्या मनांत त्वेष उत्पन्न होतो. इतर लोकांमध्यें कलह माजतो. व पूर्वी थोडीशी चुरस असते ती सहज नाहींशी होण्यासारखी असली तरी वाढते."[1]
"ज्या मनुष्याला चांगलें भाषण करण्याची अक्कल नाहीं, व मौन केव्हां धारण करावें हें समजण्याचें तारतम्य नाहीं, तो मोठा अभागी होय."[2]

डेमारेट्स याजविषयीं प्लूटार्कनें एक आख्यायिका सांगितली आहे ती अशीः—एका सभेंत डेमारेट्स हजर असून कांहीं बोलला नाहीं. तेव्हां त्याला एकानें प्रश्न केला कीं, तुम्ही कांहीं बोललां नाहीं ते तुम्हीं मूर्ख आहां म्हणून कीं तुम्हाला शब्द आठवनात म्हणून? त्यावर डेमारेट्स ह्यानें उत्तर केलें कीं, जो मनुष्य मूर्ख आहे त्याला आपलें तोंड आवरतां येणारच नाहीं.

सालोमन् ह्यानें म्हटलें आहे:—

"एकाद्या अगदीं मूर्ख मनुष्यास देखील ताळ्यावर आणितां येईल; पण उतावीळपणें बोलण्याची संवय ज्याला लागली आहे त्याची सुधारणा करणें फार कठिण आहे."

आपलें श्रेष्ठत्व दाखविण्याचा कधीं यत्न करूं नये. लोकांचा कमीपणा त्यांस दाखवून दिला असतां त्यांना जसें दुःख होतें तसें दुसऱ्या कशापासून होत नाहीं.

१ बटलरचीं व्याख्यानें २ लेब्रेयर

आपल्या बोलण्याच्या खरेपणाबद्दल फार आग्रहानें बोलूं नये. आपणास आपल्या म्हणण्याच्या खरेपणाबद्दल कितीहि खातरी असली तरी कदाचित् आपली चूक असण्याचा संभव आहे. आपल्या स्मरणशक्तीला एकादे वेळीं विलक्षण भूल पडते. आणि आपले डोळे व कान कधीं कधीं आपणास फसवितात. आपल्या मनांत कांहीं खोटे ग्रह झालेले असतात. जरी आपलें म्हणणें खरें असलें तरी त्याच्या खरेपणाबद्दल अति आग्रह न धरल्यानें कांहीं नुकसान होणार नाहीं.

कोणतेंहि कृत्य करावें कीं नाहीं, ह्यासंबंधानें बेताबाहेर विचार करीत बसू नये. आणि संधि आली असतां ती दवडूं नये. एकादी गोष्ट अगदीं साध्य होण्याच्या बेतास आली असतां देखील अनेक विघ्नें येऊन ती साध्य होत नाहीं.

योग्य समयाची वाट कशी पहावी हें ज्याला ठाऊक आहे त्याला सर्व गोष्टी साध्य होतात. असें एका ठिकाणीं म्हटलें आहे; संधि आली म्हणजे ती तात्काळ साधावी.

( ओवी )

योग्य समय दैवें आलिया । न होय कार्याची स्फूर्ति जया ॥
स्फूर्ति मागुनी होतां तया । नकारघंटा गळां पडे ॥ १

भर्तृहरिनें म्हटलें आहे:—

का हानिः समयच्युतिः ।

**भावार्थः**—चांगली संधि आली असून ती व्यर्थ घालविली तर ह्यासारखी दुसरी हानि नाहीं.

एकदां आलेली संधि दवडली म्हणजे पुनः दुसरी येण्याचा बहुधा संभव नसतो.

( श्लोक )

संसाराब्धिस जेधवां भरति ये, तैं तीस जे साधिती ।
भाग्या पावति तेचि, दीन दुसरे मागें सदा लोंबती ॥
आहे पूर्ण समुद्रिं नाव आपुली आतां, क्रमूं मार्ग रे ।
राहे जों अनुकूल ओघ, अथवा भग्नाश होऊं खरे ॥ १

—शेक्सपिअर

सावधगिरी ठेवावी पण फाजील सावधगिरी ही बरी नाहीं. चूक होईल म्हणून फाजील भीति बाळगूं नये. " ज्या मनुष्याच्या हातून कधींच चूक होत नाहीं त्याच्या हातून कांहींच होणार नाहीं. "

पोषाख नीटनेटका करावा. पोषाख करणें जर अवश्य आहे तर तो चांगला करावा हेंच योग्य आहे. पण त्यांत नटवेपणा करूं नये. व पैशाचा व वेळाचा व्यर्थ खर्च करूं नये. कापड चांगलें असावें. एकाद्या मनुष्याची परीक्षा करितांना लोक त्याच्या पोषाखावरून किती भुलतात ह्याचा विचार केला तर खरोखर आश्चर्य वाटण्यासारखें आहे. ज्या लोकांचा आपल्याशीं संबंध येतो त्यांपैकीं पुष्कळ लोक आमच्या पोषाखावरून बऱ्याच अंशीं आमची परीक्षा करीत असतात. व पुष्कळ लोकांस आमच्या बाह्य देखाव्याशिवाय आमची परीक्षा करण्यास दुसरें कांहीं साधन नसतें. " डोळे आणि कान मनुष्यांचें अंतःकरण खुलें करितात. " म्हणजे बाह्य स्वरूपानें व बोलण्यानें डोळे व कान तृप्त झाल्यावर अंतःकरणहि प्रसन्न होतें. जगांत एका मनुष्यास तुमची पूर्ण माहिती असली तर शंभर माणसें केवळ

तुमचें बाह्य स्वरूप पहात असतात. दुसरी गोष्ट अशी कीं, आह्मी आपल्या पोषाखाबद्दल जर निष्काळजी व अव्यवस्थित असलों, तर दुसऱ्या कामांतहि तसेंच असूं असें लोकांनीं अनुमान केलें, तर त्यांस फारसा दोष देतां येणार नाहीं.

मंडळींत असतांना ज्यांच्या रीतीभाती सर्वांत उत्तम व संतोषकारक असतात त्यांचें वर्तन लक्षपूर्वक पहावें. रीतीभातींच्या योगानें मनुष्यास मनुष्यत्व येतें अशी एक जुनी म्हण इंग्रजी भाषेंत आहे. तींत थोडीशी अतिशयोक्ति आहे, पण बराच सत्याचा भाग आहे. " सुभग आकृति ही एक कायमचें शिफारसपत्र आहे[1]". "चांगल्या रीतीभातींचा परिणाम प्रत्येक मनुष्यावर थोडाबहुत होतोच. आणि कित्येकांवर तर त्यांचाच सर्व परिणाम होतो[2]." " मनुष्याच्या अंगीं कितीहि चांगले गुण असले व कितीहि ज्ञान असलें तरी त्यांच्या योगानें दुसऱ्याचें मन वश होत नाहीं. तें वश झाल्यावर कदाचित् त्यांच्या योगानें आपली छाप कायम ठेवितां येईल. आपल्या मुद्रेनें व हावभावांनीं नेत्र खुष करावे. मधुर आणि चित्तवेधक भाषणानें कान तृप्त करावे. मग अंतःकरण सहजच तुम्हांस वश होईल.[3]" डोळे आणि कान प्रत्येकाला आहेत. पण चांगली विचारशक्ति सर्वांना नसते. जग ही एक रंगभूमि आहे; आपण सर्व नट आहों. एकादें नाटक ज्या रीतीनें करून दाखवावें त्याप्रमाणें श्रोतृजनांवर त्याचा बरा वा-

१ बेकन २ बिशप मिडलटन ३ लार्ड चेस्टरफील्ड

ईट परिणाम होतो, हें प्रत्येकास माहीत आहे.

लार्ड चेस्टरफील्ड आपल्या मुलासंबंधानें एकें ठिकाणीं म्हणतो:—लोक मला सांगतात कीं, माझ्या मुलाची ज्या ज्या लोकांना चांगली माहिती झाली आहे ते सर्व त्याच्यावर प्रेम करितात. पण माझी अशी इच्छा आहे कीं, त्याची माहिती होण्यापूर्वीच केवळ दृष्टादृष्ट होतांच तो लोकांस आवडावा. आणि नंतर सावकाश त्यानें त्यांची प्रीति संपादन करावी. बाह्य देखाव्यासंबंधाच्या गोष्टी फारशा महत्त्वाच्या नाहींत असें ज्याला वाटतें त्याला मानवी स्वभावाची मुळींच माहिती नाहीं असें म्हटलें पाहिजे. ह्या गोष्टीकडे जितकें लक्ष द्यावें तितकें थोडें. ह्याच गोष्टींनीं अंतःकरण वश होतें, व अंतःकरणाच्याच तंत्रानें विचारशक्ति बहुधा जात असते.

मनुष्याला संसारांत विद्वत्तेपासून जितकी मदत होते तितकीच बहुधा मोहक रीतीभातींनीं होते. " एकाद्यानें हत्ती नेला तरी त्याला कोणी बोलत नाहीं. पण दुसऱ्या एकाद्यानें बाहेरून जरा आंत नजर फेंकिली तर ती खपत नाहीं. " ह्याचें कारण काय ? पहिला आपलें काम लोकांस खुष ठेवून करितो व दुसरा लोकांस दुखवून करितो. होरेस म्हणतो कीं, तारुण्य, वक्तृत्व, कला इत्यादि गुण अंगीं असून मोहक वागणूक नसेल, तर त्यांचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं.

( ओंव्या )

आधीं प्रपंच करावा नेटका । मग पहावें परमार्थविवेका ॥
एथें आळस करूं नका । विवेकीहो ॥ १
प्रपंच सोडोनि परमार्थ केला । तरी अन्न मिळेना पोटाला ॥
मग त्या करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ २

—रामदास

# प्रकरण ३

## द्रव्य

मितव्ययाचें महत्त्व पुष्कळ लोकांस जितकें कळावें तितकें कळत नाहीं. एक वृद्ध मनुष्य म्हणतो, 'माझ्या मुला, तुझी श्रीमंती किंवा गरिबी ही तुझ्या प्राप्तीपेक्षां तुझ्या खर्चावर जास्त अवलंबून राहील.'

श्रीमंत होण्याची गोष्ट राहूं द्या. पण अडचणीच्या प्रसंगाकरितां कांहीं द्रव्य राखून ठेवणें हें प्रत्येकास अवश्य आहे. इंग्रजींत अशी एक म्हण आहे कीं, "दारिद्र्य दाराजवळ येऊन डोकावूं लागलें म्हणजे घरांत असलेलें प्रेम खिडकीवाटें पळून जाऊं लागतें."

( श्लोक )

माता निन्दति नाभिनन्दति पिता भ्राता न संभाषते ।
भृत्यः कुप्यति नानुगच्छति सुतः कान्ताच नालिङ्गते ॥
अर्थप्रार्थनशङ्कया न कुरुते संभाषणं वै सुहृत् ।
तस्माद्द्रव्यमुपार्जयस्व सुमते द्रव्येण सर्वे वशा ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—दरिद्री मनुष्यास आई देखील टाकून बोलते, बाप त्याजवर प्रेम करीत नाहीं, भाऊ त्याच्याशीं भाषण करीत नाहीं; त्याजवर नोकर देखील रागावतो; त्याचा मुलगा त्याची आज्ञा मानीत नाहीं; त्याची बायको सुद्धां निष्ठुर होते; तो द्रव्य मागेल ह्या भीतीनें मित्र त्याला विचारीनासा होतो, तस्मात् हे सुमते, द्रव्यप्राप्तीचा उपाय कर. द्रव्यानें सर्व अनुकूल होतात.

( अभंग )

धनवंता लागीं । सर्व मान्यता हे जगीं ॥

माता पिता बंधुजन । सर्व मानिती वचन ॥
अंक चाले मोठा धंदा । तव बहीण म्हणे दादा ॥
सदा शृंगार भूषणें । कांता लवे बहुमानें ॥ १

—तुकाराम

पण कसेंहि असलें तरी आपल्या मुलांमाणसांस अन्नवस्त्राची तूट पडणें, किंवा प्रसंगविशेषीं औषधाची जरूर पडल्यास तें न मिळणें, किंवा त्यांना कधीं कधीं विसावा घेण्याची आणि हवापाणी बदलण्याची संधि न मिळणें, ह्यासारखें दुःख नाहीं. आपण योग्य प्रकारें उद्योग केला असता व चैनीचे पदार्थ घेण्यांत पैसा उधळला नसता, तर त्यांना विपत्ति भोगावी लागली नसती, असा पश्चात्ताप होणें हें तर फारच दुःखकारक आहे. केवळ द्रव्यलोभामुळें खर्चाची काटकसर करणें हें अयोग्य आहे. पण आपलें स्वावलंबन राखण्याकरितां मितव्यय करणें हें उचित आहे एवढेंच नाहीं, तर प्रत्येक पुरुषाचें कर्तव्य आहे.

आपल्या लोकांत खाणेंपिणें, पोषाख, वगैरे नेहमींच्या व्यवहारांत बराच मितव्यय दिसून येतो, व तो प्रशंसनीय आहे. तथापि त्यापासून आपला जसा फायदा व्हावा तसा होत नाहीं. ह्याचीं अनेक कारणें आहेत. त्यांपैकीं एक मुख्य कारण हें आहे कीं आपण कांहीं प्रसंगीं बेसुमार उधळेपणा करितों. जी रक्कम जमा होण्यास कित्येक वर्षांचा उद्योग आणि मितव्यय लागतात, तीच रक्कम एकाद्या विवाहासारख्या प्रसंगीं आपण दोन तीन दिवसांत सहज खर्चून टाकितों. धर्मशा-

ह्याप्रमाणें असल्या मंगलकार्यास लागणारा खर्च फार थोडा आहे, असें असतां ऋण काढून सण करण्याची जी प्रबळ रूढि पडली आहे ती फार घातक आहे तिच्या योगानें अनेक मोठीं घराणीं धुळीस मिळाल्याचीं उदाहरणें प्रत्यहीं नजरेस पडतात.

आपल्या प्राप्तीचा व खर्चाचा नेहमीं हिशोब ठेवणें हें फार अवश्य आहे. आपण अगदीं बारीक सारीक गोष्टींचा तपशील लिहिला पाहिजे असें नाहीं. पण पैसा कसकसा आपल्या हातांतून जातो, व निरनिराळे जिन्नस विकत घेण्यांत आपला किती खर्च होतो हें आपणास समजणें अवश्य आहे. ज्या मनुष्याला आपलें उत्पन्न किती व खर्च किती हें माहित आहे त्याच्या हातून सहसा उधळपट्टी होणार नाहीं. उधळे लोक डोळे झांकून खर्च करीत असतात. ज्याचे डोळे उघडे आहेत तो नाशाच्या मार्गानें जाऊन आपला कडेलोट करून घेणार नाहीं.

ह्याकरितां कांहीं करावयाचें झालें, तरी आपल्या प्राप्तीपेक्षां जास्त खर्च करूं नये. दर वर्षीं कांहीं तरी शिलकेंत टाकावें. आणि कांहीं झालें तरी कर्ज करूं नये. "एकाद्या मनुष्याचें वार्षिक उत्पन्न शंभर रुपये आहे व खर्च नव्याण्णव रुपये आहे, तर त्या मनुष्यास सुख होईल. जर वार्षिक उत्पन्न शंभर रुपये व खर्च एकशें एक रुपये असेल तर त्याला दुःख होईल. आतां

१ डेव्हिड कॉपरफील्ड

ह्या दोघांच्या खर्चामध्यें फक्त दोनच रुपयांचें अंतर असून इतका फरक पडतो."

कर्जबाजारीपणा म्हणजे शुद्ध गुलामगिरी आहे. 'सदा कर्ज काढी सदा दुःख जोडी' अशा अर्थाची इंग्रजींत म्हण आहे. संसारांत पुष्कळ गोष्टी दुःखदायक आहेत. "भूक, थंडी, आंगभर वस्त्र नसणें, अतिश्रम करावें लागणें, अपमान होणें, आपल्यावर वहीम येणें, विनाकारण टपका मिळणें, इत्यादि गोष्टी फार क्लेशकारक आहेत. पण कर्ज त्याहून अतिशय कष्टप्रद आहे. जर एकाद्याला महिन्यास दोन रुपयांहून जास्त मिळवितां येत नाहीं, तर त्यानें दररोज अर्धा शेर लाह्या किंवा कुरमुरे घेऊन त्यांवर निर्वाह करावा. पण दुसऱ्याची एक कवडी उसनी घेऊन त्याचा ऋणी होऊं नये."

"जगामध्यें नेहमीं दोन प्रकारचे लोक असतात; एक मितव्ययी, ज्यांनीं द्रव्याचा संग्रह केलेला असतो. दुसरे उधळे, ज्यांनीं सर्व द्रव्य खर्चून टाकिलेलें असतें. मोठमोठ्या हवेल्या, गिरण्या, पूल, जहाजें, आणि मनुष्याच्या उन्नतीस व सुखास कारण होणारीं दुसरीं मोठमोठीं कामें, मितव्यय करून धनाढ्य झालेल्या लोकांकडून झालीं आहेत. ज्यांनीं आपली संपत्ति उधळून टाकिली ते मितव्ययी लोकांचे नेहमीं गुलाम झाले आहेत. असें व्हावें हा सृष्टिनियंत्याचा नियमच दिसतो."

प्लूटार्क म्हणतो कीं, "आर्टेमिसच्या देवळांत कोणी ऋणपीडित लोक गेले असतां त्यांना त्यांच्या सा-

१ होरेस् २ कॉब्डन्

वकारांपासून कांहीं त्रास होत नाहीं, व त्यांस तेथे सुखानें राहतां येतें. पण त्यांना एफिसस् शहरापर्यंत गेलें पाहिजे. मितव्ययरूपी आश्रयस्थान जें आहे त्याची मात्र तशी गोष्ट नाहीं. तें प्रत्येक सुजाण मनुष्याला सर्वत्र मिळण्यासारखें आहे. त्याचा आश्रय केला असतां आनंदानें आणि अब्रूनें सुखांत राहतां येतें." ह्याकरितां कोणाचें कर्ज काढूं नये व व्यापाराशिवाय कोणास कर्ज देऊं नये, पैसा उसना दिला तर परत येण्याचें दूरच, पण त्याबद्दल फुकाचे आभारसुद्धां मिळत नाहींत. कारण देणेकरी लोकांस नेहमीं असें वाटतें कीं, सावकार हा आपला शत्रु आहे. म्हणून आपल्या शक्तीप्रमाणें द्यावयाचें असेल तें फुकट द्यावें, पण परत मिळण्याच्या आशेनें देऊं नये.

पैसा पहिल्यानें थोडा मिळाला म्हणून नाउमेद होऊं नये. वाईट दिवस नेहमीं तसेच राहतात असें नाहीं. आणि पैसा पहिल्यापासूनच पुष्कळ मिळूं लागला तर तो सर्व खर्च करूं नये. कांहीं आपत्कालाकरितां सांठवून ठेवावा. कारण जसे वाईट दिवस नेहमीं राहत नाहींत, त्याप्रमाणेंच चांगले दिवसहि सदासर्वकाळ नसतात, आणि जसजसा काळ जातो तसतशीं खर्चाचीं नवीन द्वारें उत्पन्न होतात. पुष्कळ धंदेवाले लोक प्रथमच फार द्रव्य मिळूं लागल्यामुळें बेफाम होऊन रसातळास गेले आहेत.

श्रीमंत होण्याकरितां फार उतावीळ होऊं नये. "चितार्‍यानें प्रथम आपल्या तसबिरीची किंमत थोडी आली म्हणून तसबीर चांगली काढण्यास आळस करतां

कामा नये. म्हणजे कालांतरानें त्याच्या चित्राच्या यो-ग्यतेप्रमाणें किंमत मिळूं लागेल"

पैसा कसा मिळेल म्हणून नेहमीं काळजी करीत बसूं नये. लक्षाधीश होणें हें थोड्याच लोकांचें नशिबीं असतें. पण उद्योगानें व मितव्ययानें पाहिजे त्याला आपला निर्वाह करितां येण्यासारखा आहे. मनुष्य लबाडीनें श्रीमंत झाल्याचें आपण ऐकितों. पण गरिबी देखील पुष्कळ वेळां लबाडीमुळें प्राप्त होते. खरोखर म्हटलें तर ज्याच्या जवळ थोडें द्रव्य आहे ते गरीब नव्हत. तर ज्यांना पुष्कळ गोष्टींची हांव असते तेच गरीब

( आर्या )

कोण दरिद्री? ज्याच्या चित्तीं तृष्णा सदा विशाळ वसे ॥
श्रीमान् कोण म्हणावा जो नर संतुष्टचित्त नित्य असे ॥ १

—पद्यरत्नावली

सर जेम्स पेजेट ह्या प्रख्यात गुरूनें आपल्या एका भाषणांत आपल्या विद्यार्थ्यांच्या पुढील आयुष्यक्रमाची माहिती सांगितली ती एणेप्रमाणें:—एक हजार विद्यार्थ्यांपैकीं दोनशें असे निघाले कीं, त्यांपैकीं कांहींनीं आपला धंदा सोडून दिला, कांहीं वारसपणाच्या हक्कानें श्रीमंत झाले, व कांहीं अकालीं मरण पावले. बाकी ८०० पैकीं६०० लोक स्वपराक्रमानें बऱ्याच स्थितीस पावले. त्यांपैकीं कांहींना चांगलेंच यश आलें. एकंदरीपैकीं फक्त ५६ लोक असे निघाले कीं, त्यांच्या हातून कांहींच झालें नाहीं. ह्यांपैकीं १५ लोक परीक्षेंत कधींच

१ रस्किन्

पास झाले नाहींत. १० लोकांनीं व्यसनानें आपलें मातेरें करून घेतलें. एकंदर हजारांपैकीं फक्त २५ लोकांनाच अपरिहार्य अडचणीमुळें अपयश आलें.

कोणत्याहि मनुष्यानें जो धंदा पतकरला असेल त्यांत तरबेज होण्याची खटपट करावी. म्हणजे त्याला काम व पैसा मिळण्याची अडचण बहुधा पडणार नाहीं. कालिदास कवीनें म्हटलें आहे:—

न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत् ।

ह्याचा भावार्थ असा कीं, रत्न ग्राहकांस शोधीत नाहीं. त्यालाच ग्राहक शोधीत येतात. त्याचप्रमाणें तुकाराम बोवांचा एक सुंदर दृष्टांत आहे:—

(अभंग)

न लगे चंदना सांगावा परिमळ । वनस्पति मेळ हाकारूनि ।।

संसारांत निर्वाहास लागणाऱ्या वस्तू मिळण्यास खरोखर कोणालाहि फारशी अडचण पडणार नाहीं. परमेश्वरानें आपणांस हवा, प्रकाश, पाणी वगैरे पुष्कळ वस्तू फुकट दिल्या आहेत. आणि कांहीं वस्तु मिळविण्याकरितां मेहनत करावी लागते खरी, पण ती फार नाहीं. चैनीच्या पदार्थांची मात्र तशी गोष्ट नाहीं. ते मिळविण्यास फार खर्च लागतो. फ्रांकलिन ह्यानें म्हटलें आहे कीं, " एका व्यसनास जेवढा खर्च लागतो तेवढ्यांत दोन मुलांचें चांगलें संगोपन व शिक्षण होईल. "

भारी व्याज कबूल करणारें कूळ बुडतें आहे असें समजावें, हें ड्यूक ऑफ् वेलिंगटनचें वाक्य नेहमीं ध्यानांत ठेवावें.

एकाच व्यापारांत आपलें सर्व भांडवल गुंतवूं नये. कारण जरी एकाद्या व्यापारांत पैसा घालण्याविषयीं चांगल्या हुषार मनुष्याची सल्ला मिळाली असली, व पोक्त विचार करून आपलेंहि मत तसेंच झालें असलें, तरी अशी एकादी अकल्पित गोष्ट घडून येते कीं, त्यामुळें आपला सर्व अजमास चुकतो, व त्या व्यापारांत आपणास बूड येते. मोठमोठे हुषार व्यापारी आणि पेढीवाले ह्यांच्या हातूनहि चुका होतात. आपण केलेला अजमास ठोकळ मानानें बरोबर ठरावा ह्यापेक्षां कोणाहि समंजस व्यापाऱ्याची अधिक अपेक्षा नसते. दोन आणि दोन चार होतात, हा अंकगणिताचा सिद्धांत आपण लहानपणींच शिकतों. व सिद्धांत ह्या नात्यानें तो अगदीं बरोबर आहे. पण व्यवहारामध्यें त्याची सत्यता दिसून येत नाहीं. संसारामध्यें अनेक अकल्पित कारणांमुळें दोन आणि दोन ह्यांची बेरीज कधीं बावीस होईल व कधीं तीन देखील होईल. आजूबाजूंच्या गोष्टींचा विचार न करितां एकाद्या सिद्धांताच्याच अनुरोधानें व्यवहार केल्यामुळें अनेक होतकरू व्यापाऱ्यांचीं दिवाळीं निघालीं आहेत.

कसाहि प्रसंग आला तरी डगमगूं नये; व शांतपणा कायम ठेवावा. लार्ड ब्रोह्याम ह्याच्याविषयीं असें सांगतात कीं, फोटोग्राफ काढतेवेळीं देखील त्याच्यानें शांतपणानें बसवत नसे. त्यामुळें त्याची तसबीर नेहमीं पुसट येत असे. ब्यागेहॉट ह्याचें असें म्हणणें होतें कीं, पुष्कळ लोकांस एका खोलींत शांतपणें बसतां न आल्यामुळें त्यांना धंद्यांत बूड आली आहे.

प्रत्येक मनुष्य एकप्रकारचा धंदेवालाच आहे, असें म्हटलें असतां चालेल. आपणां सर्वांस कांहीं तरी कर्तव्यकर्म आहेच. दुसरें कांहीं नसलें तरी घरांतील व्यवस्था ठेवावयाची असते. व आपला खर्च बेताबातानें चालवावयाचा असतो. ह्या लहानशा धंद्यांत देखील मोठ्या धंद्याप्रमाणेंच अडचणी व संकटें येत असतात.

धंद्यांत यश येण्यास बुद्धिमत्ता फारशी नसली तरी चालेल. पण चतुरपणा, काळजी, आणि सावधान चित्त हे गुण अवश्य आहेत. " तुम्ही आपलें दुकान संभाळा म्हणजे दुकान तुम्हांस संभाळील " अशी एक इंग्रजी म्हण आहे, तिचा अर्थ असा कीं, आपल्या धंद्यावर आपलें चांगलें लक्ष असलें म्हणजे आपणास चांगली प्राप्ति होण्यास कठिण पडणार नाहीं. झैनाफन् ह्यानें अशाच अर्थाची एक गोष्ट सांगितली आहे ती अशी:— इराणच्या बादशहापाशीं एक उमदा घोडा होता, तो लवकर पुष्ट व्हावा असें त्याच्या मनांत असल्यामुळें त्यानें एका चांगल्या अश्ववैद्यास युक्ति विचारिली. तेव्हां त्या वैद्यानें त्याला सांगितलें कीं, ह्या घोड्यावर धन्याची नजर नेहमीं असावी म्हणजे तो तावडतोब पुष्ट होईल.

धंद्यास योग्य अशा संवयी आपणांस लावून घेणें फार जरूर आहे. एका अनुभवी गृहस्थानें आपला ह्या संबंधाचा अनुभव सांगितला आहे तो असा:—" माझ्या पहाण्यांत असे बरेच लोक आले कीं ते हुषार आणि अब्रूदार असून त्यांना संसारांत यश आलें नाहीं. ह्याचें मुख्य कारण एवढेंच कीं, ते बहुतेक आळशी व

अनियमित होते; त्यांना दुसऱ्यांबरोबर राहून समाधानानें काम करतां येत नसून लहान सहान गोष्टींत ते आपलाच हेका धरून बसत असत; सारांश ज्याला आपण व्यवहारशून्य म्हणतों त्या प्रकारचे ते लोक होते."

लहान कामांत काय आणि मोठ्यांत काय, व्यवस्था आणि टापटीप हीं अवश्य आहेत. जेथली वस्तू तेथे असावी हा नियम फारच महत्त्वाचा आहे. आपलें काम झाल्याबरोबर हातांतील वस्तू जागच्या जागीं ठेवण्यास थोडीशी खटपट पडते खरी, पण पुनः त्या वस्तूची गरज लागली म्हणजे ती शोधण्यास लागणारी कितीतरी खटपट वांचते. झेनाफन् म्हणतोः—" अव्यवस्था म्हणजे काय ? समजा कीं, एकाद्या शेतकऱ्यानें आपल्या कोठारांत बाजरी, गहूं व वाटाणे निरनिराळे न ठेवितां एकत्र ठेविले. व नंतर भाकरी करण्याकरितां शेर दोन शेर बाजरी किंवा गहूं, किंवा आंबटी करण्याकरितां वाटाणे काढावयाचे असले म्हणजे त्याला एक एक कण वेंचून काढावा लागला. ह्याचें नांव अव्यवस्था. दुसरी गोष्ट गलबताची घ्या. गलबतावर प्रसंगास उपयोगीं पडणारें सर्व सामान जागच्या जागीं ठेवण्याची फार जरूर असते. समुद्रांत तुफान केव्हां होईल ह्याचा नेम नसतो. व मग त्या प्रसंगीं लागणारी वस्तू जर आयत्या वेळीं मिळाली नाहीं तर सगळ्या गलबतास जलसमाधि मिळण्यास कांहीं वेळ लागणार नाहीं." म्हणून सर्व वस्तू जागच्या जागीं ठेवण्याची, म्हणजे व्यवस्थितपणानें वागण्याची आपणास संवय लागणें अत्यंत अवश्यक आहे.

आरिस्टाटलपासून कार्लाइलपर्यंत बहुतेक तत्त्ववेत्त्यांनीं व्यापारी व धंदेवाले लोकांस तुच्छ मानिलें आहे; अथवा कोणताहि धंदा किंवा व्यापार करणें हें हलकटपणाचें काम मानिलें आहे. प्लेटो नामक विख्यात ग्रीक तत्त्ववेत्त्यानें " उत्तम प्रजासत्ताक राज्य कसें असावें " ह्याविषयीं एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत त्यानें व्यापारी लोकांस नागरिक वर्गांतून वगळले आहेत. व्यापारासारखा हलकट धंदा परकी लोकांनीं पाहिजे तर करावा असें त्याचें मत होतें. वास्तविक म्हटलें म्हणजे व्यापाराचा आणि दुकानदारीचा धंदा पुष्कळांनीं पतकरल्याशिवाय निभावच लागणार नाहीं; म्हणून जर का त्या धंद्यापासून मनुष्याच्या स्वभावावर अनिष्ट परिणाम होत असतील, व त्याच्या मानसिक उन्नतीस विघ्न होत असेल, तर जगाची फारच हानि होईल ह्यांत शंका नाहीं. पण सुदैवानें तसा प्रकार मुळींच नाहीं. धंद्यांत गुंतलेल्या लोकांस विद्याव्यासंग ठेवण्यास थोडाच वेळ फावतो हें खरें आहे. तथापि त्या थोड्याच वेळाचा उपयोग करून कांहीं व्यापारी मोठे ग्रंथकार व शास्त्रज्ञ झाले अशीं अनेक उदाहरणें आहेत. त्यांपैकीं कांहीं एथे सांगतों. नास्मिथ हा एक कारखानेवाला असून मोठा ज्योतिषी झाला. ग्रोट हा एक पेढीवाला असून अति विख्यात इतिहासकार झाला. ह्यानें ग्रीस देशाचा मोठा इतिहास लिहिला आहे. तो ग्रंथ केवळ अमूल्य आहे. सर जेम्स इव्हान्स ह्याचा कागदाचा कारखाना असून तो इंग्लंडांतील प्राक्कालीन वस्तुसंशोधक सभेचा अध्यक्ष व रा-

यल सोसायटी म्हणून शास्त्रज्ञ लोकांची मोठी सभा आहे तिचा खजीनदार झाला. प्रेस्टविच् हा प्रथम व्यापारी असून मग आक्सफोर्ड एथील विद्यालयांत भूगर्भशास्त्राचा अध्यापक झाला. राजर्स हा पेढीवाला असून कवि झाला. ज्या ग्रंथाच्या आधारें हें पुस्तक रचिलें आहे त्याचे कर्ते सर जॉन लबॉक ह्यांचे वडील पेढीवाले असून मोठे गणिती होते, व रायल सोसायटीचे खजीनदार व उपाध्यक्ष होते. अशीं आणखी पुष्कळ उदाहरणें आहेत. पण तीं स्थलसंकोचास्तव एथे देतां येत नाहींत.

कार्लाइल नांवाचा तत्त्ववेत्ता कांहीं वर्षांमागें इंग्लंडांत होऊन गेला. ह्याला व्यापाराचें जें मुख्य तत्त्व कीं, माल सवंग मिळेल तेथे घेऊन महाग विकेल तेथे विकावा, तें अगदीं नापसंत होतें. तो म्हणतो कीं, सुती कापड व दुसरे इंग्लंडांत होणारे पदार्थ, ह्यांची कमींत कमी किंमत एकदां ठरवून टाकावी. व त्यानंतर ती कधीं कमी करूं नये. आणि इंग्रजांनीं दुसऱ्या राष्ट्रांपेक्षां कमी किमतीनें आपला माल विकून त्यांचें नुकसान करूं नये. कारण ते दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांचे बंधु आहेत. म्हणून दुसरीं राष्ट्रें विकतील त्याच किमतीनें त्यांनींहि आपला माल विकावा. हें कार्लाइलचें मत कधींहि अमलांत आणितां येणार नाहीं. व तें अर्थशास्त्राच्या अगदीं विरुद्ध आहे. इंग्लंड देशांत तेथील लोकांस पुरेसें धान्य होत नाहीं. म्हणून ज्या देशांत धान्य पिकतें त्या देशांत सुती कापड वगैरे पदार्थ पाठवून त्याच्या मोब-

दला इंग्लंडास धान्य घ्यावें लागतें. देशादेशांतील व्यापार नेहमीं जिनसांची अदलाबदल करून होत असतो. त्यांत पैशाची देवघेव फारशी होत नसते. इंग्लंडानें होईल तेवढ्या कमी दरानें आपलें कापड विकलें नाहीं तर त्या देशाचें फार थोडें कापड परदेशीं विकलें जाईल. व थोडें कापड विकलें तर परदेशांतून धान्यहि त्या मानानें कमी घेणें भाग पडेल. कार्लाइलच्या म्हणण्याप्रमाणें अमुक प्रमाणाच्या खालीं किंमत उतरावयाची नाहीं असें केलें तर पुष्कळ लोकांस कापडाची जरूर असून त्यांच्यानें ठरलेली किंमत देववणार नाहीं. इंग्लंडास थोड्या किंमतीनें कापड विकणें पुरवत असून त्यानें तसें विकूं नये, असें कार्लाइलचें म्हणणें आहे. तेणेंकरून असें होईल कीं, ज्यांना कापडाची जरूर आहे त्यांना तें मिळणार नाहीं व इंग्लिश लोकांस पुरेसें धान्य मिळणार नाहीं. आपल्या देशांत जो पदार्थ थोड्या खर्चानें तयार होण्यासारखा आहे तो देऊन त्याच्या मोबदला आपल्या देशांत थोड्या खर्चानें होत नाहीं तो पदार्थ घेणें हें तर व्यापाराचें मुख्य तत्त्व आहे. ज्या ठिकाणीं पदार्थ स्वस्त मिळेल तेथें तो विकत घ्यावा, व जेथे पदार्थाची भारी किंमत येईल तेथे तो विकावा हें केवळ व्यापारी लोकांसच फायदेशीर आहे असें नाहीं, तर सर्व लोकांच्या हिताचें आहे. कारण तसें केल्यानें ज्यांना माल विकण्याची जरूर आहे त्यांचा माल खपतो, व ज्यांना माल विकत घेण्याची जरूर आहे त्यांना तो मिळतो. दुसरा कांहीं मार्ग स्वीकारल्यास 'कों-

कणांत मीठ आणि देशावर मिरच्या नेल्यासारखें' म्हणतेंच कांहीं तरी होईल.

मनुष्य गरीब स्थितींत असला तरी त्यानें त्याबद्दल दुःख मानण्याचें कारण नाहीं. पुष्कळ सर्वमान्य लोक दरिद्रावस्थेंत असूनहि फार सुखी व सौजन्ययुक्त होते. प्रख्यात इंग्लिश कवि वर्डस्वर्थ ह्याचें कांहीं वर्षेंपर्यंत फारच थोडें उत्पन्न होतें. पण तो काल त्याच्या आयुष्यांत फारच सुखाचा होता. श्रीमंती सर्वांच्याच नशिबीं नसते. परंतु प्रियजनांचा सहवास व प्रेम ह्यांच्या योगानें एकादी लहानशी झोंपडी देखील नंदनवनाप्रमाणें होईल. दरिद्रावस्थेंत असलेल्या महात्म्यांची संख्या केवढी मोठी आहे ह्याचा विचार केला तर खरोखर आश्चर्य वाटण्यासारखें आहे.

पैशाच्या योगानें आपलें जें कार्य होतें तें पुष्कळ लोकांस वाटतें त्यापेक्षां फार कमी असतें. पैसा असला म्हणजे खाण्यापिण्याचें सौख्य मिळतें असें कोणी म्हणेल, पण श्रीमंत मनुष्याला निरोगी रहावयाचें असेल तर त्यानें गरीब मनुष्याप्रमाणेंच खाण्यापिण्याचा बेत ठेविला पाहिजे. एकादा गरीब मनुष्य शेतांत काम करून आल्यावर जोंधळ्याची भाकरी आणि चटणी खातो. श्रीमंत मनुष्य पंचपक्वान्नें भक्षण करितो. ह्या दोघांपैकीं कोण आपलें अन्न अधिक रुचीनें खातो बरें? आणि कोणाचें शरीर जास्त पुष्ट आणि बळकट असतें?

१ सर रिचर्ड टेंपल

चांगली क्षुधा लागली म्हणजे साधें जेवण देखील राज-वाड्यांतील मिष्टान्नाप्रमाणें स्वादिष्ट लागतें.

कोणी म्हणेल कीं, पैशाच्या योगानें नानाप्रकारचे ग्रंथ विकत घेतां येतात, आणि विद्येचें सुख मिळतें. पण विद्येची आवड असून ज्यांना दारिद्र्यामुळें पुस्तकें वाचावयास मिळालीं नाहींत असे लोक फारच थोडे असतील. भगवद्गीता, व तुकाराम, रामदास, श्रीधर, वामन, मुक्तेश्वर, कालिदास, शेक्सपिअर, मिल्टन् इत्यादिकांचे ग्रंथ फारच थोड्या किंमतीस मिळतात.खरोखर वाचनाची हौस असेल तर स्नेह्यांकडून देखील हे ग्रंथ वाचावयास मिळतील. दरमहा चार सहा आणे वर्गणी दिल्यास एखाद्या वाचनालयांत प्रवेश होऊन अनेक ग्रंथ आणि वृत्तपत्रें व मासिक पुस्तकें वाचावयास मिळतील. जॉन्सन्सारख्या विद्वानांनीं वाचनाचा व लेखनाचा जो प्रचंड उद्योग केला तो दरिद्रावस्थेंतच नव्हे काय ?

पैशाच्या योगानें आरोग्य, बुद्धिमत्ता, मित्रलाभ, सौंदर्य, अथवा गृहसौख्य ह्यांपैकीं कांहींतरी मिळतें म्हणावें तर तसेंहि नाहीं. ज्यांच्यावर कोणाचें प्रेम नाहीं असे श्रीमंत लोक थोडे आहेत काय ? तसेंच ज्यांना एक वेळचें अन्न मिळण्याची भ्रांत, असे कांहीं लोक, सर्व जगास प्रिय झाले नाहींत काय ?

( श्लोक )

देई वित्त सुखासि काय मनुजा पाहे विचारूनियां ।
राहे दुःख किती समर्थसदनीं भोगांस वेष्टूनियां ॥
नाहीं इच्छित मी धनासि अथवा डौलासि थोरांचिया ।

जेणें केवळ यातना लपविती सौख्या न पावोनियां ॥ १

—गे

बेकन म्हणतो कीं, " श्रीमंत लोक आपल्या स्वतःचीच ओळख विसरतात; आणि संपत्तीची व्यवस्था करण्यांत इतके गुंग होतात, कीं स्वतःच्या शरीराची काळजी घेण्यास किंवा आपलें मन सुसंस्कृत करण्यास देखील त्यांना वेळ फावत नाहीं. "

कोणत्याहि प्रकारचें बंधन झालें तरी तें अनिष्टच होय.*सोन्याची बेडी झाली म्हणून ती दुःख दिल्यावांचून राहणार नाहीं. द्रव्यापासून फार अस्वस्थता उत्पन्न होते. गरीब लोकांस एक प्रकारच्या काळज्या असतात तर श्रीमंत लोकांस दुसऱ्या अनेक प्रकारच्या असतात. आणि पुष्कळ श्रीमान् लोक आपल्या संपत्तीचे धनी नसून केवळ तिचे गुलाम असतात. कित्येक लोकांस द्रव्यापासून सुख होण्याचें एकीकडे राहून त्यापासून काळजी आणि यातना मात्र होतात.

( श्लोक )

धनं तावदसुलभं । लब्धं कृच्छ्रेण रक्ष्यते ॥
लब्धनाशो यथा मृत्युस्तस्मादेतन्न चिन्तयेत् ॥ १
जनयन्त्यर्जने दुःखं । तापयन्ति विपत्तिषु ॥
मोहयन्ति च सम्पत्तौ । कथमर्थाः सुखावहाः ॥ २
यथा ह्यामिषमाकाशे । पक्षिभिः श्वापदैर्भुवि ॥
भक्ष्यते सलिलैर्नक्रैः । तथा सर्वत्र वित्तवान् ॥ ३

---

( अभंगचरण )

* चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥

—तुकाराम

**भावार्थः**—धन हें प्रथम दुर्लभ आहे. तथापि तें प्राप्त झालें असतां त्याचें रक्षण करण्यास फार प्रयास पडतात. धन मिळवीत असतां दुःख देतें, विपत्कालीं ताप देतें, उत्कर्षाच्या वेळीं मोह उत्पन्न करितें, तर मग द्रव्य सुखदायक आहे असें कोण म्हणेल ? ज्याप्रमाणें मांसाचा तुकडा आकाशांत पक्षी, पृथ्वीवर पशु, व पाण्यांत मासे खातात, त्याप्रमाणें वित्तवान् मनुष्याची सर्वत्र स्थिति होते.

द्रव्य जवळ असल्यामुळें पुष्कळांचा नाश झाला आहे. आणि एकंदरींत पैशासंबंधानें श्रीमंत जितके हवालदील असतात तितके गरीब लोक नसतात. पैशापासून फक्त शहाण्या लोकांनाच सौख्य मिळवितां येईल. ज्या मनुष्यास श्रीमंत होण्याची फार हांव असते तो नेहमीं दरिद्री राहील. "[1] जो मनुष्य एकाद्या लहानशा घरांत रहातो त्याला राजवाड्याचें मोठें आश्चर्य वाटतें, व त्यांतील सुखाच्या व वस्तूंच्या संबंधानें भव्य व सुंदर कल्पना त्याच्या मनांत येतात. पण ज्याला राजवाड्यांत प्रत्यक्ष रहावयास मिळतें त्याला त्यांत कांहीं विशेष वाटत नसून त्याला नवल वाटण्यासारखी कांहींच वस्तू रहात नाहीं. ह्या दोहोंपैकीं पहिल्यासच जास्त सुख होतें."

द्रव्यापासून सौख्य मिळावें असा हेतु असेल तर द्रव्यावर आसक्ति ठेवून उपयोग नाहीं.

सादी नामक मुसलमान कवि म्हणतो, "आपल्यास पुरेसेंच द्रव्य असलें तर त्यापासून सौख्य होतें. पण त्यापेक्षां जास्त असलें तर त्याची काळजी घेण्यांतच मनुष्य बेजार होतो."

१ रस्किन्

( श्लोक )

नाहीं अश्व बसावया मज जरी, मी मुक्त आहे तरी।
ओझें बंधन यांजपासुनि न मी राजा कुणाचा जरी ॥
नेणें मी नृपशासना, न वश मी शोकास चिंतेस वा।
शांतात्मा, सुखदुःखनिस्पृह सदा. भीतों न मी या भवा ॥१

—सादी

भर्तृहरीनेंहि अशाच प्रकारचा उद्गार काढलेला आहे.

( श्लोक )

त्वं राजा वयमप्युपासितगुरुप्रज्ञाभिमानोन्नताः।
ख्यातस्त्वं विभवैर्यशांसि कवयो दिक्षु प्रतन्वन्ति नः ॥
इत्थं मानद नातिदूरमुभयोरप्यावयोरन्तरं।
यद्यस्मासु पराङ्मुखोसि वयमप्येकान्ततो निस्पृहाः ॥ १

भावार्थः—

तूं राजा जरि मी श्रुतिस्मृति महा विद्याभिमानी असें।
भाग्यें विश्रुत तूं मदीय कविता सत्कीर्ति लोकीं वसे ॥
आहे अंतर फार तूज मज रे तूं गर्व जैं सेविशी।
मीही निस्पृह भाग्यवंत गणना नाहीं मशीं फारशी ॥ १

—वामन

तुकारामबोवा यांस शिवाजी महाराजांनीं पालखी, अबदागीर वगैरे पाठवून आपल्या दरबारीं निमंत्रण केलें, तेव्हां त्या निस्पृह भगवद्भक्तानें जें उत्तर पाठविलें त्यांत असें म्हटलें आहेः—

नहों केविलवाणें नहों आम्ही दीन। सर्वदां शरण पांडुरंगीं ॥
पांडुरंग आम्हां पाळिता पोषिता। आणिकांची कथा काय तेथें ॥
तुम्ही भेट घेणें कायहो मागणें। आशेचें हें शून्य केलें तेणें ॥
निराशेचा गांव दिधला आम्हांसी। प्रवृत्तिभागासी सांडियेलें ॥ १

"ज्या मनुष्यास इच्छिण्यासारखें कांहींच उरलें नाहीं व पुष्कळ वस्तूंचा उपभोग घेऊन कंटाळा आला आहे त्याची स्थिति फारच शोचनीय होय."

—बेकन

( श्लोक )

तूं वांकसी खर जसा धनभारयोगें।
नेशी सुवर्णभर सापरि तूंहि मागें॥
ओझें तुझ्यावरिल मृत्यु हरील भारी।
तूं द्रव्ययुक्त असुनीहि खरा दरिद्री॥ १

—शेक्सपीअर

( अभंग )

साखरेच्या गोण्या बैलाचिया पाठीं। तयाशी शेवटीं करबाडें॥
मालाचे पैं पेटे वाहताती उंटें। तयांलागीं कांटे भक्षावया॥ १

—तुकाराम

असें जर आहे तर,

( श्लोक )

किमर्थ धन चिंतनीं दवडितों अम्ही काल हा।
रुजा तनुसि गांजितां धन न देइ मोदा अहा॥
क्षणैक तरि वाढवील धन काय ह्या आयुला।
प्रयाणसमयीं जिवास तरि काय दे शांतिला॥ १

—गे

जसजसें द्रव्य मिळतें तसतसा लोभ जास्त वाढतो. "गरीब मनुष्यास पुष्कळ वस्तूंची इच्छा असते. पण लोभी मनुष्यास जगांतील एकंदर वस्तू मिळण्याची हांव असते."

"संपत्तीचा फार हव्यास लागला म्हणजे त्याच

१ सेनेका        २ बेकन

चिंतेंत अतिशय कालक्षेप होतो, व द्रव्यार्जनापेक्षां उदात्त गोष्टींकडे लक्षच जात नाहीं. " संपत्तीच्या योगानें आपल्या आयुष्याचा सदुपयोग झाला तर त्या संपत्तीचा खरा उपयोग होतो. संपत्तीच्या पायीं आयुष्याचा दुरुपयोग झाला तर ती संपत्ति घेऊन काय करावयाची आहे ? " दरिद्रता ही विद्वान् मनुष्याची सहधर्मचारिणी आहे " असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. ज्या कवीला आपल्या प्रतिभाशक्तीच्या योगानें आकाशमार्गानें उड्डाण करितां येतें त्याला गाड्याघोड्यांची काय परवा आहे ?

पैशासंबंधानें जे शब्द बोलण्यांत येतात त्यांचा भावार्थ विचार करण्यासारखा आहे. अमक्या मनुष्यानें पुष्कळ पैसा मिळविला, अमुक मनुष्य संपत्तींत अगदीं बुडून गेला आहे, असें वर्णन आपण पुष्कळ ऐकतों. पण अमुक मनुष्यानें संपत्तीचा चांगला उपभोग घेतला असें आपल्या क्वचित् ऐकण्यांत येतें. जे लोक पैसा मिळवितात ते स्वतः त्याचा उपभोग बहुतकरून घेत नाहींत. मनुष्य पैशाचा संग्रह अतिशय करतो आणि शेवटीं त्याचा उपभोग कोण घेईल हें त्याला देखील ठाऊक नसतें.

एका ग्रीक ग्रंथकारानें श्रीमंतीपेक्षां गरिबी चांगली असें प्रतिपादन केलें आहे. तो म्हणतोः—"भयापेक्षां निर्भयता चांगली; परवशतेपेक्षां स्वतंत्रता चांगली; आपल्या देशबांधवांच्या अविश्वासापेक्षां त्यांचा विश्वास चांगला, ह्या सर्व गोष्टी कोणीहि कबूल करील. मी जे-

व्हां श्रीमंत होतों तेव्हां मला नेहमीं अशी भीति वाटे कीं चोर माझें घर फोडतील, माझा पैसा लुटतील, आणि मला मारतील. पण आतां मला स्वस्थ झोंप येते. आतां सरकारच्या मनांत माझ्याविषयीं कांहीं संशय येत नाहीं. आतां शहरांतून पाहिजे तेव्हां बाहेर जाण्यास व परत येण्यास मी मुखत्यार आहें. मी श्रीमंत होतों तेव्हां लोकांनीं हलकट मानिलेले साक्रेटिस् व इतर तत्ववेत्ते यांच्याशीं सहवास केला तर लोक मला दोष देत असत. आतां मला वाटेल त्याच्याशीं मैत्री करण्यास कोणाची आडकाठी नाहीं. कारण मी गरीब दशेंत आल्यापासून कोणी माझ्याकडे लक्षच देत नाहीं. जेव्हां माझ्यापाशीं पुष्कळ जिनगी होती तेव्हां मी नेहमीं दुःखी असें; कारण नेहमीं माझी कांहीं तरी वस्तु हरवत असे. आतां माझ्यापाशीं हरवण्यासारखें कांहीं राहिलेंच नाहीं. पण पुढें कांहीं तरी मिळवीन ह्या आशेनें मला नेहमीं समाधान वाटतें."

च्यारिमिडीसच्या वरील उद्गारांत बराच सत्याचा भाग आहे. पण त्यांत ह्या विषयाच्या दुसऱ्या बाजूचा विचार झालेला नाहीं. च्यारिमिडीस् ह्यानें हें भाषण केलें, त्यापूर्वीं नुकतेंच त्यानें उत्तम भोजनाचें सुख घेतलें होतें व संगीताच्या श्रवणानें त्याचें मन उल्लसित झालें होतें, म्हणून त्याच्या तोंडांतून असे उद्गार निघाले हें साहजिकच आहे.

पैशाचा शहाणपणानें उपयोग केला असतां त्याच्यापासून पुष्कळ चांगल्या गोष्टी घडून येतात. द्रव्य

ही एक शक्ति आहे. 'पैसा ह्या राजांचा राजा आहे असें एकानें म्हटलें आहे. आपणास कांहीं वस्तु पाहिजे असेल तर ती पैशानें साध्य होते. ताजी व स्वच्छ हवा, चांगलें घर, ग्रंथसंग्रह, इत्यादि उपभोग्य वस्तु पैशानें प्राप्त होतात. कोणाला विश्रांति व फुरसद पाहिजे असल्यास तीं द्रव्यानें मिळवितां येतात. पृथ्वीवरील निरनिराळीं स्थळें पाहण्याची हौस पैशानें पुरवितां येते. आपल्या मित्रांस साहाय्य करणें व विपत्तीनें गांजलेल्या लोकांचें दुःख निवारण करणें ह्यांत जर कांहीं सौख्य असेल तर तें पैशाच्या योगानें मिळवितां येतें. पण हें सर्व होण्यास पैशाचा लोभ उपयोगी नाहीं.

कृपण मनुष्याचें पैशावरच प्रेम असतें. म्हणून तो अयोग्य प्रकारची काटकसर करून पैसा सांठवीत असतो. ह्या आयुष्यामध्यें क्षुद्र व नीच अशा चिंता मनुष्यानें आपल्या मनास लावून घेऊं नयेत, हें जर खरें आहे तर द्रव्यसंचयाची चिंता व्यर्थ कशास पाहिजे ?

पैशाचा शहाणपणानें उपयोग करणें हीच गोष्ट महत्त्वाची आहे.

( श्लोक )

यद्ददासि विशिष्टेभ्यो । यच्चाश्नासि दिने दिने ॥
तत्ते वित्तमहं मन्ये । शेषं कस्यापि रक्षसि ॥ १

—**सुभाषित**

**भावार्थः—**

( आर्या )

पात्रीं दान करिसि जें, जें भोगिसि वित्त तूं प्रतिदिनीं वा ।
तेंचि तुझें धन वाटे, अवशिष्ट परार्थ रक्षिसी ठेवा ॥ १

ह्याच अर्थाची भर्तृहरीची एक उक्ति आहेः-

( आर्या )

दानं भोगो नाशस्तिस्रो गतयो भवंति वित्तस्य ॥
यो न ददाति न भुंक्ते तस्य तृतीया गतिर्भवति ॥ १

**भावार्थः—**

( आर्या )

दान भोग नाश अशा तीन गती ह्या धनास होतात ॥
भोगी न जो न देई, पावे तिसरी गतीच तद्वित्त ॥ १

औदार्य असावें, पण उधळेपणा करूं नये.

( श्लोक )

धना बहुत मेळवी नर परी दरिद्री खरा ।
दरिद्रि करि आपणा परहितीं धनी तो खरा ॥
अनाथ जन पोशि जो करित तो प्रभूला ऋणी ।
सुधर्म करि, संपदा प्रभु तयास देई दुणी ॥ १

—इंग्रजी म्हणी

तथापि गरीब लोकांवर उपकार करतांना आपल्या मुलाबाळांचीहि आठवण ठेविली पाहिजे. आपण आपल्या श्रमानें जें मिळवितों त्याच्यावर आपली स्वतंत्र मालकी आहे. पण वडिलार्जित धनाचे आपण एकटे मालक नाहीं.

धनवान् लोकांपाशीं असलेलें द्रव्य ही एक ठेवच आहे. त्या ठेवीचा हिशोब त्यांना द्यावा लागेल. संपत्तीचा गर्व वाहण्याचें कांहीं कारण नाहीं.

( श्लोक )

आपद्गतं हससि किं द्रविणान्ध मूढ ।
लक्ष्मीश्चिरा न भवतीति किमत्र चित्रम् ॥

एतान्न पश्यसि घटान् जलयन्त्रचक्रे ।
रिक्ता भवन्ति भरिता भरिताश्चरिक्ताः ॥ १

—सुभाषित

भावार्थः—

( श्लोक )

द्रव्यांध हासासि किमर्थ विपन्न लोकां ।
लक्ष्मी असे चल न हें तुज ठाऊकें कां ॥
हे पाहसी न घट तूं जलयंत्रवर्ती ।
होती रिते भरित पूर्णहि रिक्त होती ॥

म्हणून संपत्तीवर विश्वास न ठेवितां त्या मंगलदायक प्रभूच्या ठिकाणीं निष्ठा ठेवावी. पैशाचा सदुपयोग करावा. दानधर्म करावा. ऐहिक संपत्तिप्रमाणें जें विनाशी नाहीं, व ज्याला चोराची, किंवा कीटकांची भीति नाहीं, अशा पुण्यधनाचा संग्रह करून ठेवावा. तोच परलोकीं आमच्या उपयोगीं पडेल.

( श्लोकचरण )

विश्रामं लभतामिदं हि शिथिलं ज्याबंधमस्मद्धनुः।

—शाकुंतल

**भावार्थः**—ही आमच्या धनुष्याची दोरी सैल सोडून त्याला कांहीं वेळ विश्रांति देऊं.

# प्रकरण ४

## मनोरंजन

मागील पृष्ठावरील दुष्यंत राजाची उक्ति आपल्या शरीररूपी व मनोरूपी धनुष्यांसहि लागू करण्यासारखी आहे. ज्या मनुष्यास सारा दिवस काम करावें लागतें त्यानें कांहीं वेळ विश्रांति घेण्यांत व खेळ खेळण्यांत घालविला नांहीं तर त्याची तरतरी नाहींशी होऊन त्याच्या अंगीं जडपणा येतो. घरांत बसून करण्याचीं जीं कामें असतात त्यांच्या योगानें मनुष्य अशक्त आणि नाजूक होण्याचा संभव असतो. खेळ खेळण्यांत घालविलेला वेळ फुकट गेला असें समजूं नये. शारीरिक खेळानें शरीर चांगलें बनतें, व बहुतेक व्यवसायांनीं आकुंचित होत असलेली छाती व बाहू सुदृढ होतात.

खेळांच्या योगानें प्रकृति निरोगी रहाते एवढेंच नाहीं, तर मनुष्यास आपलें काम करण्यास उल्हास वाटतो. खेळ खेळत असतां दुसऱ्या लोकांशीं निकट संबंध येतो, त्यांच्याशीं मनमिळाऊपणानें वागण्याची संवय होते, व क्षुल्लक गोष्टींत आपलाच हेका धरून बसण्याचा स्वभाव नाहींसा होतो. इतर लोकांशीं न्यायानें व उदारपणानें वागण्याची संवय लागते.

खेळापासून शरीराची व मनाची देखील सुधारणा होते. धैर्य, सोशिकपणा, आत्मसंयमन, विनोदीपणा इत्यादि गुण पुस्तकें वाचून किंवा शिकून येत नाहींत.

पण. खेळ खेळल्यानें हे गुण अंगीं येतात. ड्यूक ऑफ् वेलिंगटन् ह्यानें म्हटलें आहे कीं, 'वाटरलूची लढाई ज्या गुणांच्या योगानें जिंकली गेली, ते गुण इटन एथील विद्यालयाच्या क्रीडाभूमीवर खेळत असतांना प्राप्त झालेले होते.' शाळेंत मुलें शिकत असतात त्या वेळीं तीं क्रीडाभूमीवर जे धडे शिकतात, तेच सर्वांत उत्तम व उपयोगी होत. खेळांपासून असा मोठा उपयोग होतो, तरी ते मनोरंजनाकरितां खेळावे. खेळणें हा एक आपला धंदाच करून बसतां कामा नये.

खेळांपासून प्रकृतीवर काय चांगले परिणाम होतात ह्याविषयीं दोघां प्रख्यात शारीरशास्त्रज्ञांचीं मतें दिलीं असतां अप्रासंगिक होणार नाहीं.

सर जेम्स पॅजेट म्हणतो:—" खेळांपासून मनोरंजनाचा हेतु चांगल्याच रीतीनें सिद्धीस जातो. परंतु व्यवहारांत व दररोजच्या आपल्या कामांत फार उपयोगीं पडणारे अमोलिक मानसिक गुण खेळांच्या योगानें प्राप्त होतात. कारण खेळांत पैसा मिळण्याची किंवा अशीच दुसरी हलक्या प्रकारची कांहीं लालूच नसून तरुण व प्रौढ लोक यांचा समागम होतो, व ते एकत्र काम करितात. न्यायानें व संभावितपणानें वागणाऱ्या कोणत्याहि मनुष्यास जोडीदार घेऊन एकादें चांगलें कृत्य कसें करावें हें त्यांस समजूं लागतें. दुसऱ्या मनुष्यांस बरोबर घेऊन काम करण्याची उत्तम हातोटी त्यांस साधते, व ती त्यांस हरएक स्थितींत यश येण्यास साधनभूत होते. एकादा मनुष्य जात्या

न्यायीं स्वभावाचा नसला तरी त्याला न्यायानें वागण्याचें वळण लागतें. खेळ खेळणारांत कितीहि चढाओढ असली तरी अन्यायानें डाव जिंकणें हें सर्वानुमतें निंद्य मानीत असतात. ज्याला न्यायानें खेळ खेळण्याची संवय एकदां झाली त्याला व्यवहारांत देखील सचोटीनें वागावेंसें वाटतें. खेळ खेळत असतांना जर नीतीचीं उदात्त तत्त्वें अंगांत खिळलीं असलीं तर व्यवहारांत ज्या गोष्टींस कायद्यांचा प्रतिबंध नाहीं, परंतु नीतिदृष्ट्या ज्या निंद्य आहेत अशा गोष्टींचा तिटकारा आल्याविना रहाणार नाहीं. कोणत्याहि चांगल्या खेळांत खालीं लिहिलेले तीन विशेष गुण दृष्टीस पडतात, व त्याच गुणांमुळें ते खेळ फार उपयोगी झाले आहेत. पहिला गुण म्हटला म्हणजे हा कीं, खेळाचा काय परिणाम होईल हें निश्चयानें सांगतां येत नसतें. दुसरा गुण असा कीं, त्यांत नवल वाटण्यासारख्या गोष्टी होतात. तिसरा गुण हा कीं, आपल्या नेहमींच्या कामाहून भिन्न अशा कामांत आपलें कौशल्य दाखविण्याच्या पुष्कळ संधी खेळांत मिळतात. आतां ह्या तीन गुणांचा उपयोग फार मोठा आहे. पुष्कळ लोकांस नेहमीं एकच प्रकारचें कंटाळवाणें काम करावें लागतें. व त्यामुळें त्यांना आपलें जीवित त्रासदायक वाटण्याचा संभव असतो. परंतु खेळांच्या योगानें त्यांना नवीन व आनंददायक परिस्थिति अनुभवितां येते. व तेणेंकरून संसारयात्रा सुखकर वाटते. पुष्कळ लोकांच्या अंगीं असलेल्या सुस्वभावाचें व सद्गुणांचें बीज होण्यास त्यांच्या धंद्यांमुळें

व्यवहारांत अवसरच मिळत नाहीं. व त्यामुळें त्या गुणांचा ऱ्हास होतो. अशा गुणांचा व स्वभावाचा खेळांत उपयोग करितां येतो व त्यांचा विकास करितां येतो.

मिचेल फास्टर, शारिरशास्त्राचे गुरु व रायल सोसायटीचे चिटणीस ह्यांनीं एका व्याख्यानांत सांगितलें कीं,—" केवळ शारीरिक काम करीत असतां देखील मेंदूला बरीच क्षीणता उत्पन्न होते. मानसिक श्रमांच्या योगानें मेंदु क्षीण होतो हें सर्वांस ठाऊक आहेच. आजपर्यंत जे शोध लागले आहेत त्यांवरून असें सिद्ध होतें कीं, शारीरिक श्रम करीत असतां स्नायूंमध्यें व डोक्याचें काम करीत असतां मेंदूमध्यें रासायनिक फेरफार होत असतात. स्नायु व मेंदू चांगल्या स्थितींत रहाण्याकरितां त्यांस ताज्या स्वच्छ रक्ताचा पुरवठा मिळाला पाहिजे. म्हणजे तेणेंकरून ज्या भागांचा क्षय झालेला असतो ते भरून येतात व रासायनिक फेरफारांमुळें जीं नासकीं द्रव्यें उत्पन्न झालेलीं असतात तीं धुऊन जातात. स्वच्छ रक्ताचा पुरवठा होण्यास शरीरांतील हलक्या प्रतीच्या इंद्रियांची मदत झाली पाहिजे. हल्लीं जीवनार्थ कलह फारच झपाट्याचा असल्यामुळें मेंदूस फार काम करावें लागतें; त्याच्यावरोबर हलक्या प्रतीच्या इंद्रियांचा टिकाव लागत नाहीं. त्यामुळें त्यांच्याकडून मेंदूस पाहिजे तेवढें स्वच्छ रक्त पुरविण्याचें काम नीट होत नाहीं. मेंदूचें काम करीत असतां थकवा येऊं लागला म्हणजे समजावें कीं, मेंदूस रक्त पुरविणारीं इंद्रियें शिथिल झालीं आहेत. मग मेंदूस रक्ताचा पुरवठा न झा-

त्यामुळें त्याच्याकडून चांगल्या रीतीनें काम होत नाहीं म्हणून मेंदूचें काम अधिक वेळपर्यंत करितां यावें असा हेतु असेल तर तो साध्य करण्याचा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे हा आहे कीं, खेळ खेळून आपलीं हलक्या दर्जाचीं इंद्रियें कार्यक्षम ठेवावीं. म्हणजे तीं मेंदूस रक्ताचा योग्य पुरवठा करितील आणि त्यास लवकर थकवा येऊं देणार नाहींत."

श्वापदांची पारध करणें, बंदुकीनें पक्षी मारणें इत्यादि शिकारीचे प्रकार आहेत त्यांपासूनहि मनोरंजन व व्यायाम होतो. जे लोक स्वतः शिकारी कुत्रीं बरोबर घेऊन पारधीस जात नाहींत किंवा स्वतः बंदूक मारीत नाहींत त्यांना देखील शिकारीची मोठी मौज वाटते. आपल्या देशांत राजे लोकांत वगैरे पूर्वीपासून शिकारीस जाण्याचा प्रघात होता. अभिज्ञान शाकुन्तल नाटकांत दुष्यंत राजाचा सेनापति भद्रसेन ह्यानें शिकारीपासून काय फायदे होतात ते वर्णन केले आहेत.

( श्लोक )

मेदच्छेद कृशोदरं लघुभवत्युत्थान योग्यं वपुः।
सत्वानामपि लक्ष्यते विकृतिमच्चित्तं भय क्रोधयोः॥
उत्कर्षः सच धन्विनां यदिषवः सिद्ध्यंति लक्ष्ये चले।
मिथ्या हि व्यसनं वदन्ति मृगयामीदृग्विनोदः कुतः॥ १

—कालिदास

तथापि आपल्या मौजेकरितां निरुपद्रवी प्राण्याची हिंसा करण्याची प्रवृत्ति दिवसेंदिवस कमी होत जाईल अशी आशा आहे. प्राणी जिवंत असतांना त्यांना पा-

हून जो आनंद होतो, तो त्यांचा वध केल्यापासून होत नाहीं, व व्यायाम, मनोरंजन आणि स्वच्छ हवा ह्यांचा लाभ घेण्याचे दुसरेहि निर्दोष मार्ग अनेक आहेत हें मनुष्यास समजलें पाहिजे.

मनुष्य निरोगी रहाण्यास स्वच्छ पाण्याची जरूर आहे. पण स्वच्छ हवेचें महत्त्व त्याहूनहि जास्त आहे. अहाहा ! हवा हा काय अद्भुत पदार्थ आहे ! हवा आपल्या सर्व शरीरांत संचार करिते. ती आपणास स्नान घालून आपल्या शरीराची त्वचा स्वच्छ करिते, पण ती इतक्या नाजूक रीतीनें कीं आपणास तें कळत देखील नाहीं. असें असून हवेच्या अंगीं केवढें सामर्थ्य आहे ? ती पुष्पांचा व फलांचा मधुर वास आणून आमच्या खोलींत सोडते. आमचीं गलबतें समुद्रावर चालविते. समुद्रावरील व पर्वतावरील आरोग्य व शुद्धता शहरांच्या भर वस्तींत आणून पोंचविते. नादाचें वाहन हवाच आहे. आपल्या आवडत्या माणसांचे शब्द व सृष्टींतील सर्व मधुर गायन आपल्या कानांपर्यंत पोंचविणारी हवेशिवाय कोण आहे ? पृथ्वीवर मेघ ज्यांतून पाणी सोडतात तो हौद म्हणजे हवाच होय. हवेच्या योगानेंच दिवसाची उष्णता व रात्रीची थंडी यांचा ताप कमी होतो. आपल्यावर जी भव्य नीलवर्ण कमान दिसते ती वातावरणाची म्हणजे हवेचीच आहे. सकाळीं व सायंकाळीं आकाशास अग्नीसारखा रंग देणारी हवाच आहे. हवा ही एक अत्यंत सुकुमार, रमणीय आणि प्रेमास्पद वनदेवताच आहे असें म्हटलें तरी चा-

लेल. कारण तिच्या अंगीं मृदुता शुद्धता, कोमलता व परोपयोगित्व हे गुण उत्तम रीतीनें वास करितात.

जेफ्रेज नामक ग्रंथकार म्हणतोः—" आकाश हें जणूंकाय एक मोठें पुष्प आपल्या वरतीं आहे. आणि त्या पुष्पाचा अत्यंत मधुर सुगंध हवेच्या रूपानें पृथ्वीच्या भव्य दिवाणखान्यांत पसरला आहे. वन्य पुष्पांनीं सुवासित झालेली हवा तर फारच मधुर असते. जंगलाच्या झाडोमध्यें नक्षत्रासारखीं चमकणारीं शुभ्र पुष्पें सामान्य वनस्पतींच्या गर्दीतून आपलीं डोकीं वर काढितात, तेव्हां अल्पबुद्धि लोकांच्या मधून आपलें डोकें वर काढणाऱ्या बुद्धिमान् पुरुषांची कल्पना मनांत येते. एकादा सामान्य रस्ताहि अनेक सुंदर कल्पना मनांत आल्यामुळें रमणीय भासतो. मी स्वित्सरलंडांत असतांना एका ओढ्याच्या शुभ्र फुलांनीं आच्छादिलेल्या कांठावर दररोज सकाळीं फिरावयास जात असें. त्याच ठिकाणीं मी नेहमीं उत्कंठेनें फिरावयास जातों व दुसरीकडे जाण्याची मला कां इच्छा होत नाहीं ह्याचें कारण त्या वेळीं माझ्या लक्षांत आलें नाहीं. पण नंतर फार वर्षांनीं आलें. तें कारण हेंच कीं, मला नवीन नवीन वस्तूंची इच्छा नाहीं. जुन्याच परंतु मला प्रिय झालेल्या अशा वस्तूंचाच मला फार लोभ वाटतो. तींच वनांतील फुलें, तेंच झाड, तेंच हिरवेंगार मैदान, तेच पक्षी हीं सर्व मला पुनःपुनः पहावींशीं वाटतात." आपल्या ह्या देशांत नाना प्रकारचीं वन्य फुलें विशेषेंकरून पावसाळ्यांत दृष्टीस पडतात. एकाद्या उंच टेंकडविर

जाऊन खालच्या मैदानाकडे पाहिलें असतां सर्वत्र मोठमोठे उंची गालिचे पसरले आहेत असा भास होतो. कांहीं ठिकाणीं गुलबाशीच्या पांढऱ्या, पिंवळ्या, अस्मानी वगैरे फुलांचे ताटवे दृष्टीस पडतात; जणूं काय वनश्रीचीं हीं शुभ्र, पीत, नील, वर्णाचीं वस्त्रेंच वाळत टाकलीं आहेत असें वाटतें. अरण्याची शोभा तर अवर्णनीय असते.

( श्लोक )

सौमित्रे शोभते पम्पा । वैडूर्यविमलोदका ॥
फुलपद्मोत्पलवती । शोभिता विविधैर्द्रुमैः ॥ १
सौमित्रे पश्य पम्पायाः । काननं शुभदर्शनम् ॥
यत्र राजन्ति शैला वा । द्रुमाः सशिखरा इव ॥ २
शोकार्तस्यापि मे पम्पा । शोभते चित्रकानना ॥
व्यवकीर्णा बहुविधैः । पुष्पैः शीतोदका शिवा ॥ ३
अधिकं प्रविभात्येतन्नीलपीतं तु शाद्वलम् ॥
द्रुमाणां विविधैः पुष्पैः । परिस्तोमैरिवार्पितम् ॥ ४
पुष्पभारसमृद्धानि । शिखराणि समंततः ॥
लताभिः पुष्पिताग्राभिरुपगूढानि सर्वतः ॥ ५
पश्य रूपाणि सौमित्रे । वनानां पुष्पशालिनाम् ॥
सृजतां पुष्पवर्षाणि । वर्षतोयमुचामिव ॥ ६
प्रस्तरेषु च रम्येषु । विविधा काननद्रुमाः ॥
वायुवेगप्रचलिताः । पुष्पैरवकिरन्ति मां ॥ ७
पतितैः पतमानैश्च । पादपस्थैश्च मारुतः ॥
कुसुमैः पश्य सौमित्रे । क्रीडतीव समंततः ॥ ८
मत्तकोकिलसन्नादैर्नर्तयन्निव पादपान् ॥
शैलकन्दरनिष्क्रान्तः ॥ प्रगीत इव चानिलः ॥ ९

सुपुष्पितांस्तु पश्येतान् ॥ कर्णिकारान् समंततः ॥
हाटकप्रतिसंछन्नान्नरान् पीताम्बरानिव ॥ १
—वाल्मिकि रामायण

**भावार्थः**—रामचंद्र म्हणतात, " लक्ष्मणा ! नाना प्रकारच्या वृक्षांनीं अलंकृत, प्रफुल्लित, श्वेत कमलांनीं व नीलकमलांनीं युक्त, आणि वैडूर्य रत्नासारख्या निर्मल उदकानें भरलेलें हें पंपा सरोवर फारच शोभायमान दिसत आहे. लक्ष्मणा ! त्या समोरच्या सुंदर वनाकडे क्षणभर पहा. त्या वनांत मोठमोठे वृक्ष शिखरयुक्त पर्वतांप्रमाणें दिसत आहेत. मी यद्यपि दुःखी आहें तथापि चित्रविचित्र वनांनीं वेष्टिलेलें, नाना प्रकारच्या पुष्पांनीं भरलेलें, शीत जलानें परिपूर्ण असें सरोवर पाहून माझ्या मनास आल्हाद होत आहे. नानाप्रकारच्या पुष्पांनीं नीलवर्ण आणि पीतवर्ण दिसणारी ही हिरवीगार वनभूमि अत्यंत मनोहर दिसते. झाडांच्या सर्व फांद्या फुलांनीं भरलेल्या आहेत. व त्यांवर पुष्पयुक्त सुंदर वेली चढल्यामुळें फारच शोभा दिसत आहे. वृक्ष जणूं काय फुलांचा पाऊस पाडीत आहेत. पहा, हा वायु, खालीं पडलेल्या, पडत असलेल्या व वृक्षांवर असलेल्या पुष्पांच्या योगानें क्रीडा करीत आहे. मत्त कोकिलांच्या मधुर ध्वनीनें तल्लीन होऊन वृक्ष जणूं काय नृत्य करीत आहेत. गुहेच्या तोंडाशीं तो वायु गायन करीत आहे. तसेंच हे पुष्पांनीं आच्छादिलेले कर्णिकार वृक्ष पीतांबर परिधान करून सुवर्णभूषणें घातलेल्या पुरुषाप्रमाणें शोभत आहेत.

अमुक दिवशीं हवा वाईट आहे, व अमुक दिवशीं चांगली आहे, असें लोक म्हणतांना आपण ऐकतों. पण वास्तविक म्हटलें तर हवा कधींच वाईट नसते. सर्व प्रकारची हवा निरनिराळ्या प्रकारें रमणीय असते. कांहीं एक प्रकारची हवा शेतांस किंवा पिकांस अपायकारक

असते. पण मनुष्यास सर्व प्रकारची हवा चांगली आहे. सूर्यप्रकाश आपणास आनंद देतो. पावसानें आपणास हुषारी येते. वाऱ्याच्या योगानें आंगांत तकवा येतो. जेथे बर्फ पडतें तेथे त्याच्या योगानें मनास आल्हाद होतो.

रस्किन् म्हणतो कीं, वास्तविक पाहतां वाईट हवा कधींच नसते. चांगल्या हवेचे निरनिराळे प्रकार मात्र असतात.

विश्रांति घेणें ही गोष्ट फार अवश्य आहे. विश्रांतींत घालविलेला वेळ आळसांत गेला असें समजू नये. शरदृतूमध्यें एकाद्या झाडाच्या छायेखालीं हिरव्यागार मैदानांत कांहीं वेळ पडून जलप्रवाहाचा मधुर आवाज ऐकत बसणें, आकाशांत मेघ इकडून तिकडे जातांना पहाणें, वगैरे प्रकारच्या करमणुकींत गेलेला वेळ फुकट गेला असें मानूं नये. बहुतेक व्यायाम स्वच्छ हवेंत घेण्यासारखेच असतात. व अशाच प्रकारचे व्यायाम आपण करावे. म्हणजे तेणेंकरून व्यायाम व स्वच्छ हवा ह्या दोहोंचाहि लाभ एकदम होतो. घोड्यावर बसून सहल करणें फारच हितावह आहे, परंतु पायीं फिरणें देखील फायदेशीर आहे. प्रत्येक मनुष्यानें दररोज निदान दोन तासपर्यंत तरी उघड्या हवेंत घालविणें हें आपलें एक महत्वाचें व पवित्र काम आहे असें समजलें पाहिजे.

स्वच्छ हवा केवळ शरीरालाच सुखकर असते असें नाहीं. तर मनास देखील ती हितावह आहे. स्वच्छ हवेंत फिरावयास गेल्यानें सृष्टीचे नाना चमत्कार आपल्या दृष्टीस पडून आपल्या मनास आल्हाद देतात. सु-

ष्टि जणूं काय आपणास कांहीं तरी महत्त्वाची गोष्ट सांगण्यास तयार आहे असें वाटतें. आणि तें खरेंच आहे. सृष्टीपासून शिकण्यासारखें ज्ञान अनंत व अमोलिक आहे.

पृथ्वी, आकाश, अरण्यें, शेतें, तलाव, नद्या, पर्वत, समुद्र हे आपले सर्वोत्तम शालागुरु आहेत. पुस्तकांत जें ज्ञान नाहीं तें हे गुरु शिकवितात. खेड्यापाड्यांत जाऊन तेथें एकाद्या नदींत स्वतः वल्हवून नाव चालविणें, रानांतील फुलें गोळा करणें, एकाद्या खाणींतून प्राचीन कालच्या प्राण्यांचे व वनस्पतींचे अवशिष्ट भाग शोधून काढणें, समुद्रकिनाऱ्यावर जाऊन तेथें नाना प्रकारच्या चित्रविचित्र शिंपा व समुद्रांतील वनस्पती गोळा करणें, चेंडूफळी वगैरे खेळ खेळणें, इत्यादि अनेक प्रकारांनीं आपणांस व्यायाम आणि स्वच्छ हवा ह्या दोहोंचाहि लाभ होतो. त्याच्या योगानें आपली शरीरप्रकृति निरोगी होते एवढेंच नाहीं, तर आपल्या चिंता व मानसिक व्यथा ह्यांचें दुःख बऱ्याच अंशीं हलकें होतें. सृष्टिवैभवाच्या देखाव्यानें आपलें मन शांत, प्रसन्न व उल्लसित होतें.

मनोरंजनाचा वर सांगितल्याप्रमाणें मोठा उपयोग आहे. परंतु आपला सर्व काळ सुखांत व मनोरंजनांत घालविणें सर्वथा अयोग्य होय. कारण एक तर तसें केल्यानें निवळ आपलपोटेपणा होऊन परोपकाराच्या अप्रतिम आनंदास आपण मुकतों. व दुसरें असें कीं, साराच वेळ जर ख्यालीखुशालींत घालविला तर त्यापासून सुख होण्याचें एकीकडे राहून उलटा वीट मात्र येतो.

म्हणून खेळ खेळणें हा आपला एक धंदाच आहे असें समजून चालतां कामा नये. परंतु नेमस्तपणानें सुखोपभोगांत वेळ घालविल्यास तो आळसांत गेला असें समजूं नये.

आतां महत्त्वाचा प्रश्न असा आहे कीं, मनोरंजन ह्या सदराखालीं कोणत्या कोणत्या गोष्टींचा समावेश करितां येईल? उपभोग पुष्कळ प्रकारचे आहेत व कांहीं मिथ्या आहेत.

प्लेटोनें आपल्या एका ग्रंथांत ह्याच विषयावरील प्रोटार्कस् व साक्रेटीस् ह्यांच्यामधील संवाद दिला आहे तो एणेप्रमाणें:—

प्रोटार्कस्—बरें, साक्रेटिस्, खरीं सुखें म्हणून तुम्ही म्हणतां तीं कोणतीं?

साक्रेटिस्—सुंदर रंग, सुंदर आकृति, मधुर सुवास, सुस्वर आवाज इत्यादि वस्तू अशा आहेत कीं, त्या आपणापाशीं नसल्या तर दुःख होत नाहीं. पण असल्या तर त्यांपासून सुख होतें. अशा प्रकारच्या वस्तूंपासून होणारें जें सौख्य तें खरें सौख्य होय.

इंद्रियांपासून वर सांगितलेले खरे उपभोग जरी प्राप्त होतात, तरी ह्या जगांतील सर्वोत्कृष्ट सौख्य त्यांपासून होत नाहीं.

फिबियम् ह्याचें असें म्हणणें होतें कीं, "शारीरिक उपभोग, सौख्य आणि आनंद हे प्रत्येक मनुष्यास हितकर आहेत. परंतु माझें असें म्हणणें आहे कीं, ह्या सुखांपेक्षां शहाणपणा, ज्ञान, चांगली स्मरणशक्ति, वि-

चारशक्ति इत्यादि गोष्टी अधिक चांगल्या व श्रेयस्कर आहेत. ”

भगवद्गीतेमध्यें सुखाचे तीन प्रकार सांगितले आहेतः—

( श्लोक )

सुखं त्विदानीं त्रिविधं । शृणु मे भरतर्षभ ॥
अभ्यासाद्रमते यत्र । दुःखांतच निगच्छति ॥ १
यत्तदग्रे विषमिव । परिणामेऽमृतोपमम् ॥
तत्सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ २
विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ॥
परिणामे विषमिव । तत्सुखं राजसं स्मृतं ॥ ३
यदग्रे चानुबंधेच । सुखं मोहनमात्मनः ॥
निद्रालस्यप्रमादोत्थं । तत्तामसमुदाहृतं ॥ ४

**भावार्थः—**

( आर्या )

जें आधीं विषवत् जें परिणामीं अमृततुल्य जें टिकतें ॥
स्वस्थपणें मनबुद्धी उपजे, सुख बोलतात सात्विक तें ॥१
विषयेंद्रियसंयोगें आरंभीं अमृततुल्य जें दिसतें ॥
परिणामीं विषवत् जें जाणावें सुख सदैव राजस तें ॥ २
आरंभीं परिणामीं मोह करी तें मनासि जें दुष्ट ॥
निद्रा प्रमाद अलसें, उपजे, सुख म्हणाति तामसी स्पष्ट ॥ ३

ह्या जगांत खऱ्या सुखाचीं साधनें असंख्य प्रकारचीं आहेत असें म्हटलें तरी चालेल. आपल्या आप्तांचा व इष्टमित्रांचा सहवास, चांगलें संभाषण, पुस्तकें, संगीत, काव्यें, कला, व्यायाम, विश्रांति, सृष्टींतील नाना प्रकारचे सुंदर देखावे, हिंवाळा, पावसाळा, उन्हाळा, सकाळ आणि संध्याकाळ, रात आणि दिवस, ऊन

आणि पाऊस, अरण्यें आणि शेतें, नद्या, सरोवरें, समुद्र, प्राणी आणि वनस्पती, झाडें, फुलें, पानें आणि फळें, हीं त्यांपैकीं कांहीं आहेत. आणखी मनुष्यास ठाऊक नाहींत अशीं सुखाचीं साधनें अनेक असतील. व तीं मनुष्याची उन्नति जसजशी वाढेल तसतशीं क्रमाक्रमानें आपणांस कळूं लागतील. ज्याच्या योगानें एकाद्या मनुष्याचें भाषण किंवा गायन जसेंच्या तसें रक्षण करितां येतें व नंतर पाहिजे तेव्हां काढतां येतें असें जें फोनोग्राफ नामक यंत्र हल्लीं तयार झालें आहे तें एक नवीन सुखाचें साधन आहे फोटोग्राफ अथवा सूर्यप्रकाशाच्या योगानें मनुष्याची हुबेहुब तसबीर काढण्याची कला ही त्या वर्गांतील होय.

ह्या आयुष्यापासून आपणास सुखोपभोग होत नसेल तर तो दोष खरोखर आपला आहे. रस्किन् म्हणतो, " सुखोपभोग घेणें हें सर्वांस सुसाध्य आहे. पण एकादें महत्कार्य करून जीवित सफल करणें हें मात्र फार कठिण आहे. "

अरेबियन् नाइट्स ह्या ग्रंथामध्यें एका जादूच्या गालिचाची गोष्ट सांगितली आहे. त्या गालिचावर कोणी मनुष्य बसला तर त्याला तो गालिचा इच्छिलेल्या ठिकाणीं नेऊन पोंचवीत असे. आगगाडीच्या योगानें हल्लीं आपणां सर्वांस वरील अजब चिजेप्रमाणेंच उपयोग होत आहे.

सुखोत्पादक साधनांमध्यें चांगल्या संभाषणाची योग्यता बरीच मोठी ठरेल. काम करून थकल्याभागलेल्या

मनुष्याच्या मनास व शरीरास हुषारी आणणारें तें उत्तम औषधच आहे असें म्हटलें तरी चालेल. हेरिक् ह्यानें बेन् जॉनसनच्या संभाषणापासून आपणास किती आनंद होत असे त्याचें वर्णन केलें आहे:—

( आर्या )

भोजनसमयीं ह्याता पात्रें जरि पूर्ण विविध मिष्टान्नीं ॥
धालों तसा न त्यांनीं, धालों जैसा तुझ्या अमृतवचनीं ॥ १

जॉनसन् ह्याला एकादी सायंकाळची वेळ मौजेंत गेली असें सांगावयाचें असलें म्हणजे तो म्हणत असे कीं, आज चांगल्या चांगल्या संभाषणांचा लाभ झाला. आणि खरोखरच एकाद्या विद्वान्, चतुर, आणि विनोदी मनुष्याशीं केलेलें संभाषण स्वच्छ हवेसारखें उत्साहवर्धक असतें.

चांगलें संभाषण करणें सर्वांसच साधत नाहीं. कांहीं लोक फार बुद्धिमान् असतात, व त्यांच्यापाशीं पुष्कळ मनोरंजक माहिती असते; ते एकदां बोलूं लागले म्हणजे त्यांचें भाषण फार चित्तवेधक होतें. पण त्यांना बोलावयास लावणें म्हणजे महाप्रयत्नाचें काम असतें. चांगलें संभाषण करणारा मनुष्य सर्वत्र प्रिय असतो. संभाषण करण्याची कला इतर कलांप्रमाणेंच संपादन करितां येण्याजोगी आहे. बोलण्याची संवय असल्याशिवाय चांगलें बोलतां येणें कठिण आहे.

सर विल्यम् टेंपल म्हणतो, "संभाषण चांगलें होण्यास चार गोष्टी अवश्य आहेत:–सत्य, सदर्थ, सौ-

जन्य आणि विनोद." ह्यांपैकीं निदान पहिल्यां तीन गोष्टी प्रत्येक मनुष्यास साध्य होण्यासारख्यां आहेत.

पुष्कळ लोक असे आहेत कीं त्यांचें बहुतेक ज्ञानभांडार संभाषणापासून प्राप्त झालेलें असतें. बेकन म्हणतो कीं, " जाणत्या मनुष्यास प्रश्न करून पुष्कळ ज्ञान मिळवितां येतें व तें आपल्या मनांत चांगलें ठसतें. ज्या विषयांत एकादा मनुष्य प्रवीण असेल त्याच विषयासंबंधानें त्याला प्रश्न करावे. म्हणजे त्या मनुष्यास उत्तर देण्यास आनंद वाटतो. आणि आपणासहि ज्ञानाचा यथेच्छ लाभ होतो. "

ज्ञानेश्वर महाराजांनीं वक्ता आणि श्रोता हे दोन्ही एका ठिकाणीं जमले म्हणजे ज्ञाननिष्पत्ति कशी होते त्याचें वर्णन केलें आहेः—

( ओंवी )

अहो चंद्रकांत द्रवता कीर होये। परी ते हातोटी चंद्रीं कीं आहे॥
म्हणवूनि वक्ता तो वक्ता नोहे। श्रोतेंविण॥ १

पुष्कळ लोकांस सौंदर्य ह्या गुणाची परीक्षा नसते. परंतु सौंदर्यापासून होणाऱ्या आनंदासारखा शुद्ध, बिनखर्ची, व सहज प्राप्त होणारा दुसरा कोणता आनंद आहे ? सृष्टींतील देखावे, झाडें, पालवी, फळें, फुलें नीलवर्ण आकाश, पिंजलेल्या शुभ्र कापसाप्रमाणें दिसणारे ढग, चमकणारा समुद्राचा पृष्ठभाग, जलप्रवाहाचा आवाज, नदीच्या पृष्ठावरील चकाकी, चंद्र, तारे, इत्यादि वस्तूंपासून कित्येकांस फारच आनंद होतो. पण

कांहीं लोकांस ह्या वस्तूंचें कांहींच कौतुक वाटत नाहीं. चंद्र आणि तारे ह्यांचा प्रकाश ह्या लोकांस असला आणि नसला तरी सारखाच. सुंदर पक्षी आणि कीटक, झाडें, फुलें, नद्या, समुद्र, चंद्र, सूर्य इत्यादि वस्तूंपासून त्यांना कांहींच आनंद वाटत नाहीं.

मनुष्यानें केलेले कृत्रिम रंग मानवी वैभवास शोभण्यासारखे आहेत. पण एकाद्या क्षणभंगुर मेघमालेच्या रंगापुढें किंवा हंसाच्या पंखांतील एका लहानशा पिसाच्या रंगापुढें ते अगदीं फिक्के पडतात.

दिवस उगवतांना व मावळतांना जी प्रभा पडते तिचें लावण्य अप्रतिम असतें व तिच्या योगानें नेत्रांस विलक्षण आनंद होतो. त्या वेळचे क्षितिजाजवळचे ढग आपल्या कांतीनें रसरसीत सोन्यासहि लाजवितात. आकाशांतील निरनिराळ्या रंगांनीं पृथ्वीवर जिकडे तिकडे आनंद आणि प्रसन्नता यांचें तेज झळकूं लागतें.

( ओंवी )

तो पूर्वेस उदेला अंशुमाळी । तेणें नाशिली तिमिरावळी ॥
विहंगम कुजती वृक्षडहाळीं । धेनू बाहती वत्सातें ॥ १

—श्रीधर

सूर्यास्ताचा देखावा तर फारच मनोहर असतो. त्याकडे पहात असतां जणूं काय आपण स्वर्गाच्या दरवाजांतून आंत नजर टाकीत आहों असें भासतें.

( श्लोक )

अस्तोदयाचल विलंबि रवींदुबिंब ।
व्याजात्क्षणं श्रवणयोर्निहितारविंदा ॥

ताराच्छलेन कुसुमानि समुत्क्षिपन्ती ।
सन्ध्येयमागतवती प्रमदेव काचित् ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—सूर्याचें आरक्त बिंब अस्ताचलाच्या खालीं गेलें आहे. चंद्रबिंब उदयागिरीवर आहे. नक्षत्रें नुकतींच चमकूं लागलीं आहेत. अशा वेळीं संध्या (सायंकाळ) ही, जिनें कर्णाच्या ठिकाणीं कमलें धारण केलीं आहेत, व जी हातानें फुलें उधळीत येत आहे, अशा सुंदर युवतीप्रमाणें दिसते.

यहुदी लोकांचा 'टालमड' या नांवाचा एक धर्मग्रंथ आहे, त्यांत 'म्याना' नांवाचा एक पदार्थ ईश्वरानें लोकांस दिला होता, असें सांगितलें आहे. त्याचें वर्णन असें केलें आहे कीं, ज्याला जी रुचि आवडत असे त्याला तीच रुचि त्या पदार्थापासून प्राप्त होत असे. त्याचप्रमाणें सृष्टींत ज्या मनुष्यास जी वस्तु अतिशय सुंदर वाटते ती त्याला सांपडण्यासारखी आहे.

ह्या जगांतील खऱ्या सुखांची संपूर्ण यादी करूं लागल्यास ती फारच मोठी होईल. ज्यांपासून कांहीं अपाय होणार नाहीं अशीं सुखें जर असंख्य आहेत तर मुद्दाम अपायकारक किंवा संशयात्मक सुखांच्या पाठीमागें आपण काय म्हणून लागावें? निदान एवढें तरी करावें कीं, जीं चांगलीं सुखें आहेत त्यांच्याकडे प्रथम वळावें, आणि तीं सर्व संपल्यानंतर मग खुशाल दुसऱ्या सुखांचा विचार करावा.

ज्या लोकांना आपणांस जगाचा फार अनुभव आहे व त्याची चांगली माहिती आहे असें वाटतें त्यांचा स-

मज फार चुकीचा असतो. ज्यानें आपला गांव कधीं सोडला नाहीं, पण आपल्या डोळ्यांचा चांगला उपयोग केला आहे, अशा एकाद्या कुणब्याला ह्या जगांतील जितक्या वस्तूंची माहिती असेल तितकी देखील त्यांना नसते.

ज्याला चैनबाजी किंवा रंगेलपणा म्हणतात त्यांत खऱ्या सुखाचा लवलेश नसून, उलट त्याची विडंबना मात्र असते. चैनबाज लोकांची परिणामीं हानीच होते. पण त्याबद्दल ते लोक स्वतःच कारण असून जगास उगीच दोष देत बसतात. "ऐषआरामांनीं मनुष्य हतवीर्य झाला म्हणजे त्याला सर्व सुखें भोगून झालीं असें वाटतें."

डीमसेट नामक एका चैनी फ्रेंच मनुष्यानें आपल्या स्थितीविषयीं पुढील उद्गार काढले आहेतः—"मी अजून तरुण आहें. संसारपथाच्या अर्ध्या भागापर्यंत देखील मी गेलों नाहीं, इतक्यांत मीं थकलों. पुढें जाण्याची मला मुळींच उमेद नाहीं." काय निराशेचे व दुःखाचे उद्गार हे! जर तो मनुष्य शहाणपणानें वागता तर गत आयुष्याबद्दल त्याला अभिमान, कौतुक आणि समाधान वाटलें असतें, व पुढच्या आयुष्यासंबंधानें उत्साह वाटला असता.

मनुष्याच्या जीविताची योग्यता त्याच्या नैतिक उन्नतीवर अवलंबून आहे. "आत्मा आणि शरीर ह्यांचा जोडी आहे. त्यांपैकीं आत्मा श्रेष्ठ आहे व शरीर कनिष्ठ आहे. जर आत्म्याचें वर्चस्व असलें, व आत्म्यानें

शरीरावर शहाणपणानें, स्नेहानें व दक्षतेनें अंमल चालविला, तर मनुष्य उत्तम योग्यतेस पावतो. पण जर शरीर शिरजोर होऊन अंमल गाजवूं लागलें तर कामक्रोधादिक षड्रिपु अनावर होऊन बुद्धीस भ्रंश होतो. सुविचारांचा व सदिच्छांचा लोप होतो. व तेणेंकरून मनुष्य नीच आणि विपद्ग्रस्त होतो.[1]"

(श्लोक०)

चंचलं हि मनः कृष्ण । प्रमाथि बलवद्दढं ॥
तस्याहं निग्रहं मन्ये। वायोरिव सुदुष्करं ॥ १
असंशयं महाबाहो । मनो दुर्निग्रहं चलं ॥
अभ्यासेन तु कौंतेय । वैराग्येणच गृह्यते ॥ २
त्रिविधं नरकस्येदं । द्वारं नाशनमात्मनः ॥
कामःक्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत् त्रयं त्यजेत् ॥ ३

—भगवद्गीता

**भावार्थः—**

( श्लोक )

कीं कृष्णा चंचल मन । इंद्रियें जें मथी बळी ॥
त्याचा निग्रह वाऱ्याची मोट जैशी न बांधवे ॥ १
खरेंच हें महाबाहो । मन चंचल दुर्जय ॥
अभ्यासें आणि वैराग्यें । तरी तें जिंकिजे तसें ॥ २

—वामन

( आर्या )

हें द्वार तीं प्रकारें नरकाचें आत्मघातक क्रूर॥
काम क्रोधहि लोभहि यासाठीं टाकिजेचि हे दूर ॥ १

—मोरोपंत

१ जेरेमीटेलर

( श्लोकचरण )

शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ।

—कालिदास

**भावार्थः**—शरीर हें धर्मप्राप्तीचें मुख्य साधन आहे.

# प्रकरण ५

## आरोग्य

मनुष्याचा आत्मा हा त्याचा उत्तम भाग होय ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु मनुष्याच्या हल्लींच्या स्थितीमध्यें तरी आत्म्याची क्रिया शरीराच्या द्वाराच चालते. ह्याचें एक मजेदार उदाहरण प्रसिद्ध शास्त्रज्ञ फयारडे ह्याच्यासंबंधानें घडलें. फयारडे हा लहानपणीं एका औषधविक्याच्या दुकानांत नोकर असतांना त्याला त्याच्या धन्यानें कांहीं कामाकरितां एका गृहस्थाच्या घरीं पाठविलें. त्यानें त्या ठिकाणीं जाऊन पुष्कळ हांका मारिल्या, परंतु कोणी ओ देत नाहीं असें पाहून आंत कोणी आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां तो आपलें डोकें गजांच्या आंत घालून डोकावूं लागला. इतक्यांत त्याच्या मनांत असा प्रश्न आला कीं, मी गजांच्या कोणत्या बाजूला आहें? त्यानें असें ठरविलें कीं, ज्या बाजूला डोकें असेल त्याच बाजूला मनुष्य असला पाहिजे. परंतु इतक्यांत दरवाजा एकाएकी उघडला आणि त्याच्या पायाला एक तडाका बसला त्यासरशी त्याची खात्री झाली कीं आत्मा सर्व शरीर व्यापून आहे.

हल्लीं आपल्या व्यवसायांत मोठे फेरफार झाले आहेत व त्यामुळें आरोग्यसंरक्षणाच्या विषयास फार महत्त्व आलें आहे. आपले पूर्वज होते ते विशेषेंकरून खेड्यापाड्यांतच राहत असत. व त्यांचे व्यवसाय बहुधा उघड्या जाग्यांत होत असत. त्यामुळें त्यांना स्वच्छ ह-

वेचा नेहमीं लाभ होत असे. हल्लीं आपणांपैकीं पुष्कळ लोकांस दाट वस्तीच्या शहरांत रहावें लागतें. व घरांत, दुकानांत, किंवा कारखान्यांत काम करावें लागतें. आमचीं बहुतेक कामें बसून आणि मान वांकवून करावीं लागतात. व तीं कामें मेंदूस क्षीण करणारीं असतात. हल्लींच्या मोठमोठ्या शहरांतले लोक आपल्या पूर्वजांपेक्षां सत्त्वहीन आणि कमकुवत आहेत ह्यांत मुळींच संशय नाहीं. मुंबईसारख्या शहरांत कोणी रस्त्यानें फिरावयास गेला असतां त्याला पुष्कळ लोक असे दिसून येतील कीं, त्यांच्या आंगांत काडीइतकी देखील ताकद नसते; त्यांचे चेहरे फिकट व निस्तेज असतात, व छाती अगदीं अरुंद असते. हल्लीं आरोग्यसंरक्षणाकरितां केलेल्या योजना एकाअर्थी अपायकारक आहेत, कारण त्यांच्यायोगानें अशक्त आणि रोगग्रस्त लोकांच्या जीवाचें संरक्षण होऊन रोगी व अशक्त प्रजा वाढत जाते. पुष्कळ रोग असे आहेत कीं, ज्याला आरोग्याच्या नियमांचें थोडेंसें ज्ञान आहे त्याला थोड्याशा काळजीनें ते सहज टाळतां येतील. प्राचीनकाळीं देखील शहाणे मुत्सद्दी प्रजेच्या आरोग्याकडे बरेंच लक्ष देत असत असें दिसून येतें. मनुस्मृतीमध्यें शरीर निरोगी रहावें या हेतूनें दिलेले नियम बरेच आहेत. " शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् " ही कालिदासोक्ति लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आपल्या आरोग्याचें रक्षण हें एक पवित्र कर्तव्य समजावें. " तुमचें शरीर हें पवित्र आत्म्याचें मंदिर आहे. त्याची हवी तशी नासधूस करण्याचा तुम्हांस अधिकार

नाहीं.[1]". इजिप्त देशांतील लोक शरीरास फार पूज्य मानीत. शरीरास तुच्छ मानणाऱ्या तत्त्ववेत्त्यांपेक्षां त्यांची कृति शहाणपणाची होती. शरीराची अगदीं हेळसांड करून चिंध्या पांघरणें व देह मलिन ठेवणें ह्यांत कांहीं साधुपणा किंवा सद्गुण आहे असें समजूं नये.

ग्रीक लोक शरीर व मन ह्या दोहोंच्याहि शिक्षणाकडे फार लक्ष देत असत. त्यांच्या स्त्रियाहि शरीरास हितकर अशा ललितक्रीडा व व्यायाम करीत असत. आरोग्यवर्धक व्यायामांनीं ग्रीक लोकांचीं शरीरें फारच बांधेसूद आणि सुरेख बनत असत. त्यांची कल्पना त्यांच्या वेळचे पुतळे जे हल्लीं शिल्लक आहेत त्यांवरून करितां येण्यासारखी आहे. हल्लींच्या काळीं कोणत्याहि देशांत अशा नमुन्याचें रेखीव आणि बांधेसूद शरीर दृष्टीस पडणार नाहीं. मुंबई एथील स्कूल ऑफ् आर्ट्स नामक चित्रशाळेंत कांहीं ग्रीक पुतळे ठेविले आहेत. ते ज्यांनीं पाहिले नसतील त्यांनीं अवश्य पहावे.

'निर्मलतेची योग्यता ईश्वरभक्तीच्या खालोखाल आहे' अशी इंग्रजी भाषेंत म्हण आहे. हल्लीं रोगाच्या उत्पत्तीविषयीं जे नवीन शोध लागले आहेत त्यांवरून वरील म्हणीची यथार्थता दिसून येते. हल्लीं असें कळून आलें आहे कीं, बहुतेक रोग जे आपणास होतात ते आपल्या शरीरांत कांहीं फेरफार झाल्यामुळें होत नाहींत, तर बाहेरील सूक्ष्म जीव किंवा वनस्पति ह्यांचा आपल्या शरीरावर हल्ला झाल्यामुळें होतात. हे जीव आ-

1 सेंटपॉल

णि वनस्पति इतके बारीक असतात कीं, त्यांचे थव्यांचे थवे एका सुईच्या अग्रावर राहूं शकतील. ते सूक्ष्मदर्शकयंत्राच्या साधनाशिवाय दिसत नाहींत. महामारी, प्लेग, वगैरे अनेक रोग आमच्या शरीरांत आपोआप उत्पन्न होत नाहींत. ह्या रोगांचे सूक्ष्म जंतु आहेत, त्यांना शरीरांत रहाण्यास जागा मिळाली म्हणजे हे रोग जडतात. हे जंतू, पाणी, हवा, कपडे, व इतर वस्तू ह्यांच्या द्वारें मनुष्यांच्या शरीरांत प्रवेश करितात. ह्याकरितां आपलें रहातें घर, पिण्याचें पाणी, आपलें कपडे, आपलें अन्न, व ज्या हवेंत आपण श्वासोच्छ्वास करितों ती हवा स्वच्छ ठेवण्याचें काम किती महत्त्वाचें आहे बरें!

मनुष्यदेह हा किती आश्चर्यकारक आहे! मेंदूसारख्या लहानशा पदार्थामध्यें ज्ञानाचा केवढा मोठा संचय असतो, याचाच क्षणभर विचार केला तर केवढा चमत्कार वाटण्यासारखा आहे! स्नायु मनाचे हुकूम किती त्वरेनें बजावितात. उत्कृष्ट सतार वाजविणारा मनुष्य एका सेकंदांत निदान १२ स्वर वाजवितो. प्रत्येक स्वर वाजवितेवेळीं ज्ञानतंतूंच्या द्वारें मेंदूपासून बोटापर्यंत व बोटापासून मेंदूपर्यंत तार जाते. प्रत्येक स्वराच्या वेळीं डाव्या हाताच्या बोटास तीन गती द्याव्या लागतात व उजव्या हाताच्या बोटास एक गती द्यावी लागते. मिळून एका स्वराकरितां चार गती दोन बोटांच्या मिळून होतात. डाव्या हाताचें बोट स्वराच्या पडद्यावर ठेवतांना एक गती, त्याच्यावरून बोट उचलण्याची दुसरी गती, त्या स्वराच्या पडद्यावरून दुस

त्या स्वराच्या पडद्यावर. बोट नेण्याची तिसरी गती. त्याचप्रमाणें उजव्या हाताच्या बोटानें नखीच्या आघाताची एक गती. ह्याप्रमाणें एका सेकंदांत ४८ गती होतात. त्या प्रत्येक गतीसाठीं अमुक ठिकाणीं अमुक वेळांत अमुक जोरानें बिनचुक बोट पडावें म्हणून मनास निरनिराळा व्यापार घडतो.

शरीराची त्वचा ही फार नाजूक आहे व तिची रचना फार बिकट आहे. तिला लक्षावधि छिद्रें आहेत. व तिच्यांत रक्तवाहिन्या, नाड्या, केशासारख्या शिरा, व ज्ञानतंतु इतके आहेत कीं, ते काढून एकापुढें एक जोडले असतां मैलांचे मैल लांब भरतील. ह्या त्वचेचा नेहमीं.क्षय होत असतो व तो क्षय ती नेहमीं भरून काढीत असते. त्वचेचा व्यापार नीट चालण्याकरितां तिची बरीच काळजी घ्यावी लागते. व ती पाण्यानें वरचेवर धुवून स्वच्छ ठेवली पाहिजे. हें आश्चर्यकारक इंद्रिय निरोगी राहण्याकरितां त्याचे निरनिराळे भाग नेहमीं उपयोगांत ठेविले पाहिजेत.

पुष्कळ रोगी लोकांसंबंधानें असें म्हणतां येईल कीं सौख्य हाच त्यांचा मुख्य रोग असतो. कार्थेजचा प्रख्यात सरदार हॅनिबॉल हा आल्प्स पर्वतावरून व बर्फांतून हिंडत असतां त्याला कांहीं इजा झाली नाहीं. पण तोच हॅनिबॉल क्यापेनिया एथे ऐषआरामांत राहूं लागल्यापासून त्याची शक्ति क्षीण झाली. लढाई करीत असतां जो नेहमीं विजयी असे, तोच सुखांत पडल्यावर सहज जिंकला गेला

इंद्रियें हीं रथाच्या घोड्यांसारखीं आहेत. हीं मनोरूपी सारथ्याच्या कह्यांत आहेत, तोंपर्यंत त्यांच्यापासून शुद्ध व खरें सौख्य होतें. पण जर कां हीं इंद्रियें भडकलीं व तीं आपल्या स्वाधीन न राहतां आपणच त्यांच्या स्वाधीन झालों तर तीं आपणास कोणत्या खड्ड्यांत नेऊन आदळतील ह्याचा नेम नाहीं. खाण्यापिण्याच्या संबंधानें अव्यवस्थितपणा करून आपण पुष्कळ रोग आपणावर ओढून आणतों. मद्यपानाच्या घातकी संवयीचा प्रसार दिवसेंदिवस जास्त होत आहे ही मोठ्या दुःखाची गोष्ट होय. मद्यपानापासून संसाराची धुळधाण होते. शरीराचें मातेरें होतें व मनुष्याच्या हातून नानाप्रकारचे गुन्हे होतात. यहुदी लोकांत अशी म्हण आहे कीं, " सैतानाच्यानें जेथे जातीनें जाववत नाहीं तेथे तो मद्यास आपला प्रतिनिधि म्हणून पाठवितो. "

प्लिनी म्हणतो, " दारूच्या योगानें हात कांपतो, डोळ्यांतून पाणी येतें, रात्रीं झोंप येत नाहीं, वाईट स्वप्नें पडतात, तोंडास दुर्गंधि येते, आणि कोणत्याहि गोष्टीची आठवण रहात नाहीं." सर वाल्टर रेले म्हणतो, " ज्यांना दारू प्रिय झाली त्यांच्यावर कोणी विश्वास ठेवीत नाहीं; कारण अशा माणसांच्या तोंडांत कांहीं गुप्त गोष्ट रहात नाहीं. दारूच्या योगानें मनुष्य पशु होतो इतकेंच नाहीं तर अगदीं वेडा होतो. मनुष्य दारूबाज झाला म्हणजे त्याची बायको, मुलें व इष्टमित्र ह्यांना देखील त्याचा तिरस्कार वाटूं लागतो."

( आर्या )

बुद्धि ज्ञान हिरावुनि ने जो रिपु त्या मुखीं घसविती हा ! ॥
व्यसनकुसुखरजि लोळुनि, जागे केवळ जोडिती पशुपणा हा॥ १

—शेक्सपिअर

" दारूबाज मनुष्य प्रथम चांगला विचारी असून दारूमुळें मर्ख होतो. व शेवटीं शेवटीं केवळ पशु बनतो. " पण अशा मनुष्यास पशूची उपमा देणें म्हणजे बिचाऱ्या पशूंना विनाकारण कमीपणा आणल्यासारखें होतें. अपत्यप्रेम, सोशिकपणा, अपार श्रम, परोपयोगित्व इत्यादि गुणांत दारूबाज मनुष्य पशूंची देखील बरोबरी करील काय ?

मनुष्य निर्व्यसनी आणि मिताहारी असला तर त्याची स्थिति याहून किती भिन्न असते.

( श्लोक )

दिसे जरठ मी परी सबळ वीर्यवान् देह हा ।
न सेविलि सुरा कदा म्हणुनि पावलो लाभ हा ॥
जरी वय बहू असे धवल केशही जाहले ।
गमे मज करीन युद्ध तरुणासवें चांगलें ॥ १

—शेक्सपिअर

अधाशीपणानें खाणें हेंहि प्रकृतीस फार अपायकारक आहे. पुष्कळ लोक वाजवीपेक्षां जास्त खाणें खातात. एकादे दिवशी मेजवानी असेल त्या वेळची गोष्ट निराळी, परंतु दररोज बेताबाहेर अन्न खाण्याची संवय फार अपायकारक व उत्साहनाशक आहे. खाणें बेताबाहेर सहज जातें म्हणून त्यासंबंधानेंच फार जपलें पाहिजे. कोणीहि झाला तरी जरूर आहे त्यापेक्षां चुकीनें

**कमी खाईल अशी शंका बाळगण्याचें कारण नाहीं.**

( श्लोक )

अनारोग्यमनायुष्यमस्वर्ग्यं चातिभोजनम् ।
अपुण्यं लोकविद्विष्टं तस्मात्तत्परिवर्जयेत् ॥ १

—मनु

**भावार्थ:**—अतिभोजन हें आरोग्य व आयुष्य यांची हानि करितें, व तें इतर प्रकारांनीं मनुष्याच्या उत्कर्षास विघातक आहे. म्हणून तें वर्ज्य करावें.

आपल्या सर्व वर्तनांत नेहमीं मर्यादा असावी. एका मर्यादित वर्तनानें मनुष्याच्या ज्ञानाची व बलाची किंमत दसपट वाढते. त्याच्या योगानें बलास सौम्यता येते व उत्साहाचा फाजील अतिरेक होत नाहीं. सारांश कोणत्याहि कामांत उत्तम यश येण्यास मर्यादितपणाची फार जरूर आहे. मर्यादितपणा हा गुण निर्बलतेचा सूचक नसून शक्तीचाच सूचक आहे. मर्यादितपणा आत्मनिग्रह असल्यावांचून संभवत नाहीं. व आत्म्याचा निग्रह करण्यास लोकोत्तर शक्ति लागते.

जेवणांत फार वेळ घालवूं नये व घाईहि करूं नये. जेवणावरून थोडी भूक राखून उठावें. अत्याहारानें पोट जड झालें असतां मेंदूचा व्यापार नीट चालत नाहीं. जेवणानंतर एकदम काम करूं नये. कांहीं वेळ विश्रांति घ्यावी. पण एका जेवणापासून दुसऱ्या जेवणापर्यंत विश्रांतीच घ्यावी लागेल इतकें अन्न खाणाऱ्या मनुष्याचें जिणें व्यर्थ नव्हे काय? अन्न हें जीव जगण्याचें साधन आहे म्हणून तें खावें लागतें. पण अन्न खाणें हा जगण्याचा हेतु नव्हे. जगण्याचे हेतु निराळेच आ-

हेत. अतिशय खाण्यानें आयुष्याची हानि मात्र होते.

माफक आहार ठेविल्यानें मानसिक श्रम करण्याची शक्ति वाढते. माफक आहारानें चित्त प्रसन्न रहातें. अतिशय खाण्यानें मन उदास होतें. त्याचमुळें अग्निमांद्य हा रोग पुष्कळ लोकांस होतो, व त्यापासून दुसरे भयंकर विकार उत्पन्न होतात.

बेकन म्हणतो, "आपल्या आहारांत एकाएकीं कांहीं नवीन फेरफार करूं नये, पण कांहीं अनिवार्य कारणामुळें असा फेरफार करणें भाग पडलें तर त्याला अनुरूप अशी इतर व्यवस्थाहि ठेवावी. जेवतांना, झोंप घेतांना, व व्यायाम करितांना निश्चित मन व सुप्रसन्न अंतःकरण ठेवावें; हा आयुष्य वाढविण्याचा एक उत्तम उपाय आहे."

दुसरा एक ग्रंथकार म्हणतो:—"जर तुमची प्रकृति निरोगी रहावी अशी तुमची इच्छा असेल तर रोज तीन आणे स्वकष्टानें मिळवून त्यावर निर्वाह करा."[1] ह्या चतुर उक्तीमध्यें आहार आणि व्यायाम ह्यांसंबंधाचे सर्व नियम आले. खरोखर म्हटलें तर एका मनुष्यास एक दिवस पुरण्याप्रमाणें सुग्रास अन्न तीन आण्यांत मिळण्यास हरकत नाहीं. तेवढ्या अन्नानें शरीराचें चांगलें पोषण होऊन अत्याहार होत नाहीं. व तेवढे पैसे मिळविण्यास पुरेल इतका व्यायाम मनुष्यानें दररोज करणें अगदीं अवश्य आहे, हेंहि उघड आहे.

शहरच्या लोकांस मोकळ्या हवेंत जेवढा वेळ घा-

१ आबरनेथी

लवितां येईल तेवढा त्यांस हितकारकच होईल. त्या वेळाचा सदुपयोग झाला नाहीं असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं, एवढेंच नाहीं तर त्याच्या योगानें मनुष्य निरोगी होऊन त्याची आयुर्मर्यादा वाढते.

स्वच्छ हवेप्रमाणें स्वच्छ पाण्याचेंहि फार महत्त्व आहे. मनुष्यानें दररोज चांगलें भरपूर पाणी घेऊन स्वच्छ स्नान केलें पाहिजे. पिण्याचें व स्नानाचें पाणी सोसेल तर थंड असावें हें चांगलें. दांत स्वच्छ ठेवणें ही गोष्ट लहानशी वाटेल, पण दांत स्वच्छ न ठेविल्यामुळें त्यांना कीड लागून ज्या भयंकर वेदना होतात त्यांमुळें मनुष्यापाशीं कितीहि सुखाचीं साधनें असलीं तरी तीं व्यर्थ होतात.

केवळ औषधं घेऊन आरोग्य मिळत नाहीं. ज्याला तें पाहिजे असेल त्यानें आपणास चांगल्या संवयी लावून घेतल्या पाहिजेत; व खाण्यापिण्याचा बेतबात चांगला ठेविला पाहिजे. रोग होऊं नये म्हणून अगोदरच औषध घेण्याची चाल चांगली नाहीं. आपण विचारानें वागलों असतां बहुधा औषधासाठीं पैसा खर्च करण्याचे प्रसंग थोडेच येतील. नेपोलियन ह्यानें म्हटलें आहे कीं, "मनुष्याच्या प्रकृतीमध्यें रोगास हटविण्याची स्वाभाविक शक्ति आहे. तिला आपलें काम करण्यास अवकाश दिला पाहिजे. औषधापेक्षां तीच चांगलें काम करिते. म्हणून तिच्या क्रियेस औषधं घेऊन अडथळा आणूं नये."

स्वच्छ हवा व स्वच्छ पाणी ह्यांचा जर आपण ए-

येच्छ उपयोग केला व आपला आहारविहार नियमित ठेविला तर आपणांपैकीं बहुतेकांस बल आणि आरोग्य ह्यांजपासून होणाऱ्या उत्कृष्ट आनंदाचा लाभ होईल, व आपल्या ज्वानीचा भर उतारवयापर्यंत देखील टिकेल.

पण केवळ शरीराची काळजी घेऊन आरोग्य प्राप्त होईल असें नाहीं. आरोग्यास मनाची सुस्थिति देखील फार अवश्य आहे. "क्रोध, द्वेष, चिंता, दुःख, भय, इत्यादि मनोविकार जीवनकलेचे विध्वंसक आहेत." आणि उलटपक्षीं प्रसन्नता, सुस्वभाव, शांति इत्यादि गुण आरोग्यवर्धक आहेत.

लायकर्गस म्हणून स्पार्टा देशांत कायदे करणारा होऊन गेला, त्यानें स्पार्टा एथील प्रत्येक भोजनगृहांत हास्यदेवतेची एक मूर्ति असावी म्हणून कायदा केला होता. त्याचा हेतु हाच कीं, मनुष्यानें भोजनसमयीं सुप्रसन्न असावें म्हणजे खाल्लेलें अन्न शरीरास चांगलें मानवतें. बफन म्हणतो कीं, "पुष्कळ लोक वृथा अभिमानानें व चिडखोरपणामुळें आपल्या आयुष्याचा क्षय करून घेतात."

कधीं कधीं मनुष्याचें मन अगदीं अस्वस्थ होऊन जातें. त्याच्या ज्ञानतंतूला धक्का बसतो. अगदीं क्षुल्लक त्रास त्याला एकाद्या भयंकर संकटाप्रमाणें भासूं लागतो. असें झालें म्हणजे त्या मनुष्याला विश्रांति व स्वच्छ हवा ह्यांची फार जरूर आहे म्हणून समजावें.

आपण पुष्कळ वेळां लोकांना असें म्हणतांना य-

कर्तो कीं, अमुक अमुक मनुष्य अतिश्रमानें अकालीं मरण पावला. अतिश्रमानें मनुष्यें मरतात खरीं, पण अशीं उदाहरणें फार विरळा. काम करणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजून प्रसन्न मनानें व सद्बुद्धीनें केलेल्या श्रमानें प्रकृतीस कधीं अपाय होणार नाहीं परंतु श्रम करितांना फाजील महत्त्वाची इच्छा, दुसऱ्याच्या उत्कर्षाचा हेवा, संताप, काळजी, इत्यादि मनोविकार प्रबळ झाल्यास त्यांच्या योगानें मात्र शरीराचा नाश होईल यांत शंका नाहीं. वास्तविक म्हटलें तर श्रमापेक्षां निरुद्योग, व्यसन, सुखासक्ति इत्यादि दुर्गुणांमुळेंच पुष्कळांस मरण येतें. मानसिक श्रम देखील प्रकृतीस हितकर होतात. ज्याप्रमाणें स्नायु बळकट आणि निरोगी रहाण्याकरितां त्यांना व्यायामाची जरूर आहे त्याप्रमाणेंच मेंदू तरतरीत आणि निरोगी राहण्याकरितां त्यालाहि व्यायामाची जरूर आहेच. सदाचार, नियमितपणा, आहारविहारांत नियमितपणा इत्यादि चांगल्या गुणांचें वळण लावून घेतलें असतां दीर्घ परिश्रम देखील आपल्या आवांक्याच्या बाहेर नसतील तर अपायकारक न होतां हितकरच होतात.

कधीं कधीं आपणांस झोंप येईनाशी होते. असें झालें म्हणजे आपण फार अस्वस्थ होतों. व मनास चैन पडत नाहीं. ज्या लहान लहान अडचणी सोसण्यांत एक प्रकारची हौस वाटली पाहिजे त्याच अडचणी पर्वतप्राय भासूं लागतात. आनंददायक वस्तूंपासून आनंद होत नाहीं. आणि ज्या गोष्टी मनाप्रमाणें झाल्या नस-

तील किंवा होणार नाहींत असें वाटतें त्यांचाच सदा-सर्वकाळ ध्यास लागून रहातो. अशी स्थिति झाली तर निराश होण्याचें किंवा भिण्याचें कांहीं कारण नाहीं. पण झोंप येण्याकरितां कांहीं औषध म्हणून घेऊं नये. कारण अशा प्रकारच्या औषधांचा परिणाम भयंकर होतो. झोंप येण्यास खरा उपाय म्हटला म्हणजे हा आहे कीं, घरांत फार वेळ बसून न रहातां मोकळ्या हवेंत जेवढें जाववेल तेवढें जावें, कोणत्याहि गोष्टीक-रितां मनास आंच लावून घेऊं नये, व समाधानवृत्ति ठेवावी. म्हणजे निद्रेचें सौख्य पुन: प्राप्त झाल्यावांचून रहाणार नाहीं.

पुष्कळ शारीरिक व्याधींचा मनाशीं निकट संबंध असतो. म्हणून वैद्यांनीं रोगाचें निदान करितांना फक्त शारीरिक चिन्हें पाहून थांबतां कामा नये. त्यांनीं रो-ग्याच्या मनाची स्थितिहि पाहिली पाहिजे. व मान-सिक व्याधीहि बऱ्या करण्याची खटपट केली पाहिजे.

आरोग्य नसल्यानें मनुष्य असुखी होतो एवढेंच ना-हीं, तर त्याच्या हातून फारसें कामहि पूर्ण होत नाहीं. अशा मनुष्याच्या हातून स्वत:चाच निर्वाह कष्टानें हो-णार, मग तो दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्याची गोष्ट क-शाला पाहिजे ! म्हणून जगांत येऊन कांहीं चांगलें कृ-त्य करावयाचें असेल, लोकांच्या उपयोगीं पडावयाचें असेल, व जीवित सफल करून घ्यावयाचें असेल, तर आरोग्याचें रक्षण करणें फार अवश्य आहे.

आपल्या प्रकृतीस सोसतील त्यापेक्षां जास्त श्रम क-

रणें बरोबर नाहीं. कारण तसें केल्यानें एकंदरींत जितकें काम आपल्याकडून होण्यासारखें आहे, तितकें देखील होत नाहीं. बेताबाहेर श्रम केल्यास कांहीं दिवसपर्यंत पुष्कळ काम होईल खरें, पण लवकरच थकवा येऊन किंवा प्रकृती बिघडून बरेच दिवसपर्यंत काम बंद करावें लागेल. तसेंच, अशा रीतीनें केलेलें काम चांगलें होणार नाहीं. त्या कामांत काम करणाराची अस्वस्थ वृत्ति व निर्बलता ह्यांचे परिणाम व्यक्त होतील, विचारशक्ति चांगली राहणार नाहीं; जेथे दुसऱ्याशीं मिळून काम करावयाचें असेल तेथे बहुशः चुरस व गैरसमज उत्पन्न होतील. एकादी लहानशी चिठ्ठी लिहितांना देखील हात कांपूं लागतो. असें होण्यास स्नायूंची व ज्ञानतंतूंची क्षीणता हीच कारण होय. श्रम केल्यापासून जीवास सुख झालें पाहिजे. श्रम नियमानें व धिमेपणानें केले पाहिजेत, एकसारखे करून उपयोग नाहीं. खाणें, पिणें, विश्रांति, व्यायाम यांच्याकडे दुर्लक्ष करितां कामा नये. अशा रीतीनें केलेल्या श्रमांपासून त्रास न होतां सुख होतें.

रुग्णावस्थेपासून होणारी निर्बलता व निरुपयोगीपणा हे दोष, जे लोक आपणच आपल्या हातांनीं आपली प्रकृति बिघडून घेतात त्यांच्या ठिकाणीं विशेष दृष्टीस पडतात. पण कांहीं लोक स्वतःचा काहीं दोष नसतां जन्मतःच रोगी, अंध, पंगू, किंवा अशक्त असतात अशा लोकांच्या शारीरिक व्यंगापासून होणारें नुकसान भरून काढण्याकरितांच जणूं काय देव त्यांना तरतरीत

बुद्धि व आनंदी स्वभाव देत असतो. अशा प्रकारचे लोक मोठ्यां योग्यतेस देखील चढतात, व त्यांची आनंदवृत्ति, सौजन्य, व विनोदी स्वभाव पाहून आरोग्यसंपन्न लोक देखील तोंडांत बोट घालतात. अशा लोकांचें मन त्यांच्या कष्टमय जीवितयात्रेनेंच उन्नत होतें, व ते सर्वांस पूज्य होतात.

पेट्रार्क म्हणत असे कीं, विद्यार्जनासारखी मला दुसऱ्या कशाचीहि हौस वाटत नाहीं. शेक्सपिअर ह्यानें नाटकांतील एका पात्राच्या तोंडांत जे शब्द घातले आहेत ते बहुधा त्याच्या स्वतःच्याच मनाचे दर्शक असावेः—

( ओंवी )

ईश्वरी अवकृपेची खूण । जाणा अज्ञान हें दारुण ॥
स्वर्गारोहणा विमान । ज्ञान हेंचि तत्वता ॥ १

सालोमन ह्यानें म्हटलें आहेः—

( ओंव्या )

चातुर्य आणि ज्ञान । जयापाशीं लाभती हीं दोन ॥
जगामाजी धन्य धन्य । तोचि नर सर्वथा ॥ १
ह्या दोहींचा व्यापार । इतर व्यापारांहूनी थोर ॥
लाभ होतसे अपार । सुवर्ण तेथ कायसें ॥ २
रत्नें माणकें आणि हिरे । जे जे मिळतां कामना नुरे ॥
हीं सर्वही दिसतीं पामरें । ज्ञानधनाशीं तुलितां ॥ ३
संपत्ति आणि बहुमान । तैसें आयुष्य वर्धमान ॥
शांति आणि समाधान । प्राप्त होती तद्योगें ॥ ४
चातुर्याचें माहिमान । आगळें असे ज्ञानाहून ॥
म्हणोनि चातुर्य आणि ज्ञान । सर्वेचि मेळवीं प्रयत्नें ॥ ५

मोठमोठ्या ज्ञात्यांचीं मनें ह्या प्रकारचीं असूनहि लोकमत बरेच दिवसपर्यंत शिक्षणाच्या विरुद्ध होतें. आणि स्त्रियांच्या शिक्षणासंबंधानें तर पुसूंच नये. युरोप खंडांत देखील ही स्थिति होती, मग हिंदुस्थानांत असली तर काय नवल आहे? जर्मन् लोकांमध्यें तर अशी म्हण होती कीं, स्त्रियांचीं वस्त्राभरणाचीं कपाटें हींच त्यांची पुस्तकालयें होत. आणि फ्रेंच लोकांत अ-

शी म्हण होती कीं, बायकांना एक तर अशिक्षित ठेवावें, नाहीं तर कोंडून घरी ठेवावें. हल्लींपर्यंत अशी समजूत होती कीं, सुखवस्तु लोकांना व गरीब लोकांना शिक्षणाची मुळींच जरूर नाहीं. फक्त आचार्य, शास्त्री वगैरे लोकांना मात्र विद्येची जरूर आहे.

डॉक्टर जान्सन्सारख्या विद्वान् मनुष्याचें असें मत होतें कीं, जर प्रत्येक मनुष्य लिहिणें वाचणें शिकूं लागला तर सुताराचें, लोहाराचें, शेतकऱ्याचें, वगैरे कामें करण्यास कोणी तयार होणार नाहीं. पण शारीरिक श्रम करण्यांत कांहीं कमीपणा नसल्यामुळें डॉक्टर जान्सनचें मत चुकीचें आहे असें अनुभवानें ठरलें आहे.

ही पहिल्या काळची स्थिति झाली. नंतर दुसरा काळ आला. त्यावेळीं लोक म्हणूं लागले कीं, शिक्षण प्रत्येकास पाहिजे, पण तें प्रत्येकाच्या धंद्यापुरतेंच पाहिजे. त्यापेक्षां जास्त शिक्षण दिल्यास मुलांना आपली स्थिति व धंदा तुच्छ वाटूं लागतील. म्हणून गरीब लोकांच्या मुलांस फक्त लिहिणें, वाचणें व हिशोब एवढ्या तीन गोष्टी मात्र शिकवाव्या. कारण त्या त्यांच्या धंद्यांस उपयोगीं पडण्यासारख्या आहेत.

हें मत सर्व प्रकारच्या धंद्यांस लागू होतें. लार्ड एल्डन ह्यानें आपल्या पेढीवर कारकून नेमिले होते ते सर्वांत अडाणी असे पाहून ठेविले होते. व ह्यांहीपेक्षां मूर्ख मिळाल्यास जुन्यांस काढून त्यांच्या जागीं त्यांना ठेवीन असें तो म्हणत असे. हॅझ्लिट् ह्याचें असें म्हणणें होतें कीं, ज्या मुलांस कोणत्याहि धंद्यांत घालाव-

याचें असेल त्यांना त्या धंद्याशिवाय दुसरें कांहीं शिकवूं नये. ज्याला पैसा मिळवावयाचा आहे त्याच्या डोक्यांत दुसरी कोणतीहि कल्पना असतां कामा नये.

ही दुसऱ्या काळची स्थिति झाली. पण इंग्लंड देशांत आतां शिक्षणासंबंधानें लोकमत अगदीं बदललें आहे. आतां तेथे असें समजतात कीं, मनुष्यास आपला धंदा चांगल्या रीतीनें करितां यावा एवढाच शिक्षणाचा हेतु नाहीं. तर प्रत्येक धंदेवाल्याचें मन विकसित होऊन त्याच्या जीवितक्रमास चांगलें वळण लागावें हा उद्देश देखील जेणेंकरून सिद्धीस जाईल अशा प्रकारचें शिक्षण पाहिजे. व्हिक्टर ह्यूगो म्हणत असे कीं, जो मनुष्य शाळा स्थापन करितो तो देशांतील एक तुरुंग ओस पाडतो असें म्हणण्यास हरकत नाहीं.

स्वित्झर्लंड देशांतील एका मुत्सद्यानें त्या देशांतील शिक्षणपद्धतीचें वर्णन करितांना असें सांगितलें:—"आमच्या देशांतील बहुतेक मुलें दरिद्रावस्थेंत जन्मतात. पण त्यांनीं अज्ञानदशेंत राहूं नये अशी आह्मीं व्यवस्था ठेवितों." इंग्लंड देशांत हल्लीं शिक्षणाकडे बरेंच लक्ष दिलें जात आहे. ग्रे नामक इंग्रजी कवीनें आपल्या वेळच्या शेतकऱ्यांचें वर्णन केलें आहे तें प्रस्तुत काळच्या तेथील शेतकऱ्यांस लागू पडणार नाहीं, पण हिंदुस्थानच्या लोकांस लागू पडेल. तें एणेप्रमाणें आहे:—

(श्लोक)

ज्ञात्यांनीं बहुकाल मंथुनि महाज्ञानोदधी काढिलीं ।
रत्नें उज्वल तीं कृषीवलगणीं नाहीं मुळीं देखिलीं ॥

त्यांचें उन्नतियोग्यही मन असे आपद्रूरें पीडिलें।
आत्मानंदजलौघ जाइ थिजुनी दारिद्र्यशीतामुळें ॥ १

—ग्रे

सन १८७० सालीं इंग्लंड देशांत शिक्षणासंबंधाचा एक कायदा मंजूर झाला. त्या कायद्यामुळें तेथील आई-बापांनीं आपल्या प्रत्येक मुलास शाळेंत पाठविलें पाहिजे अशी सक्ति आहे. हा कायदा झाल्यापासून लोकांच्या स्थितींत फार सुधारणा झाली आहे. तो कायदा मंजूर होण्यापर्वी प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतील मुलांची संख्या १४,००,०००होती. आतां ती५०,००,०००पेक्षां जास्त आहे. ह्याचा काय परिणाम झाला आहे? प्रथम फौजदारी गुन्ह्यांच्या संबंधानें विचार करूं. सन १८७७ सालापर्यंत कैदी लोकांची संख्या दिवसेंदिवस वाढतच होती. त्या वर्षी कैदी लोकांची संख्या सरासरी २०,८०० होती. त्यानंतर ही संख्या कमी कमी होत जाऊन आतां फक्त १३,००० आहे; म्हणजे पूर्वीपेक्षां $\frac{1}{3}$ प्रमाणानें कमी झाली आहे. लोकसंख्या दर वर्षी वाढत्या प्रमाणावर आहे हें आपण विसरतां कामा नये. सन १८७० पासून इंग्लंडची लोकसंख्या $\frac{1}{3}$ जास्त वाढली आहे. गुन्हेगारांची संख्या त्याच मानानें वाढती तर आज ती १३,००० न होतां २८,००० झाली असती. म्हणजे हल्लीं आहे त्याच्या दुप्पटीपेक्षां जास्त झाली असती व त्या मानानें पोलीसचा व तुरुंगाचा खर्च वाढला असता. लहान मुलांच्या गुन्ह्यांची संख्या तर फारच कमी झाली आहे. सन १८६६ साली गु-

न्हेणार मुलांची संख्या १०,००० होती. सन १८७६ सालीं ७,००० होतो. सन १८८१ सालीं ६,००० झाली. भिकारी लोकांची संख्या पाहिली तर ती देखील कमी होत आहे. सन १८७० सालीं दर हजार माणसांत ४७ भिकारी होते, आतां फक्त २२ आहेत.

अत्यंत भयंकर गुन्ह्यांची संख्या देखील कमी झाली आहे. सन १८६४ सालीं २८०० लोकांस सक्तमजुरीची शिक्षा झाली होती. त्यानंतर लोकसंख्या इतकी वाढली असूनहि सन १८९९ सालीं सक्तमजुरीच्या कैद्यांची संख्या फक्त ७२९ होती. आठ तुरुंग रिकामे पडले आणि ते आतां दुसऱ्या कामांस लाविले आहेत.

| वर्षें | सक्तमजुरीची शिक्षा झालेले लोकांची वार्षिक संख्या | इंग्लंड आणि वेल्स यांतील लोकसंख्या |
|---|---|---|
| सन १८५५ पासून १८५९ पर्यंत | २५८९ | १९२५७००० |
| ,, १८५९ ,, १८६४ ,, | २८०० | २०३७०००० |
| ,, १८६४ ,, १८६९ ,, | १९७८ | २१६८१००० |
| ,, १८६९ ,, १८७४ ,, | १६२२ | २३०८८००० |
| ,, १८७४ ,, १८७९ ,, | १६३३ | २४७००००० |
| ,, १८७९ ,, १८८४ ,, | १४२७ | २६३१३२५१ |
| ,, १८८४ ,, १८८९ ,, | ९४५ | २७८३०१७९ |
| ,, १८८९ ,, १८९२ ,, | ७९१ | २९०५५५५० |

गुन्हे आणि शिक्षणाचा अभाव ह्यांचा अगदीं निकट संबंध आहे. हें वर दिलेल्या माहितीवरून स्पष्ट होईल. तुरुंगांत पडलेल्या १,५७,००० लोकांपैकीं फक्त

५०००.लोकांस चांगलें लिहितां वाचतां येत होतें. आणि फक्त २९० लोकांस शिक्षणाचा लाभ मिळाला होता.

मोठ्या गुन्ह्यांचें प्रमाण किती कमी होत चाललें आहे, व लोकसंख्या किती वाढली आहे हें वर दिलेल्या कोष्टकावरून चांगलें ध्यानांत येईल.

गुन्ह्यांची संख्या कमी झाल्यामुळें द्रव्याचा नफा बराच झाला आहे. वास्तविक म्हटलें असतां ह्या विषयाकडे द्रव्याच्या दृष्टीनें पहावयाचें नाहीं. तथापि, शिक्षणाला फार खर्च लागतो अशी ज्यांची कुरकूर आहे त्यांना उत्तर देतांना शिक्षणापासून द्रव्याचाहि किती फायदा होतो हें दाखवून देणें जरूर आहे.

आतां गुन्ह्याचें मान कमी होण्यास शिक्षणाबरोबर दुसरींहि कारणें असतील. तथापि शिक्षणाचा परिणाम विशेष आहे ह्यांत शंका नाहीं. एकंदर जे गुन्हे घडतात त्यांपैकीं बुद्धिपुरःसर दुष्टपणामुळें किंवा अनिवार्य मोहांमुळें झालेले गुन्हे फार थोडे असतात. गुन्ह्यांचीं मुख्य कारणें म्हटलीं म्हणजे व्यसन आणि अज्ञान हीं होत. लोकांच्या वर्तनांत वर सांगितल्याप्रमाणें जी सुधारणा झालेली दृष्टीस पडत आहे ती सर्वांशीं शाळेंतील शिक्षणामुळें व शाळेंत लागणाऱ्या नियमितपणाच्या, टापटिपीच्या व स्वच्छतेच्या वगैरे संवयींमुळें झाली आहे असें नाहीं; तर शाळेंत गेल्यामुळें रस्त्यांतील हलकट लोकांची संगति मुलांस लागत नाहीं, आणि दुराचरणी लोकांचा कित्ता त्यांच्या नजरेपुढें येत नाहीं ह्या गोष्टी देखील त्या सुधारणेस बऱ्याच अंशीं कारणीभूत आहेत.

वर सांगितलेली स्थिति इंग्लंड देशांतील आहे. त्या देशांत सर्व मुलांस शाळेंत घालण्याविषयीं कायद्यानें सक्ति आहे, तशी एथे नसल्यामुळें एथे शाळेंत जाणाऱ्या मुलांची संख्या फारच थोडी आहे; व हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत शिक्षणाचा फैलाव सारख्या प्रमाणानें झालेला नाहीं. ह्यामुळें शिक्षणापासून होणारे लाभ इंग्लंडच्या लोकस्थितीवरून जसे स्पष्ट दाखवितां येतील तितक्या स्पष्टतेनें हिंदुस्थानच्या लोकस्थितीवरून दाखविण्यास तूर्त कांहीं साधन नाहीं.

हिंदुस्थानांतील २८ कोटी प्रजेपैकीं १७ कोटी लोक शेतकरी आहेत. ह्या लोकांना विद्या नसल्यामुळें ह्यांची स्थिति किती शोचनीय आहे! अज्ञानामुळें शेतकरी लोक मारवाडी व सावकार ह्यांच्या तावडींत सांपडतात. अज्ञानामुळें त्यांना आपल्या शेतकीच्या धंद्यांत कांहीं सुधारणा करितां येत नाहीं. अज्ञानामुळें स्वच्छ हवा, स्वच्छ पाणी, निर्मलता वगैरे गोष्टींचें त्यांना महत्त्व समजत नाहीं. सारांश आपलें हित अगर अहित कशांत आहे हें शिक्षणाच्या अभावामुळें त्यांस कळत नाहीं. ह्यामुळें देशाच्या उन्नतीस केवढा अडथळा होत आहे बरें! " विद्याविहीनः पशुः " हें तत्त्व इंग्लिश लोकांस जितकें कळत आहे तितकें दुसऱ्या कोणासहि कळत नसेल. असें असून हिंदुस्थानसरकाराचें ह्या विषयाकडे दुर्लक्ष होत आहे ही केवढी दुर्दैवाची गोष्ट आहे? सरहद्दीवरील लढाया करण्यांत व नवीन मुलूख काबीज करण्यांत हिंदुस्थानच्या तिजोरींतून अपरिमित द्रव्याचा

व्यय होत आहे. पण शेतकरी लोकांची स्थिति सुधारण्याकडे जर त्या रकमेचा उपयोग होईल तर सरकारचें व प्रजेचेंहि कल्याण होणार आहे.

हिंदुस्थान देशांतील लोकसंख्या, लिहितां वाचतां येणाऱ्या लोकांची संख्या, वार्षिक जमाबंदी व विद्याखात्याचा खर्च, हीं खालील कोष्टकावरून लक्षांत येतील.

| सन १८९१ च्या खानेसुमारीप्रमाणें हिंदुस्थानची लोकसंख्या | लिहितां वाचतां येतें अशा लोकांचीसंख्या | सन | हिंदुस्थानसरकारचें वार्षिक उत्पन्न | मदरहू उत्पन्नापैकीं विद्यार्थीनाच्या कामीं होणारा खर्च |
|---|---|---|---|---|
| २८,७२,२३,४३१ | १,१५,५४,०३५ पुरुष<br>५,४३,४९३ स्त्रिया<br>१,२०,९७,५२८ बेरीज | १८८८–८९ | ८१६९६६७८० | ७४६५७४१ |
| | | १८८९–९० | ८५०८५२०३० | ७६७२८९१ |
| | | १८९०–९१ | ८५७४१६४९० | ८२११८२६ |
| | | १८९१–९२ | ८९१४३२८३० | ८८९१७३८ |
| | | १८९२–९३ | ९०१७२४३८० | ८९२९३०३ |
| | | १८९३–९४ | ९०५६५२१४० | ९०५६१०९ |
| | | १८९४–९५ | ९५१८७४२९० | ९१०९७२३ |
| | | १८९५–९६ | ९८३७०१६७० | ९४७८३०५ |
| | | १८९६–९७ | ९४१२९७४१० | ९६०२१६३ |
| | | १८९७–९८ | ९६४४२००४० | ९४०११४४ |

शिक्षणाची पद्धति जी हल्लीं चालू आहे तींत पुष्कळ सुधारणा झाली पाहिजे. ह्या आयुष्यामध्यें आपणांस पुनःपुनः ज्याचीं उत्तरें द्यावीं लागतात असे तीन प्रश्न आहेत. अमुक गोष्ट रास्त आहे किंवा गैरशिस्त आहे? अमुक गोष्ट सत्य आहे किंवा असत्य आहे? अमुक वस्तु सुंदर आहे किंवा कुरूप आहे? ह्या तिन्ही प्रश्नांचें उत्तर ज्याच्या योगानें आपणांस देतां येईल असें आपलें शिक्षण असलें पाहिजे.

" तुम्हीं आपलीं पुस्तकें विकून भट्टया विकत घ्या, वाग्देवीला सोडून विसाड्याचा कारखाना सुरू करा " असें म्हणणारे लोक बेकनच्या वेळीं म्हणजे सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं देखील होते. व आजकाल हिंदुस्थानांत देखील अशीच ओरड करणारे लोक बरेच आहेत. ह्या लोकांच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य आहे ह्यांत शंका नाहीं. त्यांच्या उपदेशाप्रमाणें वाग्देवीला आपण सोडून कधींच चालावयाचें नाहीं. पण सृष्टीच्या महाग्रंथांतून जेवढें शिक्षण घेतलें पाहिजे तेवढें आपण घेत नाहीं ही मोठी चूक आहे.

ताट, वाटी आणि चमचा ह्या तीन वस्तूंना जसें भोजन हें नांव देतां येत नाहीं, तसेंच लिहिणें, वाचणें आणि हिशोब ह्या तीन गोष्टींना शिक्षण म्हणतां येणार नाहीं. शिवाजी महाराज ह्यांस सहीपुरतें देखील लिहितां येत नव्हतें. पण त्यांना शिक्षण नव्हतें असें कोण म्हणेल?

हल्लींच्या शिक्षणक्रमांत भाषाविषयाकडे विशेष लक्ष दिलें जात आहे. आणि शास्त्रीय विषयांकडे बहुतेक

दुर्लक्ष होत आहे. जे काय शास्त्रीय विषय शिकविण्यांत येतात ते बहुतेक पुस्तकांवरूनच शिकवितात. प्रयोग करण्यास लागणारी यंत्रसामग्री विद्यालयांतून भरपूर नसल्यामुळें म्हणा किंवा दुसऱ्या कोणत्याहि कारणानें म्हणा, शास्त्रीय विषयांचें सप्रयोग शिक्षण आमच्या विद्यालयांतून फार थोडें मिळतें. अशा प्रकारच्या घोकीव शिक्षणापासून कांहीं फायदा नाहीं. व त्यामुळें शास्त्रीयविषयांकडे विद्यार्थ्यांचा कल होत नाहीं ह्याबद्दल त्यांना दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

हल्लींचें शिक्षण कांहीं अंशीं एकदेशीय आहे. मनुष्याच्या सर्व गुणांचा विकास होईल अशा प्रकारचें शिक्षण खरें म्हटलें असतां पाहिजे. आंग्लकविकुलगुरु शेक्सपिअर ह्याला ल्याटिन् आणि ग्रीक फारसें येत नव्हतें. ज्या मुलानें फक्त पुस्तकांचेंच पाठांतर केलें आहे, ज्याला सृष्टीची कांहीं माहिती नाहीं, ज्याला ह्या जगाचें कांहीं ज्ञान नाहीं, त्याच्या बुद्धीचा पूर्ण विकास होणार नाहीं: त्याचें ज्ञान नेहमीं अर्धवट रहाणार.

एका ग्रंथकारानें म्हटलें आहे:–" एकाद्या पुष्पवाटिकेंतील झाडें वाढविण्याच्या हेतूनें त्यांच्या पुढें वनस्पतिशास्त्राचा ग्रंथ वाचावा, त्याप्रमाणें हल्लींच्या शिक्षणाची स्थिति आहे." हें म्हणणें खरें आहे.

शिक्षणाच्या योगानें आपण पुष्कळ गोष्टी शिकल्या पाहिजेत. तशाच पुष्कळ गोष्टी विसरल्या पाहिजेत.

शाळागुरूंचें काम सोपें आहे असें पुष्कळ लोक समजतात. पण त्यांच्या धंद्यासारखा श्रमाचा व ज-

बावदारीचा दुसरा धंदा नसेल. मुलांबरोबर खेळण्याचें काम फार मौजेचें आहे. पण त्यांना शिकविण्याचें काम मात्र तसें नाहीं.

गणित, व्याकरण वगैरे विषय शिकविण्याचें काम कदाचित् सोपें असेल. पण "लहान मुलांना उत्तेजन देऊन त्यांना हुरूप आणणें, त्यांच्या बुद्धीचा विकास करणें, त्यांच्या शक्तीचें उत्तम. चीज करून देणें, पराजय झाला असतांहि " कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें " ह्या न्यायानें धैर्य, कल्पनाशक्ति आणि निश्चय हे गुण वाढविणें, इत्यादि गोष्टी सोप्या नाहींत. त्यांसाठीं प्रासादिक पुरुषांची जरूर आहे."

शिक्षणाचा हेतु वकील, शिक्षक, पुरोहित, शिपाई कारागीर इत्यादि बनविणें हा नव्हे; तर मनुष्याचें मन सुसंस्कृत करणें हा होय. मिल्टन् म्हणतो:—"ज्या शिक्षणाच्या योगानें मनुष्यास आपलें गृहसंबंधी व सार्वजनिक कर्तव्य नेकीनें, अकलेनें, आणि उदार बुद्धीनें करितां येईल, त्यालाच पूर्ण आणि उदार शिक्षण म्हणावें."

प्राचीन तत्त्वज्ञानी लोकांस असें वाटत असे कीं, वस्तुस्थितीसंबंधाच्या प्रश्नांचा निर्णय देखील केवळ शब्दपांडित्यानें करितां येईल. कोंबडी प्रथम झाली, कीं अंडें प्रथम झालें? ह्या प्रश्नाचा विचार प्लूटार्क ह्यानें केला आहे तो वाचून हांसें आल्यावांचून राहणार नाहीं. त्यानें कोंबडी प्रथम झाली असें ठरविलें आहे. व ह्याबद्दल त्यानें जीं कारणें दिलीं आहेत त्यांपैकीं एक अ-

१ इमर्सन

सें आहे कीं, सर्व लोक ' कोंबडीचें अंडें ' असें म्हण- तात, ' अंड्याची कोंबडी ' असें कोणी म्हणत नाहीं.

" वृक्ष, पाषाण, नद्या, सरोवरें, डोंगर इत्यादि- कांचे ठिकाणीं ईश्वरी करणीचें अनुपम सौंदर्य आप- ल्या मुलांस ओळखतां येईल असें शिक्षण त्यांना दि- लेंच पाहिजे. "

जेफ्रिझ् म्हणतो, "पुष्कळ पुस्तकें वाचून आपली क- ल्पनाशक्ति वाढेल असें जर कोणाला वाटत असेल, तर ती त्याची चूक आहे. कल्पनाशक्तीचीं आवडतीं ठिकाणें म्हटलीं म्हणजे समुद्र, डोंगर, अरण्यें, ओढे, सूर्यप्रकाश, आणि मोकळी हवा हीं होत. " पण शं- हरच्या लोकांना हीं ठिकाणें जितकीं सुलभ असावीं ते- वढीं नाहींत ही दुर्दैवाची गोष्ट आहे. पुस्तकांत देखील कल्पनाशक्तीची वसति आहेच. पण पुस्तकांचा उपयो- ग करण्यांत तारतम्य पाहिजे. विचार व्यक्त करण्याचें साधन जी भाषा ती फार अपूर्ण आहे. ह्यामुळें पुस्त- कांचा योग्य अर्थ समजून त्यांचा उपयोग करणें हें का- म अवघड आहे.

पुष्कळ लोक शाळा सोडल्यानंतर कांहीं व्यवस्थित- त आत्मशिक्षणाचा क्रम सुरू ठेवीत नाहींत ह्याचें का- रण शिक्षणपद्धतींतील वर सांगितलेले दोषच असावे असें वाटतें. आपण जिवंत आहों तोंपर्यंत नेहमीं कांहीं तरी शिकत असतोंच ह्यांत शंका नाहीं. सहजगत्या ए- कादा चमत्कार आपल्या दृष्टीस पडला, एखादी का-

१ जिहटियर

दबरी किंवा वर्तमानपत्र आपल्या हातीं पडलें, तर किंवा दुसऱ्या अशाच कारणांनीं आपणांस कांहीं तरी ज्ञान प्राप्त होईल;पण त्याला आत्मशिक्षण म्हणतां येणार नाहीं.

साधारण शिक्षणांत कोणत्या गोष्टींचा समावेश असावा ह्यासंबंधानें प्रो०हक्स्ले ह्याचें मत एणेप्रमाणें आहे:—

"पंधरा सोळा वर्षांच्या मध्यम स्थितीच्या प्रत्येक मुलाला सामान्य शिक्षण द्यावयाचें म्हणजे त्याला पुढें सांगितलेले विषय तरी शिकविले पाहिजेत:—त्याला आपली जन्मभाषा चांगली लिहितां वाचतां यावी. त्याला भाषास्वारस्य जेणेंकरून समजेल तेवढा ग्रंथांशीं परिचय असावा. आपल्या देशाच्या इतिहासाची साधारण माहिती, समाजासंबंधाचे ठळक नियम, पदार्थज्ञान व मानसशास्त्र ह्यांचीं मूलतत्त्वें ह्यांचें ज्ञान त्याला असलें पाहिजे. अंकगणित आणि भूमिति, ह्यांचें साधारण बरेंच ज्ञान पाहिजे. तर्कशास्त्र त्याला शिकवावयाचें तें नियमांपेक्षां उदाहरणांनींच शिकवावें. संगीत आणि चित्रकला ह्यांचीहि थोडीशी माहिती असावी. पण हे दोन विषय करमणूक ह्या नात्यानें शिकवावे."

अशा प्रकारचें ज्ञान उपयोगी असून फार मनोरंजकहि असतें. प्रसिद्ध शारीरशास्त्रज्ञ जॉन हंटर ह्याला बाळपणीं जसें वाटत होतें तसें आपणांपैकीं पुष्कळांस वाटलें असेल. व त्याच्याप्रमाणें आपणांसहि म्हणतां येईल कीं, "मीं लहान मुलगा होतों तेव्हां मेघ, वनस्पती वगैरे वस्तूंसंबंधानें ज्ञान मिळविण्याची मला उ-

त्कट इच्छा होत असे. झाडांच्या पानांचे रंग शरदृतूत कां पालटतात तें समजण्याची मला उत्कंठा असे. मुंग्या, माशा, पक्षी, किडे इत्यादि प्राण्यांचा मला मोठा चमत्कार वाटून मी त्यांचें अवलोकन करीत असें. मी जवळच्या माणसांस पुष्कळ गोष्टींबद्दल प्रश्न विचारून कंटाळा आणीत असें. त्या गोष्टी कोणास महत्त्वाच्या वाटत नसत, व त्यांबद्दल कोणास माहितीहि नसे."

प्रसिद्ध तत्त्ववेत्ता लॉक हा आपल्या शिक्षणावरील ग्रंथांत म्हणतोः—"मला पुस्तकांसंबंधानें कांहीं सांगावयाचें आहे. पुस्तकें वाचणें हा शिक्षणाचा मुख्य भाग आहे अशी लोकांची समजूत कशी झाली असेल तीं असो. पण ती चुकीची आहे. पुस्तकवाचनानें आपली सुधारणा होण्यास आणखी दोन गोष्टींची अवश्यकता आहे त्या गोष्टी म्हणजे चिंतन आणि संवाद ह्या होत. वाचन हें इमारतीसाठीं कच्चें सामान गोळा करण्यासारखें आहे. त्या सामानांतून पुढें बरें-वाईट निवडून काढावयाचें असतें. चिंतन हें कच्च्या सामानाची निवड करणें, दगड व लांकडें तासून व रेखून जागच्याजागीं बसविणें, आणि इमला उभारणें, ह्यासारखें आहे. मित्रांबरोबर संवाद हा इमल्याची तपासणी करणें, निरनिराळ्या खोल्यांत फिरून घराचे निरनिराळे भाग सारख्या प्रमाणानें बसले आहेत कीं नाहींत हें पाहणें, इमल्याची बळकटी कशी आहे, त्यांत दोष काय आहेत वगैरे पहाणें, ह्यासारखें आहे. आपल्या कल्पनामंदिरांतील न्यून काढून टाकण्याचें उत्तम साधन म्हणजे संवादच होय.

संवादाच्या योगानें खरीं तत्त्वें बाहेर निघतात, आणि आपल्या ध्यानांत चांगलीं ठसतात."

वादे वादे जायते तत्त्वबोधः ।

( श्लोक )

विद्या हे पुरुषास रूप बरवें, कीं झांकलें द्रव्यही ।
विद्या भोग सुकीर्तिदायक पहा ते मान्य मान्यासही ॥
विद्या बंधु असे विदेशगमनीं, विद्या महादेवता ।
विद्या पूज्य नृपास, हा नरपशू ती वेगळा तत्त्वतां ॥ १

—वामन

# प्रकरण ७

## आत्मशिक्षण

आपल्या सर्व शक्तींची सारख्या प्रमाणानें वाढ करणें ह्याचें नांव शिक्षण होय. शिक्षणाचा आरंभ पाळण्यांत होतो. शाळेंत शिक्षण चालूं असतेंच. पण तेथें त्याची समाप्ति होत नाहीं. आपल्या मनांत असो वा नसो, आपलें शिक्षण आपल्या सर्व जन्मभर चालू असतेंच. प्रश्न एवढाच आहे कीं, जें कांहीं आपण शिकतों त्याची शहाणपणानें आपण निवड करितों किंवा दैववशात् जें कांहीं प्राप्त होईल तें शिकतों? गिबन् म्हणतो, 'प्रत्येक मनुष्यास दोन प्रकारचें शिक्षण मिळतें; एक दुसऱ्यांपासून, व दुसरें स्वतःकडून.' आपण दुसऱ्यांकडून जें शिकतों त्यापेक्षां आपण स्वतः मिळविलेलें ज्ञान अधिक उपयोगी असतें. लॉक म्हणतो, " केवळ गुरूच्या शिक्षणानें आणि धाकानें कोणी मनुष्यानें फार ज्ञान मिळविलें, किंवा एकाद्या शास्त्रांत नैपुण्य संपादिलें, असें एकहि उदाहरण नाहीं. "

आपलें हृदयमंदिर एकदांच स्वच्छ झाडून अलंकृत करून ठेवूं म्हटलें तर कधीं होणार नाहीं. पण तें चांगल्या किंवा वाईट गोष्टी ग्रहण करण्यास तयार करणें हें आपल्या स्वाधीन आहे.

ज्यांना शाळेंत असतांना नांवलौकिक मिळवितां आला नाहीं त्यांनीं निराश होण्याचें कारण नाहीं. वि-

शाल बुद्धीची परिपक्कता बाल्यदशेंतच होते असें नाहीं. शाळेंत असतांना ज्यांनीं मुळीं परिश्रमच केले नाहींत त्यांना निराशा वाटण्याचें जरी कारण नाहीं, तरी लाज वाटली पाहिजे. पण ज्यांना योग्य श्रम करूनहि यश आलें नसेल त्यांनीं दृढनिश्चयानें उद्योग मात्र चालविला पाहिजे, म्हणजे त्यांना यशःप्राप्ति झाल्यावांचून रहाणार नाहीं. ज्यांना शाळेंत नांवलौकिक मिळवितां आला नाहीं अशांपैकीं पुष्कळ लोक जगांत मोठ्या योग्यतेस चढले आहेत. वेलिंग्टन् आणि नेपोलियन हे दोघेहि शाळेंत असतांना जडबुद्धि होते, अशी प्रसिद्धि आहे. न्यूटन, स्विफ्ट्, क्लाइव्ह, स्कॉट, शेरिडन् आणि दुसरे पुष्कळ थोर लोक ह्यांची हीच स्थिति होती.

ह्यावरून उघड दिसतें कीं, शाळेंत ज्यांना वाहवा मिळाली नाहीं त्यांना ती पुढें मिळणार नाहीं असा कांहीं नियम नाहीं.

बुद्धि म्हणजे "उद्योग करण्याची विलक्षण शक्ति" अशी एकानें व्याख्या केली आहे, ती पुष्कळ अंशीं खरी आहे. लिली म्हणतो, "प्रकृतीनें आपलें कार्य केलें नाहीं तर श्रमांचा कांहीं उपयोग नाहीं, पण श्रम केले नाहींत तर प्रकृतीचा कांहीं उपयोग नाहीं."

लहानपणीं ज्यांनीं मोठी हुषारी दाखविली असे पुष्कळ लोक मोठे झाल्यावर उद्योग, आरोग्य किंवा सद्वर्तन ह्यांच्या अभावामुळें कुचकामी झाले आहेत. गेटी म्हणतो, "ज्यांना पुष्कळ फुलें येतात पण फळ मुळींच नाहीं अशा झाडांप्रमाणें ह्या लोकांची स्थिति असते.

त्यांना मोठेपणीं कांहीं हलकें सलकें काम करून कष्टानें पोट भरावें लागतें. पण जें मुलगे कांहींसे मंदबुद्धि असूनहि उद्योगी, निश्चयी आणि सच्छील असतात त्यांचा हळूहळू उत्कर्ष होतो; त्यांना मोठमोठे हुद्दे मिळतात; ते आपल्या देशाचे हितकर्ते होतात व त्यांची मोठी कीर्ति होते."

"अज्ञान मनुष्य निष्कपटी असतो, व त्याच्या हातून पापाचरण होणार नाहीं, अशी कांहीं लोकांची विलक्षण समजूत असते. त्यामुळें शिक्षणाची योग्यता कित्येकांस कळत नाहीं. पण मनुष्याचें ज्ञान हिरावून घेतलें असतें त्याला बालकांची मुग्धावस्था प्राप्त होणार आहे काय? मुळींच नाहीं. इतकेंच नव्हे तर तो पशूंच्या कोटींतील एक अत्यंत दुष्ट आणि घातकी प्राणी होऊन राहील.[1]"

ह्या संसारांत सन्मार्ग दाखविणारी ज्ञानरूप ज्योति मालवली असतां मनुष्यें विकारवश होऊन त्यांच्या अंगीं दोन्ही वयांतले दोष मात्र चिकटतील. म्हणजे बालपणचें अज्ञान व प्रौढ वयांतले दुर्गुण हे मात्र त्यांच्यामध्यें एकवटून राहतील.

ज्या मनुष्यावर शाळेंत असतांना चांगला संस्कार झाला आहे तो आपलें शिक्षण सतत चालू ठेविल्यावांचून रहाणार नाहीं. शिक्षण म्हणजे केवळ पोट भरण्याचें साधन आहे ही समजूत फार कोतेपणाची होय.

सुशिक्षणाचा हेतु सालोमन ह्यानें सांगितला आहे

१ डॉक्टर आर्नोल्ड

तो असा:—" सुशिक्षणाच्या योगानें मनुष्यास शहाणपणा आणि ज्ञान ह्यांची ओळख व्हावी. बुद्धिमान् लोकांच्या म्हणण्याचा अर्थ समजावा. चातुर्य, न्यायबुद्धि, विचारशक्ति इत्यादि गुण प्राप्त व्हावे. मूढ मनुष्यास तीव्रता यावी. तरुण मनुष्यास ज्ञान आणि विवेक हीं प्राप्त व्हावीं. "

" एकादें रुप्याचें नाणें पडलेलें पाहून तें उचलून घेण्याकरितां मनुष्य आपला रस्ता सोडून बराच लांब जाईल. पण प्राचीन काळच्या अत्यंत शहाण्या लोकांचे शब्द म्हणजे केवळ बावनकशी सोनेंच होय. त्या शब्दांची किंमत किती मोठी आहे हें प्रत्येक पिढीचे विद्वान् आपणांस सांगत आले आहेत. " असें असून त्यांचा लाभ जर आपण घेतला नाहीं तर हा आपला मूर्खपणा नव्हे काय ?

फ्रेंच भाषेंत एक अशी म्हण आहे कीं, " तरुण ज्ञानी असते, आणि वृद्ध बलवान् असते, तर केवढी मौज होती ? " सुशिक्षणाच्या योगानें आपणास दोन्ही गोष्टी प्राप्त होतात. म्हणजे तरुणपणीं ज्ञान प्राप्त होतें, आणि वृद्धपणीं सामर्थ्य प्राप्त होतें. " अनुभवाच्या शाळेंत टक्केटोणपे खाऊन मिळणारें शिक्षण मनस्वी खर्चाचें असतें. पण मूर्ख मनुष्य दुसऱ्या कोणत्याच शाळेंत शिकावयाचा नाहीं. "

संसारांत प्रथम चांगल्या प्रकारचा आरंभ झाला म्हणजे निम्मे यशःप्राप्ति झाली म्हणून समजावें. मुलांस

१ थोरो २ फ्रांकलिन्

लहानपणींच चांगला मार्ग लावून दिला म्हणजे मोठे-पणीं तीं तो सोडणार नाहींत. आरंभ करितांनाच चांगला करावा. म्हणजे पुढें पुढें आपलें काम सोपें वाटूं लागतें. पण आरंभ करण्यांत जर कां चूक झाली तर पुढें जें नुकसान होईल तें कांहीं केल्यानें भरून येणार नाहीं. कोणतीहि गोष्ट शिकणें हें प्रयासाचें आहेच, पण एकादी वाईट लकब लागल्यावर ती घालविणें फारच कठिण आहे.

पुस्तक, मनुष्यें, निरनिराळ्या संस्था व कल्पना ह्यांपासून ज्या उत्तम गोष्टी शिकण्यासारख्या असतील त्या आपल्या ध्यानांत ठसविण्याचा यत्न करावा. आपल्यापेक्षां दुसरे लोक अधिक विद्वान् आहेत म्हणून लाज वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. पण आपणांस शिकतां येईल तेवढें आपण शिकलों नाहीं तर मात्र मोठ्या शरमेची गोष्ट होय.

पुष्कळ भाषा शिकणें, नानाविध वस्तूंचें ज्ञान मिळविणें इत्यादि गोष्टींनाच केवळ शिक्षण म्हणतां येणार नाहीं. शिक्षण हें ज्ञानार्जनाहून भिन्न आहे, व त्यापेक्षां श्रेष्ठ आहे. ज्ञानार्जन हें धान्याच्या कोठारांत धान्य भरण्यासारखें आहे. शिक्षण हें पेरणीसारखें आहे. त्याच्यायोगानें जें बीं पेरण्यांत येतें त्यापासून तीसपट, चाळीसपट, व कधीं कधीं शंभरपट पीक होतें.

( श्लोक )

अपि शास्त्रेषु कुशला । लोकाचारविवर्जिता: ॥
सर्वे ते हास्यतां यान्ति । यथा ते मूर्खपण्डिता: ॥ १

—पंचतंत्र

भावार्थः—शास्त्रांचें ज्ञान असूनहि ज्यांच्या अंगीं व्यवहार-चातुर्य नाहीं, ते उपहासास पात्र होतात.

चातुर्यापेक्षां ज्ञानाची योग्यता कमी आहे ह्यांत शंका नाहीं. पण ज्ञानाची खरी योग्यता पुष्कळांच्या लक्षांत येत नाहीं.

कूपर कवीनें म्हटलें आहे:—

( आर्या )

ज्ञानी मानी गर्वी मजसम सर्वज्ञ मीच या लोकीं ॥
चतुर नर म्हणे विनयें शिकलों अद्यापि फार थोडे कीं ॥ १

पण खरोखर अशी गोष्ट नाहीं. जे अतिशय ज्ञानी आहेत त्यांनाच न्यूटनप्रमाणें आपल्या ज्ञानाचें अल्पत्व चांगलें समजतें.

बिशप् बट्लर ह्यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे:—" मोठमोठे शोध करण्यांत निमग्न झालेल्या लोकांस इशारत देणें भाग आहे कीं, बाबानों, तुम्हीं काय करतां तें नीट समजून घ्या. तुमच्या शोधांनीं सद्गुणांस आणि सद्धर्मास बळकटी येऊन त्यांचा लोकांत प्रसार होत असेल, किंवा संसारांतील दुःख कमी होऊन सुखाची वृद्धि होत असेल तर तुमच्या श्रमाचें मोठें चीज होणार आहे. अज्ञात गोष्टींचा शोध लावण्यापासून वरील परिणाम घडत नसतील तर त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. फार झालें तर करमणूक मात्र होईल."
कूपर कवीनेंहि ह्याच प्रकारचे उद्गार ज्ञानाविषयीं काढले आहेत. तो म्हणतो:—"ज्ञान म्हणजे माती दगड लांकडें वगैरे सामानाच्या ढिगासारखें आहे. तें सामान

घेऊन त्यांची सुरेख इमारत बांधण्याचें काम चातुर्य करितें."

ज्ञान हें केवळ सामानासारखें आहे असें मानिलें तरी जो कारागीर चांगलें सामान निवडण्याची हयगय करील तो कुचकामाचा असला पाहिजे. अज्ञात गोष्टींचा शोध लावल्यापासून काय काय फायदे होतील हें कोणाच्यानें सांगवणार नाहीं. पुष्कळ शोध प्रथमदर्शनीं फार निरुपयोगी वाटत होते; असें असून त्यांपासून पुढे अपरिमित कल्याण झालें आहे.

" ज्ञान ही एक प्रचंड शक्ति आहे. तारायंत्राच्या ज्ञानापासून वेळ वांचतो. लेखनकलेच्या ज्ञानामुळें मनुष्याचे बोलण्याचे व जाण्यायेण्याचे श्रम वांचतात. गृहव्यवस्थेच्या ज्ञानानें पैसा वांचतो. आरोग्यशास्त्राच्या ज्ञानानें आरोग्याचें आणि जीविताचें संरक्षण होतें. बुद्धीच्या नियमांच्या ज्ञानापासून मेंदूचा अपव्यय टाळतां येतो. अध्यात्मज्ञानापासून होणारे लाभ तर काय सांगावे?"[1]

हर्बर्ट स्पेन्सर म्हणतो:—"प्रत्यक्ष आत्मसंरक्षणाकरितां म्हणजे आपल्या जीविताच्या व आरोग्याच्या संरक्षणाकरितां ज्याची अत्यंत जरूरी आहे असें ज्ञान म्हणजे शास्त्रीय ज्ञानच होय. अप्रत्यक्ष आत्मसंरक्षण अथवा ज्याला उदरनिर्वाह म्हणतात त्याच्यासाठीं देखील शास्त्रीय ज्ञानच पाहिजे. आईबापांस आपलें कर्तव्य चांगल्या रीतीनें बजावितां येण्यास शास्त्रीय ज्ञानावांचून गत्यंतर नाहीं. नागरिक लोकांस आपल्या वर्तनाचें योग्य नियमन करितां येण्यास राष्ट्रांच्या प्राचीन व

१ किंग्स्ले

अर्वाचीन इतिहासाचें इंगित नीट समजलें पाहिजे. व तें समजण्यास शास्त्रीय ज्ञानाचीच गुरुकिल्ली पाहिजे. कलाकौशल्याचे उत्तम पदार्थ तयार करितां येण्यासाठीं व त्यांचा पूर्ण उपभोग घेतां येण्यासाठीं शास्त्रीय ज्ञानाचाच संस्कार पाहिजे. सरतेशेवटीं मानसिक, नैतिक, व धार्मिक शिक्षणाचें उत्तम साधन म्हणजे शास्त्रीय ज्ञानच होय."

डाक्टर फिच् म्हणतो:—" मीं आपल्या गत आयुष्याकडे फिरून पाहिलें, आणि विद्यालयांत घालविलेल्या दिवसांचा विचार करूं लागलों म्हणजे मला असें दिसून येतें कीं, शाळेंत असतांना जे गणिताचे व शास्त्राचे सिद्धांत, जे व्याकरणाचे नियम व ज्या सुंदर कविता मी शिकलों त्यांचें मला वारंवार स्मरण होतें. त्यांच्यापासून मला जेवढा उपयोग व्यवहारांत होईल असें वाटलें होतें त्याहून फारच जास्त होत आहे. त्यांच्या योगानें मी जीं पुस्तकें वाचतों त्यांचा अर्थ मला चांगला कळतो; माझ्या आसपास ज्या गोष्टी घडतात त्यांचें यथार्थ स्वरूप माझ्या लक्षांत येतें. व एकंदरींत हें जीवित उन्नत आणि मनोहर वाटूं लागतें."

सरते शेवटीं डीन स्टान्ले ह्याचें मत देतों म्हणजे झालें. तें असें:—सत्याविषयीं निरपेक्ष प्रेम किती दुर्मिळ आहे ! तसेंच तें किती कल्याणकारक आहे ! त्यापासून होणारे फायदे आपल्या लक्षांत एकदम येत नाहींत. केवळ सत्यशोधनाच्या निःसीमभक्तीमुळें विद्वान् लोकांनीं जे शास्त्रीय शोध लावले आहेत त्यांपासून मानवी सुखाची केवढी वृद्धि होत असते, हें कदाचित् प-

हिल्या दुसऱ्या पिढीच्या दृष्टोत्पत्तीस येणार नाहीं."

एका संस्कृत कवीनें म्हटलें आहेः—

किं किं न साधयति कल्पलतेव विद्या।

कोणतीहि माहिती घ्या, तिचा कांहींच उपयोग नाहीं असें कधीं होणार नाहीं. तसेंच कोणतीहि वस्तु असो, ती एकवेळ देखील पहाण्यालायक नाहीं असें होणार नाहीं. खरोखर म्हटलें तर जगांत क्षुद्र वस्तु मुळींच नाहींत. क्षुद्र मनें मात्र पुष्कळ आहेत.

आजपर्यंत मोठमोठे शोध ज्यांनीं लाविले आहेत त्यांपैकीं कित्येकांचीं नांवें सुद्धां आपणांस ठाऊक नाहींत ही मोठी दुर्दैवाची गोष्ट होय. दुर्दैवाची त्यांच्या दृष्टीनें नव्हे, तर आपल्या दृष्टीनें. कारण त्यांच्या महदुपकाराबद्दल त्यांचें स्मरण ठेवावें, अशी आपणांस इच्छा होते, पण ती पूर्ण करण्याचें साधन आपणांजवळ नाहीं. तथापि मोठे शोध ज्यांनीं ज्यांनीं लाविले त्यांनीं ते स्वार्थबुद्धीनें किंवा कीर्तीच्या हेतूनें मुळींच लाविले नाहींत.

( श्लोक )

सत्यान्वेषण, भोगुनी निशिदिनीं सायास केले जिहीं।
निंदा वा स्तुति वा न मानुनि, परेशा चिंतुनी प्रत्यहीं॥
तन्नामें कविनीं जरी सुकविता माला नसे गुंफिली।
त्यातें काय उणें दिवीं वसतसे सत्कीर्ति त्यांची भली॥ १

—ड्यूअर्ट

ह्या आयुष्याचा खरा उपयोग व्हावा अशी इच्छा असेल तर मनुष्यानें रिकामें न रहातां कांहीं तरी चांगला व्यासंग पतकरून तो लक्षपूर्वक चालविला पाहिजे.

कोणतेंहि काम पूर्ण लक्ष न देतां केलें तर शेवटीं दुप्पट मेहनत पडते.

"विद्यानंदाचा अनुभव घेणारे लोक अजून किती थोडे आहेत ह्याचा विचार केला तर मनाला खेद वाटतो. आपणांस सुख व्हावें व आपली कर्तव्यबुद्धि जागृत रहावी हे दोन्ही हेतू साध्य होण्याकरितां आपण सर्वदा शहाण्या लोकांचे विचार वाचून किंवा ऐकून ध्यानांत ठेविले पाहिजेत."[1]

"मनुष्यानें आपली बुद्धि सुविचारांनीं अलंकृत करून ती आत्म्याचें राजमंदिर होण्यास पात्र केली पाहिजे."[2]

"आपलें जीवित हें एक शेत आहे, व त्याची बरीवाईट लागवड करणें हें आमच्या हातीं आहे. जर आपण त्या शेतांत नांगरणी, पेरणी वगैरे काळजीनें केली तर सारा देण्याचा दिवस येईल तेव्हां आपल्या हातीं चांगला संग्रह राहील."[3]

यूरोपांत पाझिटिव्हिस्ट अथवा आस्तिक्यवादी म्हणून एक पंथ आहे. त्यांतील इतर मतें कशींहि असोत, पण एक तत्त्व घेण्यासारखें आहे तें असें:—"मनुष्याच्या वर्तनास व्यवस्थितपणा हा आधार, भूतदया ही मार्गदर्शक, व प्रगति हा साध्य हेतु असला पाहिजे."

इमर्सन म्हणतो, पुष्कळ लोक आजपर्यंत आपल्या पूर्वजांच्या रीतीप्रमाणें देवाची भक्ति करीत आले आहेत. पण देवानें दिलेल्या सर्व गुणांचा सदुपयोग कर-

१ जॉन मॉर्ले २ ड्यूअर्ट ३ डीन

णें आपलें कर्तव्य आहे, असें त्यांस अद्यापि वाटूं लागलें नाहीं.

मनुष्यप्राणी पाहिला तर किती क्षुद्र आहे ! पण तो मनांत आणील तर केवढ्या योग्यतेस चढण्यासारखा आहे ! मनुष्याच्या अंगीं आहे म्हटलें तर सर्व कांहीं आहे, नाहीं तर कांहीं नाहीं. म्हटलें आहे कीं,

" नर करे करनी तो नरका नारायन होय. "

मनुष्य कसपटाप्रमाणें आहे खरा, पण त्याला विचारशक्ति आहे हा एक मोठा विशेष आहे. मनुष्याचा नाश करावयाचा असेल तर त्याला विश्वाच्या सर्व शस्त्रास्त्रांची जरूर नाहीं. वाऱ्याची लहानशी झुळूक, किंवा पाण्याचा एक थेंब सुद्धां तेवढें काम करील. पण ह्या अवाढव्य विश्वानें मनुष्यास जरी चिरडून टाकिलें तरी विश्वापेक्षां मनुष्याचीच योग्यता मोठी ठरेल. कारण मी मरतों हें ज्ञान मनुष्यास होतें. पण मीं मारतों हें ज्ञान विश्वाला होत नाहीं. मनुष्यामध्यें चिदंश आहे. विश्वामध्यें तो नाहीं.

( आर्या )

गिरयो गुरवस्तेभ्योऽप्युर्वी गुर्वी ततोऽपि जगदंडम् ॥
तस्मादप्यतिगुरवः प्रलयेऽप्यचला महात्मानः ॥ १

—जगन्नाथराय

**भावार्थ**—पर्वत मोठे आहेत, त्यांहीपेक्षां पृथ्वी मोठी आहे, तिच्यापेक्षांहि ब्रह्मांड मोठें आहे, पण प्रलयकालीं देखील ज्यांचें धैर्य ढळत नाहीं असे जे महात्मे ते ह्या सर्वांपेक्षां मोठे आहेत.

मनुष्याला पूर्णत्व येण्यास पुढें सांगितलेले गुण

अवश्य आहेतः-शांत चित्त, उदार अंतःकरण, विवेकबुद्धि आणि निरोगी शरीर. शांत चित्त नसेल तर आपलें वर्तन उतावीळपणाचें होईल. उदार अंतःकरण नसेल तर आपण केवळ स्वार्थनिष्ठ होऊं. निरोगी शरीरावांचून आपल्या हातून फारसें काम होणार नाहीं. आणि विवेकबुद्धि नसेल तर आपल्या उत्तम हेतूंपासूनहि उपकारापेक्षां अपकारच फार होईल.

एकाद्या मनुष्याची तारीफ करावयाची असली म्हणजे आपण म्हणतों कीं, तो मोठा सद्गृहस्थ आहे. खरे सद्गृहस्थ जगांत फार थोडे असतात. राजा मोठमोठे किताब देईल, सरदारी देईल, पण सद्गृहस्थपणा देण्याचें सामर्थ्य त्याला नाहीं. तथापि आपण मनांत आणलें तर आपणा सर्वांस सद्गृहस्थ होतां येईल.

"ह्या नरजन्मामध्यें जेवढी उन्नति साध्य आहे तेवढी साधून घ्यावयाची असेल तर मनुष्यानें आत्मसंयमन आणि ब्रह्मचर्य ह्यांच्या योगानें आपलें आरोग्य, बल आणि उत्साह ह्यांचें रक्षण केलें पाहिजे; अनुभव आणि सर्वोत्कृष्ट सुभाषितें ह्यांच्या योगानें आपलें मन सुसंस्कृत करून घेतलें पाहिजे; त्याचें कल्पनामंदिर जगांतील सर्व शुद्ध व सुंदर वस्तूंच्या चित्रांचें संग्रहालयच बनून राहिलें पाहिजे. त्याचें आचरण त्याच्या स्वतःच्या मनास, परमेश्वरास, आणि सर्व जगास संतोष देईल असें असलें पाहिजे. व त्याचें हृदय परमात्म्याचें मंदिर होण्यास योग्य असलें पाहिजे."[1]

१ आर्च डीकन् फ्यारर

"आत्मशिक्षणाचा खरा मार्ग म्हटला म्हणजे असा आहे कीं, सर्व गोष्टींसंबंधानें पृच्छा करावी; कोणतीहि शंका आली तरी तिचें निराकरण करून घेतल्याशिवाय सोडूं नये; साधक बाधक प्रमाणांचा पूर्ण विचार केल्याशिवाय कोणत्याहि मताचा स्वीकार करूं नये. विचारसरणीचा कोणत्याहि प्रकारचा दोष, किंवा असंबद्धपणा अगर घोंटाळा आपल्या नजरेंतून चुकून जाऊं देऊं नये. कोणत्याहि शब्दाचा उपयोग करण्यापूर्वी त्याचा अर्थ स्पष्टपणें समजून घ्यावा; कोणत्याहि सिद्धांतास अनुमोदन देण्यापूर्वी त्याचा नीट अर्थ समजून घ्यावा. आत्मशिक्षणासाठीं हेच धडे आपण शिकले पाहिजेत." व ते आपणा सर्वांस शिकतां येण्याजोगे आहेत.

शिक्षणाच्या निदान प्राथमिक क्रमासंबंधानें तरी सर्व लोकांस सारख्या सोयी आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. मोठी पदवी किंवा संपत्ति ह्यांच्यामुळें कांहीं म्हणण्यासारखी तफावत पडत नाहीं. सर विल्यम् जोन्स म्हणतो, "मी रंकाच्या स्थितीमध्यें असून राजपुत्राचें शिक्षण मिळविलें."—शिक्षण प्राप्त करून घेणें हें महाप्रयासाचें काम आहे खरें. पण त्यापासून केवढे मोठे लाभ आहेत! शिक्षणाच्या योगानें जगाच्या इतिहासावर प्रकाश पडून आपल्या उन्नतीचा मार्ग आपणास उज्ज्वल दिसूं लागतो; जगांतील वाङ्मयाचें स्वारस्य कळूं लागतें; सृष्टिरूप महाग्रंथ वाचण्याचें सामर्थ्य येतें; व जेथे जेथे आपण जाऊं तेथे तेथे आनंदाचीं साधनें आपणांस प्राप्त होतात.

१ जॉन स्टुअर्ट मिल्

( श्लोक )

व्यतिकरितदिगंताः श्वेतमानैर्यशोभिः ।
सुकृतविलसितानां स्थानमूर्जस्वलानाम् ॥
अकलितमहिमानः केतनं मंगलानां ।
कथमपि भुवनेऽस्मिन् तादृशाः संभवन्ति ॥ १

—भवभूति

भावार्थः—

( श्लोक )

विमल यश जयांचें कीं प्रकाशे दिगंतीं ।
सुरुचिर सुकृतांचें स्थान जे पूर्ण होती ॥
अतुलबल महात्मे मंगलांचीं निधानें ।
जगिं अशि बहु भाग्यें लाभती वीररत्नें ॥ १

वरील प्रकारचे धन्यवाद लोकांच्या तोंडांतून आपल्याविषयीं निघण्याची जरी आपणास आशा नसली तथापि,

( ओंवी )

साधु पवित्र पुण्यशील। अंतःशुद्ध धर्मात्मा केवल॥
कर्मनिष्ठ स्वधर्मे निर्मल। निर्लोभ अनुतापी ॥ १

—रामदास

अशा प्रकारचे उद्गार निघण्याजोगें वर्तन ठेवणें आपल्या स्वाधीन आहे. कारण थोडेबहुत तरी उन्नत विचार ज्याच्या मनांत येत नाहींत असा मनुष्य विरळा. पण ते विचार कायम ठेवून त्यांप्रमाणें वर्तन करणें हें आपलें काम आहे.

शिक्षणाचे परिणाम कित्येक ठिकाणीं जसे व्हावे तसे दिसत नाहींत. ह्याचें कारण असें आहे कीं, पुष्कळ लोक

शिक्षणाचा मुख्य हेतु काय आहे हें अगदीं विसरतात. " कांहीं लोक केवळ आपली स्वाभाविक जिज्ञासा तृप्त करण्याच्याच हेतूनें विद्येची आणि ज्ञानाची इच्छा करितात. कित्येकांचा केवळ मनोरंजनाचा उद्देश असतो. कित्येकांस भूषण आणि कीर्ति मिळवावयाची असतात. परंतु आपल्या बुद्धीचा मनुष्यजातीस उपयोग व्हावा अशी मनापासून इच्छा करणारे लोक फार थोडे असतात. पुष्कळांना असें वाटतें कीं, ज्ञान म्हणजे जिज्ञासेनें तळमळणाऱ्या जीवास पहुडण्याकरितां केलेला एक छपरपलंगच आहे; अथवा चंचल मनाला मौजेनें फिरण्यासाठीं व सुंदर देखावे पाहण्यासाठीं केलेली गच्चीच आहे; अगर हा गर्वित मनाचा दिमाखानें बसण्याचा उंच मनोरा आहे; किंवा विक्री करून नफा मिळविण्यासाठीं हें एक दुकानच आहे. परंतु ज्ञानाच्या योगानें परमेश्वराचा अगाध महिमा कळूं लागतो व मनुष्यजातीची उन्नति होते, हे जे त्याचे खरे उपयोग ते कोणी लक्षांत घेत नाहीं."

१ बेकन

( ओवी )

कीं हे शब्दरत्नांचे सागर । कीं हे मुक्तांचें मुक्त सरोवर ॥
नानाबुद्धींचें वैरागर । निर्माण झाले ॥ १

—रामदास

# प्रकरण ८

## पुस्तकालयें

एका इंग्लिश विद्वानानें सुमारें पांचशें वर्षांपूर्वी पुस्तकांची प्रशंसा केली आहे ती अशी :– पुस्तकें हे आपले गुरु आहेत. पण इतर गुरुजींप्रमाणें आपल्या विद्यार्थ्यांस शिकवितांना ते काठीचा उपयोग करीत नाहींत, किंवा कठोर वाग्बाण मारीत नाहींत. त्यांना पगार द्यावा लागत नाहीं. ते कधीं निजत नाहींत. तुम्हीं जाल तेव्हां शिकविण्यास तत्पर असतात. तुह्मीं त्यांना कांहीं शंका विचारिली असतां ते मोकळेपणानें उत्तर देतात, कांहीं लपवून ठेवीत नाहींत. त्यांच्याविषयीं तुमचा गैरसमज झाला तरी ते कुरकूर करीत नाहींत; तुमचें अज्ञान पाहून हांसत नाहींत. ह्याकरितां जें सर्व ज्ञानाचें भांडार आहे अशा पुस्तकालयाची योग्यता द्रव्याहून श्रेष्ठ आहे. ज्या मनुष्याला सत्याची आवड आहे, ज्याला खऱ्या सुखाची प्राप्ति करून घ्यावयाची आहे, ज्याला चातुर्य आणि विविधशास्त्रांत नैपुण्य मिळवावयाचें आहे, ज्याला धर्माचें रहस्य समजून घ्यावयाचें आहे त्यानें ग्रंथांशीं परिचय ठेविलाच पाहिजे."

हल्लींच्या काळीं तर ह्या म्हणण्याची यथार्थता विशेष दिसून येते. हल्लीं पुस्तकें किती सुलभ झालीं आहेत ! छापण्याची कला निघाल्यापासून पुस्तकें सुवाच्य, सुंदर, आणि आटोपशीर झालीं असून किती थोड्या किंमतीस विकत मिळतात बरें ! पानतंबाकूसाठीं एका दिवसांत जितका खर्च होतो तितक्या खर्चांत एक आठवडाभर

वाचण्यास पुरेल असें पुस्तक विकत घेतां येईल. माधवाचार्य, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, वामन पंडित, मोरोपंत, ह्यांच्यावेळीं पुस्तकांना फार किंमत पडत असे व ती देऊनहि पुस्तक मिळविणें फार जड जात असे. प्राचीन काळचीं पुस्तकें ताडाच्या पानाचीं केलेलीं असून तीं फार अवजड आणि ओबडधोबड असत व तीं वाचतांना फार आयास होत असत. हल्लीं मोठमोठ्या गहन विषयांवरील ग्रंथ देखील सुलभ रीतीनें वाचतां येतात. आपणांस आतां पूर्वीचे सर्व ग्रंथ मिळत असून आणखी कितीतरी नवीन नवीन ग्रंथांचा लाभ होत आहे! पूर्वी फक्त ह्याच देशांतले ग्रंथ वाचावयास मिळत. आतां सर्व जगांतील विद्वानांचे ग्रंथ आपणांस मिळतात. रसायनशास्त्र, भूगर्भशास्त्र, मानस शास्त्र इत्यादि अनेक नवीन शास्त्रें निर्माण झालीं आहेत. अलीकडे जे नवे नवे शोध लागले आहेत त्यांच्या योगानें इतिहास, भूगोल, ज्योतिष इत्यादि विषय पूर्वींपेक्षां फार मनोरम झाले आहेत.

पदार्थविज्ञान वगैरे शास्त्रांच्या योगानें इंग्लंडसारखीं राष्ट्रें किती धनाढ्य झालीं आहेत बरें! त्या शास्त्रांच्या योगानें संपत्तीची वाढ होते एवढेंच नाहीं, तर पुष्कळ बाबतींत आपला खर्च कमी होतो. म्हणून शाळा, पुस्तकालयें, पदार्थसंग्रहालयें इत्यादि स्थापन करण्यांत घातलेला पैसा फुकट न जातां त्यापासून देशाची संपत्ति वाढते. तथापि शाळा आणि सार्वजनिक पुस्तकालयें स्थापन करण्याचा मुख्य हेतु द्रव्यवृद्धि हा नाहीं; तीं स्थापण्याचा मुख्य उद्देश असा आहे कीं त्यांच्या

योगानें सामान्य लोकांचा आयुष्यक्रम सुखावह होतो. विशेषेंकरून शहरांतल्या मजूर लोकांस पुस्तकालयांची फार जरूर आहे. त्यांचें नेहमींचें काम फार कंटाळवाणें असतें. त्यांच्यापेक्षां एकाद्या रानटी मनुष्याचें आयुष्य देखील अधिक मौजेचें असतें. त्याला ज्या पशूंची पारध करावयाची असते त्यांच्या पाळतीवर रहावें लागतें. त्याला मासे मारण्याचें काम शिकावें लागतें. दर महिन्याला त्याच्या कामांत व खाण्यापिण्यांत कांहीं तरी फेरफार होतो. त्याला आपलीं आउतें तयार करावीं लागतात. घर बांधावें लागतें. विस्तव पाडण्याचें काम आपणास फार सोपें झालें आहे. पण त्याला त्यांत कांहीं कसब लढवावें लागतें. त्याचप्रमाणें शेतकऱ्याच्या कामांतहि बराच फेरबदल असतो. त्याला नांगरावयाचें असतें. पेरणी करावयाची असते, कापणी करावयाची असते. त्याला एका ऋतूंत लावणीचें काम असतें तर दुसऱ्या ऋतूंत काढणी, मळणी, तोडणी करावयाची असते. नांगर धरणें, कुंपण करणें, धान्याची पेंढी बांधणें इत्यादि गोष्टी आपणांस वाटतात तेवढ्या सुलभ नाहींत. त्यांत थोडेंबहुत कौशल्य लागतें. वर्डस्वर्थ कवीची अशी गोष्ट सांगतात कीं, एका मनुष्यास त्याची अभ्यासाची खोली पहाण्याची इच्छा होऊन त्यानें त्या कवीच्या चाकरास ती कोठे आहे म्हणून विचारिलें. तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, " ही धनीसाहेबांची खोली आहे. पण त्यांचा बहुतेक अभ्यास शेतांत व रानांत होत असतो." शेतकऱ्यांना शेतांत बरेंच ज्ञान प्राप्त होतें. त्यांना किती माहिती असते ह्याची आप-

णांस कल्पना नसते. त्यांचें ज्ञान पुस्तकांतून..नाहीं, तर शेतांतून प्राप्त झालेलें असतें. म्हणून त्यांची योग्यता कांहीं कमी नसते.

पण ज्या लोकांस दुकानांत किंवा कारखान्यांत बसून काम करावें लागतें, त्यांचें आयुष्य फार कंटाळवाणें असतें. त्यांना वर्षानुवर्षे एकच प्रकारचें काम करावें लागतें. जसजसा देशाचा व्यापार वाढतो तसतसा श्रमविभाग वाढून मजूर लोकांचें काम अधिकच कंटाळवाणें होतें. उदाहरणार्थ, खुर्च्यांचा मोठा कारखाना असला म्हणजे त्यांत कांहीं मजुरांस नुसते खुर्चीचे पायच सारा दिवस करीत बसावें लागतें. दुसऱ्यांना नुसते हातच करावे लागतात. दुसऱ्या कित्येकांस खुर्च्यांना पालिश करण्याचेंच काम असतें. अशा प्रकारच्या व्यवस्थेनें प्रत्येक मजुरास आपआपलें काम करण्यांत विलक्षण चलाखी येऊन काम लौकर होतें खरें. पण त्या मजुराचें मन अगदीं संकुचित होऊन तो एक बोलतेंचालतें यंत्रच बनून रहातो. मुंबईसारख्या शहरांतील मजुर लोकांची अशीच स्थिति आहे. व आपल्या देशांत यंत्रकलेचा जसजसा प्रसार होईल तसतशी ही स्थिति सर्व शहरांतून दिसूं लागेल. मजूर लोकांच्या मनाचा कोतेपणा जाऊन त्यांची करमणूक व्हावी हा हेतु पूर्ण करण्यास पुस्तकालयासारखें दुसरें साधन नाहीं. मजूर लोकांना फुरसद फार थोडी मिळते खरी; पण जेव्हां मिळते तेव्हां ती आळसांत किंवा व्यसनांत घालविणें बरोबर नाहीं. फुरसदीची वेळ ही अमोलिक देणगी समजली पाहिजे. तिचा योग्य उपयोग केला असतां

सौख्य मिळतें. ती आळसांत घालविली असतां दुःख होतें. एकाद्या मनुष्यास जेव्हां रोजगार नसतो तेव्हां त्यानें आपल्या वेळाचा कसा उपयोग करावा? त्याचा पुस्तकालयांत प्रवेश होईल तर त्याला आपल्या वेळेचा सदुपयोग करितां येईल.

ज्या कारणासाठीं आपण आपल्या मुलांस शिक्षण देऊं त्याच कारणासाठीं प्रौढ वर्गातल्या मनुष्यांसहि शिक्षण पाहिजे. हल्लीं जिकडे तिकडे प्राथमिक शाळा झाल्या आहेत. त्यांत लहान मुलांस शिक्षण मिळतें. त्या ठिकाणीं मुलें वाचावयास शिकतात आणि वाचनाची त्यांना गोडी लागते. लहान मुलांस हें शिक्षण आपण कशासाठीं देतों बरें? कारण शिक्षणापासून मनुष्याची सुधारणा होते, व त्याला आपलें काम चांगलें करितां येतें, अशी आपली खातरी आहे म्हणून. पण हें शिक्षण बालपणीं मिळालें म्हणजे तेवढ्यानें भागत नाहीं. प्रौढपणींहि तें चालू ठेविलें पाहिजे. आतां प्रौढ माणसांच्या शाळा म्हणजे पुस्तकालयेंच होत. मुलांस लहानपणीं वाचावयास शिकविल्यानंतर त्याला वाचण्यासाठीं पुस्तकें मिळण्याची तजवीज अवश्य झाली पाहिजे. सुदैवानें पुस्तकांचा दुर्भिक्ष होण्याचा कधीं संभव नाहीं ही मोठी चांगली गोष्ट आहे. एका गरीब बाईनें जेव्हां प्रथमच समुद्र पाहिला तेव्हां ती म्हणाली, " अहाहा! सर्व मनुष्यांस यथेच्छ मिळण्यासारखी एकतरी वस्तु ह्या जगांत आहे हें पाहून मला मोठें समाधान वाटतें." पुस्तकांचीहि तशीच गोष्ट आहे. सर्व मनुष्यांस पुरण्याजोगा पुस्तकसंग्रह करणें फारसें कठिण

नाहीं, व जीं पुस्तकें सर्वांत उत्तम तीं तर फारच स्वस्त मिळतात. वाचनाचा आनंद श्रीमंत आणि गरीब ह्या दोघांसहि सारखाच सुलभ आहे. असा सारखेपणा फारच थोड्या गोष्टींसंबंधानें दिसून येतो. हल्लीं आपली अशी स्थिति झाली आहे कीं, आपणापाशीं जेवढ्या वस्तु असतील त्यांपेक्षां जास्त हव्याशा वाटतात. पण दैवयोगानें पुस्तकें मात्र आपल्याकडून वाचवतील त्याहून जास्त आपणांस मिळण्यासारखीं आहेत.

शिक्षण जन्मभर चालू असलें पाहिजे ही गोष्ट आपणांस अलीकडे कळूं लागली आहे. तसेंच मुलांस शिक्षण द्यावयाचें तें केवळ शब्द आणि व्याकरण शिकविल्यानें पुरें होत नाहीं; तर त्यांना हस्तकौशल्य आणि अवलोकनशक्ति हीं जेणेंकरून येतील अशा प्रकारचेंहि शिक्षण पाहिजे. त्याचप्रमाणें प्रौढ स्त्रीपुरुषांनीं फक्त शारीरिक श्रम करून केवळ पैशाच्या पाठीं लागावें, आणि दुसरे कांहीं विचार त्यांच्या मनांत येऊं नयेत हा प्रकार ठीक नाहीं. त्यांचा थोडाबहुत वेळ ज्ञान मिळविण्यांत आणि आपली मानसिक सुधारणा करण्यांत जावा हें फार इष्ट आहे. दुसरें असें कीं, प्रत्येक मनुष्यानें मनुष्यजातीच्या ज्ञानांत यथाशक्ति भर घालण्याचा प्रयत्न कां करूं नये? कितीहि हलक्या दरजाचा मनुष्य असला तरी त्याला असा प्रयत्न करितां येईल. शारीरिक श्रमाची योग्यता आपणांस अद्यापि नीटशी कळूं लागली नाहीं. पुष्कळांना असें वाटतें कीं, शास्त्रीय शोध लावण्याचें काम सामान्य लोकांच्या आवांक्याबाहेर आहे; आणि ज्यांना मोठ्या कि-

मतीचीं यंत्रें घेण्याचें सामर्थ्य असेल व ज्यांची बुद्धि विशाल असेल, अशाच लोकांना तें साध्य आहे. पण हा समज चुकीचा आहे. इंग्लंड देशाची जी भरभराट झालेली आपण पहातों ती कोणामुळें? कांहीं अंशीं शहाणे राजे आणि मुत्सद्दी ह्यांच्यामुळें. कांहीं अंशीं तेथील शूर लष्कर आणि आरमार ह्यांच्यामुळें, कांहीं अंशीं दूरचे देश शोधून तेथे अम्मल बसविणाऱ्या लोकांमुळें, व कांहीं अंशीं त्या देशांतील विद्वान् आणि तत्त्वज्ञानी ह्यांच्यामुळें. ह्या सर्वांचे उपकार त्या देशावर आहेत ह्यांत शंका नाहीं. तथापि त्या देशांतील मजूर लोकांचेहि उपकार लहान सहान नाहींत. त्यांनीं केवळ अंगमेहनतीचींच कामें केलीं आहेत असें नाहीं. तर आपल्या बुद्धिबलानेंहि त्यांनीं देशाचें फार कल्याण केलें आहे.

वाफेच्या यंत्राचा शोध लावणारा वॅाट् हा सुताराचा मुलगा होता. हेन्री कार्ट हा एका गवंड्याचा मुलगा असून त्यानें अशा कांहीं यांत्रिक सुधारणा केल्या कीं त्यांच्या योगानें इंग्लंडच्या संपत्तींत बरीच भर पडली आहे. हंटसमन् हा एका घड्याळजीचा मुलगा होता. त्यानें पोलाद ओतण्याची युक्ति शोधून काढली. क्रॅांपटन् हा कोष्टी होता. वेजवुड हा कुंभार होता. ब्रिंड्ले, टेल्फर, मरडाक् आणि नील्सन् हे केवळ मजूर होते.

वाफेची गाडी तयार करणारा स्टिफन्सन् हा प्रथम केवळ गुराखी होता, व अठरा वर्षांच्या वयाचा होईपर्यंत त्याला लिहितां वाचतां देखील येत नव्हतें. डाल्टन् हा कोष्ट्याचा मुलगा होता. फ्यारडे हा लोहाराचा मुलगा

होता. न्यूकम हाहि लोहाराचा मुलगा होता. आर्करांईट ह्याचा पहिला धंदा न्हाव्याचा होता. सर हंफ्रे डेव्ही हा औषधांच्या दुकानांत उमेदवार होता. ह्या व अशा दुसऱ्या पुष्कळ लोकांनीं जगावर फारच मोठे उपकार केले आहेत. व ज्या देशांत हे लोक निपजले त्या देशास त्यांच्याबद्दल अभिमान वाटणें सहाजिक आहे.

अमुक राष्ट्रें उन्नत स्थितीस पावलीं असें आपल्या ऐकण्यांत वारंवार येतें. व काहीं राष्ट्रें इतर राष्ट्रांपेक्षां सुधारलेलीं आहेत हें खरें आहे. तथापि उन्नत हें विशेषण ज्याला पूर्णपणें लागू पडेल असें एकहि राष्ट्र नाहीं. आपल्या राष्ट्राची खरी उन्नति करण्याविषयीं आपण झटलें पाहिजे. व पुस्तकालयांची स्थापना करणें हा राष्ट्रोन्नतीचाच एक मार्ग होय.

पुष्कळ लोक असे आहेत कीं, त्यांचा जन्म म्हणजे एक सक्तमजुरीची शिक्षाच असते. अशा लोकांस सुख आणि मनोरंजन ह्यांचा लाभ होण्यास चांगल्या पुस्तकांसारखें दुसरें साधन नाहीं.

प्रख्यात शास्त्रज्ञ सर जान हर्शल ह्यानें म्हटलें आहे:– "सर्व प्रकारच्या स्थितींमध्यें मला उपयोगीं पडणारी, संसारांत कसेंहि बिकट प्रसंग आले आणि सर्व जगाची कितीहि वक्रदृष्टि माझ्यावर झाली तरी सदासर्वकाळ सुख आणि आनंद देणारी, अशी एकादी वस्तु देवापाशीं मला मागावयाची असली तर मी वाचनाची अभिरुचि मागून घेईन. ज्या मनुष्यास ही अभिरुचि आहे व ती तृप्त करण्याचीं साधनें आहेत त्याला सुखाची वाण कधीं पड-

णार नाहीं. त्याला सर्वकाळच्या अत्यंत शहाण्या, विनोदी, दयाळू, शूर, सद्गुणी आणि मनुष्यजातीस भूषणभूत अशा महात्म्यांचा समागम घडतो. त्याला सर्व देशांत आणि सर्वकालीं राहिल्याचें श्रेय मिळतें. सर्व जग त्याच्याकरितां निर्माण केलें आहे कीं काय असा भास होऊं लागतो."

पुस्तकें हे जणूं काय सजीव प्राणीच आहेत.' मिल्टन् म्हणतो, "ग्रंथकर्त्यांच्या चैतन्यासारखेंच कार्यक्षम चैतन्य ग्रंथामध्यें वास करीत असतें." मोठे ग्रंथकार सदा अमरच असतात.

(श्लोक)

ज्याचें विशाल मन उद्धरि मन्मनातें ।
तो जाहला मृत असें न गमेच मातें ॥
वास्तव्य जें हृदयमंदिरिं पूढिलांच्या ।
त्यालाच मृत्यु वदणें अयथार्थ वाचा ॥ १

पुस्तकें हा प्राचीन काळापासून सांठविलेला खजिना आहे.

नाना प्रकारच्या व्यसनांत किती पैसा खर्च होतो ह्याचा विचार केला तर पुस्तकांसंबंधानें केलेला खर्च दिवाळखोरी आहे असें कोण म्हणेल? खरोखर एकाद्या व्यसनास जितका पैसा लागतो त्याचा अल्प अंश देखील पुस्तकांप्रीत्यर्थ खर्च होत नाहीं. हल्लीं ज्याठिकाणीं दारूचे पिठे, जुगाराचे अड्डे, व गांजाचीं दुकानें दिसतात, त्या ठिकाणीं पुस्तकालयें ज्या दिवशीं दिसूं लागतील तो सुदिन होय.

( श्लोक• )

काव्यशास्त्रविनोदेन । कालो गच्छति धीमतां ॥
व्यसनेन तु मूर्खाणां । निद्रया कलहेन वा ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—जे शहाणे लोक असतात त्यांचा काल काव्यशास्त्रादिकांच्या वाचनापासून होणाऱ्या आनंदांत जातो. पण मूर्खांचा वेळ व्यसनांत, झोंपेंत, आणि भांडणांत जातो.

( श्लोक )

पुराणकाव्यें पढतां अहर्निशीं ।
उदारता येई मदीय बुद्धिशीं ॥
कवींद्र माझे असती सखे सदा ।
असे तयांची सरसोक्ति तोषदा ॥ १

—कुसुमांजलि

# प्रकरण ९

## वाचन

स्मरणशक्तीचा जो उपयोग मनुष्यास होतो तोच पुस्तकांच्या योगानें मनुष्यजातीस होतो. मनुष्यजातीचा इतिहास, मनुष्यानें केलेले सर्व शोध, हजारों वर्षांचा त्याचा अनुभव आणि ज्ञान, ह्या सर्वांचें संरक्षण पुस्तकें करितात. तीं सृष्टींतील सर्व सुंदर आणि अद्भुत वस्तूंचीं हुबेहुब चित्रें आपल्या डोळ्यांसमोर काढितात. पुस्तकें आपणांस अडचणीच्या प्रसंगीं मदत करितात; आपण दुःखांत किंवा विपत्तींत असतांना तीं आमचें समाधान करितात; तीं आमच्या मनांत सत्कल्पनांचा व सुविचारांचा भरणा करितात, आणि एकंदरींत आह्मांस उन्नतावस्थेप्रत नेतात.

अशी एक आख्यायिका आहे कीं, एका शहरांत दोन मनुष्य होते. त्यांपैकीं एक राजा होता व दुसरा भिकारी होता. जो राजा होता त्याला प्रतिरात्रीं असें स्वप्न पडे कीं, मी भिकारी आहें. भिकारी होता त्याला प्रत्येक रात्रीं स्वप्नांत असा भास होई कीं, मीं राजा आहें. मला वाटतें कीं, त्या राजाची स्थिति भिकाऱ्याच्या स्थितीहून फारशी चांगली होती असें नाहीं. कधीं कधीं कल्पनेचा प्रभाव साक्षात् वस्तूंपेक्षांहि जास्त असतो. वाचनाच्या योगानें आपणांस वाटेल तर राजपद आणि प्रासादसुख ह्यांचा अनुभव घेतां येतो, व एका क्षणांत श्रमावांचून, सुखानें आणि बिनखर्चानें भूतलावरील अत्यंत रमणीय स्थळीं गमन करितां येतें.

( श्लोक )

सोडा हो मजला सुखें विहरण्या जाईन मी सत्वरी ।
जेथें ग्रंथ सखे मदीय वसती तें स्थान माझी खरी ॥
आहे राजसभा तिथें कविमुनीतत्त्वज्ञवर्यांसवें ।
केव्हां भूपतिंच्या सवें करितसें संभाषणा उत्सवें ॥ १
तेथें मी नृपनीतिची करितसें पृच्छा समदृष्टिनें ।
न्याय्यान्याय्य कृती विलोकुनि करीं भूपांसही शासनें ॥
हे आनंद चिर त्यजूनि विभवा पोंचा वरूं काय मी ।
द्रव्यार्थी धनराशि मेळवु सुखें ज्ञानार्जनीं सक्त मी ॥ २

—फ्लेचर

पुस्तकांना मित्रांची उपमा देण्याची वहिवाट आहे. पण आपल्या मानवी मित्रांपैकीं उत्तम उत्तम मित्रांस निर्दय काळ ओढून नेतो. पुस्तकरूपी मित्रांपैकीं उत्तम जे आहेत त्यांना कधीं मरण नाहीं. त्यांपैकीं वाईट जे आहेत ते मात्र काळाच्या तावडींत सांपडून लवकर नाश पावतात.

( श्लोक )

ग्रंथांत आत्मा वसतो पवित्र । बाहेर राहे जड देह मात्र ॥
आत्मे सुधींचें हित पुस्तकांनीं । नेती सुमार्गी नच आडरानीं ॥
सत्पुस्तकां मृत्यु कदा न येई । कालांतरें शुद्धिच मात्र होई ॥
कुपुस्तकें पावति शीघ्र नाश । राहूं न दे त्यांस जगांत ईश ॥ १

—लिटन्

ज्यांना ह्या जगांत कांहीं कमी नव्हतें अशा बऱ्याच लोकांनीं आपला असा अनुभव सांगितला आहे कीं, आमच्या खऱ्या आनंदाचा बराच भाग आह्मांस पुस्तकांपासून प्राप्त झाला. लेडी जेन ग्रे ह्या नांवाची एक प्रख्यात राजकन्या इंग्लंडच्या राजघराण्यांत होऊन गेली. तिच्या

वाचनाच्या' अभिरुचीविषयीं एक गोष्ट सांगतात ती फार चित्तवेधक आहे. ही विदुषी आपल्या खोलीच्या खिडकीपाशीं बसली होती, व साक्रेतिसानें न्यायाधीशासमोर आपल्या निरपराधीपणाच्या शाबितीकरितां भाषण केलें त्या प्रसंगाची हृदयंगम हकीकत प्लेटोच्या पुस्तकांतून ती वाचीत होती. त्याच वेळीं तिचे आईबाप शेजारच्या अरण्यांत शिकार करीत होते. शिकारी कुत्रीं मोठ्यानें भुंकत होतीं त्यांचा आवाज तिच्या खोलींत स्पष्ट ऐकूं येत होता. तेव्हां तिला कोणीं म्हटलें कीं, बाईसाहेब शिकारीची मौज सोडून आपण एथेच बसलां ह्याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. तेव्हां ती म्हणाली कीं, प्लेटोचें पुस्तक वाचण्यांत जो आनंद मला वाटतो त्याच्या शतांशहि शिकारींत नाहीं असें मला वाटतें.

मेकॉले ह्यास द्रव्य, कीर्ति, पदवी, आणि अधिकार ह्यांची कांहीं कमतरता नव्हती. पण त्यानें असें म्हटलें आहे कीं, मला पुस्तकांपासून जें सुख प्राप्त झालें आहे त्यापुढें इतर सुखें तुच्छ आहेत. त्यानें एका लहान मुलीस पत्र लिहिलें आहे त्यांत तो म्हणतो:—" प्रियमुली, तुझें सुंदर पत्र वाचून मला फार आनंद झाला. तुला सुखी करण्यांत मला नेहमीं आनंद वाटतो. तुला पुस्तकें आवडतात हें पाहून तर मला फार संतोष वाटतो. तूं माझ्याएवढी मोठी झालीस म्हणजे तुला कळून येईल कीं, खाऊ आणि खेळणीं आणि जगांतील सर्व सुंदर देखावे ह्यांपेक्षां पुस्तकांची योग्यता अधिक आहे. मला जर कोणी सार्वभौम राजाचें पद दिलें, मोठमोठे वाडे, गाड्या, घोडे, हजारों नोकर, वगैरे वैभव

दिलें, आणि त्याबरोबर अशी अट ठेविली कीं मीं पुस्तकें म्हणून वाचतां कामा नये, तर मी तें राजपद आणि राजवैभव मला नको म्हणून सांगेन. वाचनाचें सौख्य ज्याला नाहीं अशा प्रकारचा राजा होण्यापेक्षां, नानाप्रकारच्या ग्रंथांनीं परिपूर्ण अशा झोंपडीमध्यें गरीबींत रहाणें हेंच मला अधिक पसंत वाटेल. "

"एकाद्या पुस्तकापासून आपणास आनंद होत नसेल तर तो त्या पुस्तकाचा दोष आहे असेंच खातरीनें समजूं नये. वाचनांत देखील एकप्रकारचें कौशल्य लागतें. विचार केल्याशिवाय वाचीत सुटण्यांत कांहीं फायदा नाहीं. आपण जें वाचतों तें नीट समजण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्रत्येकास असें वाटत असतें कीं, लिहिण्या वाचण्याची कला आपणास पूर्णपणें अवगत आहे. पण खरोखर फारच थोड्या लोकांस चांगलें लिहितां आणि वाचतां येत असेल. लक्ष दिल्याशिवाय ओळींच्या मागून ओळी वाचीत गेलें आणि पुष्कळ पानें फिरविलीं म्हणजे वाचन होत नाहीं. ज्या देखाव्यांचें वर्णन केलें असेल, व ज्या मनुष्यांचा उल्लेख केला असेल, ते देखावे व तीं मनुष्यें डोळ्यांसमोर स्पष्ट दिसलीं पाहिजेत. अनुभवाच्या योगानें ज्या गोष्टी शिकण्यास वीस वर्षें लागतील त्या विद्येच्या योगानें एका वर्षांत शिकतां येतात. विद्येच्या योगानें शिकतांना कांहीं इजा किंवा नुकसान होत नाहीं. अनुभवाच्या साधनानें शिकणाऱ्या मनुष्यास शहाणपण येतें, पण त्याच्या शतपट दुःख भोगावें लागतें. प्रत्यक्ष अनुभवावांचून जो शहाणा होत नाहीं त्याची बरीच हा-

नि होत असते. जो नाखवा आपल्या हातून बरींच गल-बतें फुटेपर्यंत आपल्या कामांत हुषार होत नाहीं, किंवा जो व्यापारी बऱ्याच वेळां दिवाळें निघाल्यावांचून श्रीमंत होत नाहीं, तो दुर्दैवी नव्हे काय? अनुभवानें मिळविलेलें शहाणपण फार खर्चाचें होय. आपणास एकाद्या ठि-काणीं सर्वांत जवळच्या रस्त्यानें जावयाचें असून तो रस्ता शोधून काढण्याकरितांच जर आपणास फार भट-कावें लागलें तर किती वाईट वाटतें बरें! मला विद्येची जरूर नाहीं, मी स्वतःच्या अनुभवानें शहाणा होईन, असें जो मनुष्य म्हणत असेल त्याच्या अंगीं कितीहि हुषारी असली तरी जसा एकादा अतिशय चपल मनुष्य देखील अंधारांत चालत असतां आपला मार्ग सोडून दूर जातो, व मी कोठे जात आहें हें त्यास समजत नाहीं, तद्वत् त्याची अवस्था होते. विद्येचें साहाय्य न घेतां केवळ अनुभवाच्या जोरावर शहाणे होणाऱ्या लोकांची संख्या फारच थोडी असेल. आणि त्या थोड्यांच्या दे-खील मागील आयुष्यक्रमाकडे आपण थोडेंसें लक्ष दिलें तर असें दिसून येईल कीं, त्यांच्या हातून मोठ्या चुका झाल्या आहेत, व त्यांच्यावर भयंकर संकटें येऊन गेलीं आहेत. असा विचार केल्यावर आपल्या मुलानें अशाच अनुभवाच्या साधनानें शहाणपणा आणि सौख्य हीं मि-ळवावीं असें कोणास तरी वाटेल काय?"

ज्याप्रमाणें मित्रांची त्याचप्रमाणें पुस्तकांची निवड क-रणें हें फार विचाराचें काम आहे. ज्याप्रमाणें आपल्या

कृत्यांबद्दल त्याचप्रमाणें आपल्या बऱ्या-वाईट वाचनाब-द्दल आपणावर मोठी जबाबदारी असते. मिल्टन् ह्यानें ग्रंथांविषयीं एक सुंदर रूपक केलें आहे. तो म्हणतो, " महात्म्यांचा एक जन्म संपल्यावर ह्याच जगांत त्यांचा दुसरा जन्म सुरू होतो. व त्या जन्मांत त्यांचा जीवनव्यापार चालू रहाण्याकरितां त्यांचें मागील जन्मींचें रक्त सद्ग्रंथरूपानें अविनाशी होऊन उपयोगीं पडतें. "

मुलींच्या शिक्षणासंबंधानें रस्किन् ह्यानें म्हटलें आहे:— " मुलींच्या हातीं कोणतीं पुस्तकें पडतात ह्याच्यावर चांगली नजर ठेविली पाहिजे. मौर्ख्य जलाच्या कारंजांतील तुषारांनीं थबथबलेलीं नवीन नवीन पुस्तकें निघत असतात तीं, त्यांच्या हातीं न जातील अशी खबरदारी ठेविली पाहिजे. "

पुस्तकांपासून जेवढें म्हणून हित आणि सौख्य मिळण्याजोगें आहे तेवढें सर्व मिळविण्याची ज्याची इच्छा असेल त्यानें मनोरंजनापेक्षां आत्मोन्नतीचाच हेतु मनांत धरला पाहिजे. कादंबऱ्या नाटकें वगैरे मनोरंजक पुस्तकें ह्यांचा पुष्कळ उपयोग आहे खरा, पण तो साखरेप्रमाणें आहे. साखरेवर जसा आपला निर्वाह होणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें सारा वेळ कादंबऱ्याच वाचीत बसल्यास आपली सुधारणा होणार नाहीं.

कांहीं पुस्तकें अशीं असतात कीं, त्यांना पुस्तक हें नांवच शोभत नाहीं. व तीं वाचणें म्हणजे व्यर्थ कालक्षेप करणें होय. कांहीं पुस्तकें इतकीं वाईट असतात कीं तीं वाचकांवर अपवित्र संस्कार करितात. तींच पुस्तकें

जर माणसें असतीं तर आपण त्यांस लाथ मारून हांकून दिलीं असतीं. ह्या जगांत अनेक प्रकारचे मोहपाश आहेत, त्यांबद्दल आपणांस इशारत मिळावी हेंहि कधीं कधीं जरूर असतें. तथापि जीं पुस्तकें वाचकांस दुराचाराचा अति परिचय करून देतात तीं वाईटच समजलीं पाहिजेत.

कांहीं पुस्तकें अशीं आहेत कीं, तीं वाचल्यापासून मनुष्याची कांहींतरी सुधारणा झाल्यावांचून रहात नाहीं. सुदैवानें अशा प्रकारचीं पुस्तकें पुष्कळ आहेत. जीं पुस्तकें आपणास आपल्या धंद्यासंबंधानें उपयोगीं पडतात तेवढींच पुस्तकें उपयुक्त आहेत असें समजूं नये. त्या पुस्तकांच्या योगानें आपला निर्वाह चालतो हा उपयोग आहे खरा, पण निर्वाहसाधन हा पुस्तकांचा अत्यंत श्रेष्ठ उपयोग नव्हे. जीं पुस्तकें आपणांस निर्ममत्वाच्या आणि निरहंकाराच्या उच्च प्रदेशांत नेऊन सोडितात, आणि ह्या जगांतील दुःखांचा व संकटांचा विसर पाडितात तींच पुस्तकें सर्वांत श्रेष्ठ होत.

अशा प्रकारचें पुस्तक वाचीत असतां जर कोणी त्रास दिला तर त्यानें आपली मोठी हानि केली असें आपणांस वाटतें. समजा कीं, ज्याचे रीतिरिवाज आपणाहून अगदीं भिन्न आहेत व जो अन्य युगांत निर्माण झाला अशा एकाद्या ग्रंथकाराचें पुस्तक वाचण्यांत आपण गर्क झालों आहों; उदाहरणार्थ प्लेटोच्या ग्रंथांतून साक्रेतिसावर चाललेल्या खटल्याच्या इनसाफाची हकीकत आपण वाचीत आहों; त्या वेळेचा सर्व देखावा आपल्या डोळ्यांपुढें हुबेहुब दिसत आहे; पांचशें लोकांची ती न्यायसभा, ग्रीक

काळचो ती भव्य इमारत, न्यायसभेंतील अथेन्स शहरवासी प्रेक्षकांची गर्दी, साक्रेतिसाचे मत्सरग्रस्त शत्रू, दुःखानें विव्हळ झालेले त्याचे मित्र ( ज्यांचीं नांवें अमर आंहेत व आपणांस अद्यापि प्रिय वाटतात ), हीं सर्व आपणापुढें स्पष्ट दिसत आहेत. ह्या सर्वांच्या मध्यभागीं जाडेभरडे गरिबीचे कपडे घातलेला एकच मनुष्य दिसत आहे. हिंवाळा असो, उन्हाळा असो, सदोदित तेच कपडे तो घालतो. त्याचा चेहरा इतका साधा आहे कीं, कित्येकांस तो कुरूप वाटेल. पण त्या चेहेऱ्यावर मानसिक धैर्याचें व आत्मनिग्रहाचें असें अप्रतिम तेज झळकत आहे कीं, तें ओढूनताणून कधींहि येणार नाहीं. अशा त्या व्यक्तीच्या मुखांतून गंभीर वाणींनें शब्द येण्यास नुकती सुरवात झाली आहे, अशा वेळीं आपणास कोणी त्रास न देतां जर आपलें वाचन शेवटास गेलें तर त्या घटकेंत जो अनिर्वाच्य आनंद आपणास होईल त्यासारखें मानसिक श्रमाचें अत्यंत श्रेष्ठ फळ दुसरें नाहीं.

चांगलें व मनोरंजक पुस्तक वाचून ज्याचें मन उन्नत होत नाहीं व ज्याला धन्यता वाटत नाहीं असा मनुष्य विरळा. अशा पुस्तकाचा केवळ क्षणिक परिणाम होत नाहीं. आपल्या मनावर थोडाबहुत तरी कायमचा संस्कार होऊन कांहीं उन्नत विचारांचा संग्रह आपल्या मनांत होतो व त्याचा आपणास हवा तेव्हां उपयोग होतो.

आपल्या देशांत जें वाङ्मय आजपर्यंत निर्माण झालें आहे त्याची योग्यता अवर्णनीय आहे. तें वाङ्मय आमचें सर्वोत्कृष्ट धन आहे. तें आमच्या देशाचें अत्यंत

सुंदर भूषण आहे. व तें आपणास प्राप्त झालें हें आमचें थोर भाग्य समजलें पाहिजे.

रामदासस्वामींनीं कवींची थोरवी वर्णिली आहे ती अगदीं यथार्थ आहे.—

( ओंव्या )

कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नवरसांचे ओघ लोटले ॥
नाना सुखांचें उचंबळलें । सरोवर हे ॥ १

कीं हीं विवेकनिधीचीं भांडारें । प्रकट जाहलीं मनुष्याकारें ॥
नानावस्तूंचेनि विचारें । कोंदाटिले हे ॥ २

कीं हीं सुखाचीं तारवें लोटलीं । अक्षय आनंदें उतटलीं ॥
विश्वजनांसी उपयोगा आलीं । नाना प्रयोगांकारणें ॥ ३

( श्लोकार्ध )

दुर्लभं भारते जन्म । मानुष्यं तत्र दुर्लभम् ॥

**भावार्थः**—भरतखंडांत जन्म होणें हें दुर्लभ आहे व त्यांतहि मनुष्याचा जन्म पावणें अत्यंत दुर्लभ होय.

# प्रकरण १०

## देशभक्ति

ज्या गुणाच्या अभावीं मनुष्यास मनुष्य हें नांव शोभणार नाहीं असा जर एकादा गुण असेल तर तो स्वदेशप्रीति हा होय. हा माझा देश, ही माझी जन्मभूमि, असे प्रेमळ उद्गार ज्याच्या तोंडांतून कधींहि निघत नाहींत तो मनुष्य केवळ पशूच होय. ज्या देशांत परमेश्वरानें आपणास जन्मास घातलें आहे त्या हिंदुस्थान देशासारखी सुंदर आणि चमत्कारपूर्ण भूमि साऱ्या दुनियेंत दुसरी नसेल. पृथ्वीमातेची आर्यभूमि ही सर्वांत लाडकी कन्या आहे ह्यांत संशय नाहीं. तिनें आपला सर्वोत्कृष्ट आणि बहुमोलाचा शिरोऽलंकार जो हिमनग तो आर्यभूमीच्या वेणींत गुंफिला आहे. त्यामुळें तिला अवर्णनीय शोभा आली आहे. तिनें गंगा, यमुना, कृष्णा, गोदावरी इत्यादि पवित्र आणि उज्ज्वल मुक्ताहार तिच्या गळ्यांत घातले आहेत. ती निरनिराळ्या ऋतूंत तिला नवीन नवीन उंची वस्त्रें परिधान करण्याकरितां देते. आपली आर्यभूमि प्राचीन काळापासून लक्ष्मीचें व सरस्वतीचें केवळ माहेरघर आहे. अशा ह्या देशजननीच्या हितार्थ रात्रंदिवस झटण्यास प्रत्येक आर्यपुत्रास अभिमान आणि आनंद वाटला पाहिजे.

हिंदुस्थान देशांत पृथ्वीवरील सर्व देशांतील हवेचा व देखाव्यांचा नमुना दृष्टीस पडतो. पृथ्वीवरील सर्व प्रकारचीं धान्यें व फळें एथे होतात. आम्रवृक्षासारखीं उत्तम

फळझाडें, चंदनासारखे सुवासिक वृक्ष, चंपक, पारिजात, मालती, केतकी, मोगरा, जाई, जुई इत्यादिकांसारखे उत्कृष्ट पुष्पवृक्ष आणि लता हिंदुस्थानाबाहेर क्वचित् दृष्टीस पडतील.

ज्या देशांत ऋग्वेद, उपनिषदें, भगवद्गीता इत्यादिक महाग्रंथ निर्माण झाले; व्यास, वाल्मीकी, याज्ञवल्क्य इत्यादिक महामुनी झाले; कालिदास, भवभूती ह्यांसारखे कवीश्वर झाले; रामचंद्र, धर्म, नल, ह्यांसारखे पुण्यश्लोक राजे उत्पन्न झाले; भीष्म, द्रोण, अर्जुन, कर्ण, ह्यांसारखे वीरशिरोमणी निपजले; जेथे अध्यात्मज्ञानाचा प्रथम उदय होऊन अत्यंत उत्कर्ष झाला; ज्या देशानें गणित, ज्योतिष इत्यादि शास्त्रें सर्व जगास शिकविलीं; त्या देशाचें महत्त्व काय वर्णन करावें? अशा देशांत जन्म प्राप्त झाल्याबद्दल कोणास अभिमान वाटणार नाहीं?

ज्या लोकांमध्यें अगदीं परवांपर्यंत शिवाजी, पहिले बाजीराव, थोरले माधवराव ह्यांसारखे शूर व शहाणे राजे झाले; परशुरामभाऊ पटवर्धन, बापु गोखले, जिवबा बक्षी ह्यांसारखे पराक्रमी सरदार झाले; नाना फडणविसासारखे थोर मुत्सद्दी झाले; रामदास, तुकाराम ह्यांसारखे महान् साधु झाले; ज्या लोकांत न्यायमूर्ती *रानडे, तेलंग, दादाभाई नवरोजी, डॉ. राजेंद्रलाल मित्र, डॉ. भां-

* हा लेख लिहून झाल्यानंतर ह्या सत्पुरुषाचें देहावसान झालें व आपल्या देशाची मोठी हानि झाली. हे गृहस्थ कीर्तिरूपानें नेहमीं चिरंजीव राहतील. व ह्या पुस्तकाच्या ८ व्या प्रकरणाच्या १६९ व्या पृष्ठावरील श्लोक त्यांस पूर्णपणें लागू पडेल.

डारकर ह्यांसारखे विद्वन्मणी; डॉ. बोस् व मि.? गज्जर ह्यांसारखे शास्त्रविशारद, कै. केरूनाना छत्रे, व परांजपे ह्यांसारखे गणिती; व सर जमशेटजी, मि. टाटा ह्यांसारखे दानशूर निर्माण होत आहेत त्या लोकांस आपल्या भावी उत्कर्षाबद्दल निराश होण्याचें मुळींच कारण नाहीं.

आपलें हिंदु राष्ट्र ग्रीक, रोमन इत्यादि प्राचीन राष्ट्रांपेक्षां फार प्राचीन आहे. इतर जुन्या राष्ट्रांचा नायनाट होऊन हजारों वर्षे झालीं, तथापि आमचें राष्ट्र अद्यापि आपल्या भरज्वानींत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ऐहिक वैभवाचीं चिन्हें प्रस्तुतकाळीं एथे दिसत नाहींत म्हणून आमचें राष्ट्र निकृष्टावस्थेस पोंचलें आहे असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. समुद्रास ज्या वेळीं ओहोटी होते तेव्हां किनाऱ्यावर उभा राहून पहाणारास समुद्र आटल्यासारखा दिसतो. पण जो अंमळ पुढें जाऊन पाहील त्याला तो नेहमीं भरलेला दिसतो. ऐहिक वैभव आणि ऐहिक दारिद्य हीं समुद्राच्या भरतीओहोटीप्रमाणें एकामागून एक येतात आणि जातात. आत्मनिग्रह, शांति, दया, क्षमा, संतोष, सद्वर्तन आणि उद्यमशीलता, इत्यादिक दैवी संपत्ति जोंपर्यंत आपणांमध्यें वास करीत आहे, तोंपर्यंत आपण दरिद्री झालों किंवा निकृष्ट झालों असें म्हणण्याचें कारण नाहीं. ही संपत्ति आमच्यामध्यें असल्यावर ऐहिक संपत्ति कैक वेळां येईल आणि कैकवेळां जाईल. रोमन लोकांजवळ पुष्कळ ऐहिक संपत्ति होती. पण त्यांची दैवी संपत्ति नष्ट झाल्याबरोबर ते आपल्या वैभवासकट केव्हांच लयास गेले.

देशभक्ति म्हटली म्हणजे केवळ देशांतील भूमीची भक्ति नव्हे. आपल्या देशांत जें जें कांहीं चांगलें आहे त्याविषयीं आपणास प्रेम व योग्य अभिमान वाटला पाहिजे. आपला धर्म, आपले ग्रंथ, आपल्या प्राचीन व अर्वाचीन भाषा, आपले ग्रंथकार, कवि, मुत्सद्दी, आपला इतिहास, आपल्या चालीरीती, पोषाख, वगैरे गोष्टींबद्दल योग्य स्वाभिमान असला पाहिजे. आपल्या पूर्वजांनीं ईश्वरभक्तीकडे व परमार्थाकडे जितकें लक्ष पुरविलें आहे तितकें दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांतील लोकांनीं पुरविलें नसेल. ह्यामुळें, आमच्या इकडील धर्मविषयक ग्रंथांमध्यें आध्यात्मिक ज्ञानाचा अमोलिक संग्रह झालेला आहे. व तें ज्ञानामृत प्राशन करण्यास इतर राष्ट्रेंहि उत्कंठित होऊं लागलीं आहेत. अलीकडील पिढीच्या लोकांचें लक्ष ह्या ज्ञानभांडाराकडे लागलें आहे ही आनंदाची गोष्ट आहे. तथापि अजून त्यासंबंधानें बरीच उदासीनता आहे ह्यांत शंका नाहीं. धर्म हा नीतीचा व राष्ट्रोन्नतीचा पाया आहे हें इतिहाससिद्ध आहे. म्हणून आपल्या धर्माविषयीं जागृति ठेवणें हें प्रत्येक सुजाण मनुष्याचें कर्तव्य आहे.

आपल्या संस्कृत भाषेंत व मराठी भाषेंत मोठमोठ्या नामांकित कवींनीं काव्यें रचून आमच्या देशास मोठें भूषण करून ठेविलें आहे. तथापि सुशिक्षित लोकांमध्यें ज्ञानेश्वर व तुकाराम ह्यांसारख्या प्रासादिक कवींच्या कृतींचे भोक्ते किती थोडे आहेत ह्याचा विचार केला असतां अत्यंत खेद वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

आपल्या देशांत ज्या कांहीं वाईट गोष्टी असतील त्या

नाहींतशा करण्यासाठीं यथाशक्ति व योग्य मार्गानें प्रयत्न करणें हेंहि प्रत्येक देशभक्तानें काम आहे. तथापि वाईटाबरोबर चांगलेंहि न जाईल असा बंदोबस्त ठेविला पाहिजे. समाजाची सुधारणा लौकर होत नाहीं म्हणून अधीर होण्याचें कारण नाहीं. सर्व सुधारणा एका पिढींत व आपल्या डोळ्यांसमोर व्हाव्या अशी हांव धरणें हें योग्य नाहीं. सुधारणा घडवून आणण्यांत आपला पामरांचा कितीसा अंश असणार? परमेश्वरानें लक्ष मनुष्यजातीच्या कल्याणाकडे आहे हें ध्यानांत वागवून आपल्या हातून होईल तेवढी समाजसेवा निरपेक्ष व निरभिमान बुद्धीनें करणें हें आपलें काम आहे. पण त्या सेवेपासून लौकर फलनिष्पत्ति झाली नाहीं तरी आपल्या मनाची शांतता कायम ठेविली पाहिजे. समाजामध्यें एकाएकीं फेरफार होत नाहींत हें समाजाच्या चिरस्थायित्वाचें एक लक्षण आहे असें म्हटल्यास काय हरकत आहे?

परकीय राष्ट्रांपासून ग्रहण करण्यासारखे जे गुण असतील ते घेणें हें देशभक्तीच्या विरुद्ध नाहीं एवढेंच नाहीं, तर प्रत्येकाचें कर्तव्य आहे. पण ते गुण खरोखर घेण्यासारखे आहेत अशी प्रथम खातरी करून घेतली पाहिजे. दुसऱ्याचे दुर्गुण घेणें फार सोपें आहे; पण दुसऱ्याचे सद्गुण घेणें फार कठिण आहे. युरोपियन लोकांपासून आपल्या लोकांनीं घेण्यासारखे पुष्कळ गुण आहेत. त्यांची देशभक्ति, त्यांची एकी, त्यांचा नियमितपणा व टापटीप, त्यांचा दृढ निश्चय, दीर्घ उद्योग, पराक्रम, शौर्य इत्यादि अमोलिक गुण प्रत्येकानें अनुकरण करण्यासारखे आहेत.

देशहितापुढें स्वहित तुच्छ मानण्याचा तर त्यांना बाणाच आहे. हे गुण त्यांचा पेहेराव व खाण्यापिण्याच्या रीती उचलल्यानें कधींहि येणार नाहींत. आपण त्यांच्या पोषाखाचें अनुकरण करितों. पण त्यामुळें स्वकीयांच्या व परकीयांच्याहि दृष्टीनें तुच्छ ठरतों. स्वतःच्या राष्ट्रीय पोषाखाविषयीं युरोपियन लोकांमध्यें जो अभिमान आहे त्याचें आपण अनुकरण करीत नाहीं.

आपला पोषाख हिंदुस्थानच्या स्थितीस व हवेस योग्य असाच आहे. व तो थोड्या खर्चानें होत असून, आपल्या लोकांस चांगला शोभतो, तथापि त्यांत कालमानाप्रमाणें थोडाबहुत फेरफार होणें साहजिक आहे. पण तो फेरफार करतांना, आपल्या पोषाखाचें राष्ट्रीयत्व नष्ट होऊं देतां कामा नये.

इतर राष्ट्रांच्या पोषाखाप्रमाणेंच त्यांच्यामध्यें जे ऐषआरामाचे प्रकार आहेत त्यांचेंहि अनुकरण आपल्या देशांत होण्याची फार भीति आहे. हे प्रकार आपल्या समाजांत शिरूं नयेत म्हणून प्रत्येक देशभक्तानें दक्षता ठेविली पाहिजे. मादक पदार्थ सेवन करण्याची चाल युरोपियन लोकांमध्यें पूर्वीपासून आहे, व ती त्यांची त्यांनाच नकोशी झाली आहे, हें इकडील अनुकरणशील लोकांनीं ध्यानांत ठेवून अशा प्रकारची संवय आपणांस लागूं नये म्हणून फार जपलें पाहिजे.

आपल्या देशांतील लोकांची रहाणी फार साधी व मितव्ययाची आहे. तिच्या ऐवजीं युरोपियन तऱ्हेची रहाणी आणण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं फायदा नाहीं. मित-

व्ययी मनुष्यास उधळेपणाची संवय लागणें फार सोपें आहे. पण उधळ्या मनुष्यास मितव्ययाची संवय लागणें फार कठिण आहे, म्हणून पूर्वापार चालत आलेल्या आपल्या मितव्ययाच्या संवयी फार उपयुक्त आहेत हें जाणून त्या मोठ्या काळजीनें राखिल्या पाहिजेत.

( अभंगचरण )

आलिया वाटांचे न मोडावे माग ।

—एकनाथ

( अभंगचरण )

जाळू नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ।

—तुकाराम

आपला निर्वाह आपणांस फार थोड्या खर्चानें करितां येतो ही गोष्ट हल्लींच्या चढाओढीच्या काळीं आपणांस फार फायदेशीर आहे. ज्या राष्ट्रांतील लोक मितव्ययी आहेत त्या राष्ट्राची उन्नति केव्हां ना केव्हां आल्याशिवाय रहाणार नाहीं.

आपल्या देशांतील लोकांस अनेक प्रकारच्या विद्या व कला शिकण्याकरितां विलायतेस जाण्याचे अनेक वेळां प्रसंग येतील. अशा प्रसंगीं त्यांनीं पुराणप्रसिद्ध कचाचें उत्कृष्ट उदाहरण आपल्या डोळ्यांपुढें ठेवून त्याच्याप्रमाणें वागलें पाहिजे.

ईश्वरी संकेतानें आपला देश *महाराणी व्हिक्टोरिआ

* हा लेख लिहून गेल्यानंतर आपल्या दयाळु महाराणीसाहेबांचा अंत होऊन सर्व प्रजा शोकार्णवांत बुडाली आहे. महाराणी साहेबांचे ज्येष्ठ चिरंजीव एडवर्ड धि सेव्हंथ हे इंग्लंडचे राजे

ह्यांचे अमलाखालीं आहे. ह्याकरितां महाराणीसंबंधानें पूर्ण राजनिष्ठा मनांत वागविणें हें प्रत्येक हिंदुस्थानवासी मनुष्याचें कर्तव्य आहे. व नागरिक ह्या नात्यानें जे आपले हक्क आहेत, त्यांचें संरक्षण राजनिष्ठेस अनुसरून केलें पाहिजे. सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत प्रजेचीं गाऱ्हाणीं कळविण्याचे जे सर्वमान्य मार्ग आहेत त्याच मार्गांचें आपण अवलंबन केलें पाहिजे. महाराणीचें सर्व प्रजाजनांवर सारखें प्रेम आहे, हें सन १८५८ सालच्या जाहिरनाम्यावरून स्पष्ट दिसत आहे. त्या जाहिरनाम्यांत असें सांगितलें आहे:-

"आमची अशी आज्ञा आहे की, आमच्या रयत लोकांपैकीं जे कोणी विद्येनें, हुषारीनें, व प्रामाणिकपणानें जी जीं सरकारी कामें यथास्थित चालविण्यास लायक असतील तीं तीं कामें, सवड असेल त्याप्रमाणें बिनदिक्कत व निःपक्षपातानें त्या लोकांस ज्ञात किंवा धर्म मनांत न आणितां द्यावी.

आमच्या इतर सर्व रयतेविषयीं जे राजधर्म आह्मी अवश्य मानितों, तेच राजधर्म हिंदुस्थानांतील आमच्या मुलखांतील रयतेविषयीं आह्मांस पाळिले पाहिजेत असें आह्मी समजतों; आणि ईश्वराच्या कृपेनें ते सर्व वास्तविक रीतीनें व मनःपूर्वक पाळूं."

इंग्लिश लोकांचें व आपलें बंधुत्वाचें नातें आहे. ते व

(मागील पृष्ठावरून)

व हिंदुस्थानचे बादशाहा झाले आहेत. ते परमेश्वरकृपेनें चिरायु होऊन त्यांची कारकीर्द प्रजेस सुखकारक होवो अशी जगन्नियंत्यापाशीं प्रार्थना आहे.

आपण एकाच परमेश्वराचीं लेंकरें आहों. व एकाच महाराणीची प्रजा आहों. तेहि आर्यलोकांचे वंशज आहेत, व आपणहि आहों. ह्याकरितां त्यांच्या व आमच्यामध्यें परस्पर बंधुप्रेम असलें पाहिजे. अशाप्रकारचें प्रेम उभयतांच्या सुखास व एकंदर राज्याच्या उत्कर्षास अवश्य आहे.

हिंदु लोकांच्या पलटणी किती पराक्रमी आहेत ह्याबद्दल इंग्लिश सरदार नेहमीं धन्यवाद गातात. ह्या गोष्टीचा आपणांस अभिमान वाटला पाहिजे. ज्याप्रमाणें एतद्देशीय लोकांस पलटणींत शिपायाची नोकरी मिळते त्याचप्रमाणें लष्करांतील वरिष्ठ प्रतीच्या जागा मिळवून महाराणी सरकारची नोकरी करण्याचा आमचा हक्क आहे. व ह्या हक्काची अंमलबजावणी आज जरी होत नाहीं तरी कांहीं कालानें खास होईल अशी आह्मांस पूर्ण आशा आहे. काळा गोरा हा भेद नाहींसा होऊन राज्यांतील सर्व जबाबदारीच्या जागा केवळ गुणांकडे पाहून देण्यांत येतील असा दिवस केव्हां तरी खास येणार आहे. व तो जेव्हां येईल तेव्हां राज्याच्या इमारतीचा पाया अधिक बळकट होईल.

आपले पूर्वज लढाईंत विजय मिळवीत असत. हल्लींच्या काळीं तशा प्रकारचे जय मिळविण्याचें कारण उरलें नाहीं. पण शांततेच्या काळींहि विजय मिळविण्यासारखे आहेत; व ते लढाईतल्या विजयांपेक्षां श्रेष्ठ आहेत. माणसांवर मिळविलेल्या जयापेक्षां पंचमहाभूतांवर मिळविलेल्या जयाची योग्यता लाखोपट अधिक आहे. अलेक्झांडर, सीझर, नेपोलियन् ह्या महावीरांनीं प्रचंड युद्धें करून कोट्यवधि लोकांस जिंकिलें. पण त्यांच्या पराक्रमाचा

काय उपयोग झाला ? त्यापेक्षां बाष्परूपी अतुलबल राक्षसास जिंकणाऱ्या वॅटच्या पराक्रमाची योग्यता अधिक नव्हे काय ? अशा प्रकारचे विजय मिळविण्यास आह्मांस कोणाची आडकाठी नाहीं. अशा विजयांस लागणारें बुद्धिसामर्थ्य आमच्यामध्यें खास आहे. आमच्या देशाच्या उत्कर्षाचें एक मुख्य साधन म्हटलें म्हणजे आमच्या लोकांनीं शास्त्रीय शोधांकडे आपल्या बुद्धीचा बराच विनियोग करून आपल्या औद्योगिक स्थितीची सुधारणा करणें हा होय. ह्या दिशेनें मि० टाटासारख्या उदार महात्म्यांनीं प्रयत्न सुरू केले आहेत हें मोठें सुचिन्ह होय. या कामीं सरकारची योग्य मदत मिळेल अशी आशा आहे.

ह्या हिंदुस्थान देशांत अनेक जाती आहेत व त्यामुळें आमच्या देशाचा उत्कर्ष होण्यास अडचण आहे असें कदाचित् वाटण्याचा संभव आहे. पण जातिभेद फक्त जेवण्याखाण्यापुरता आहे; त्यापलीकडे तो मनांत वागवावयाचा नाहीं अशीच प्रवृत्ति लोकांत सुरू झाली आहे. व ती वाढत आहे असें स्पष्ट दिसतें. उदाहरणार्थ सरजमशेटजी, गोकुळदास तेजपाळ वगैरे श्रीमान् लोकांनीं लाखों रुपये खर्चून धर्मार्थ दवाखाने केवळ आपापल्या जातीच्या लोकांकरितांच नाहींत तर सर्व लोकांकरितां म्हणून स्थापन केले. मि० टाटा ह्यांनीं तीस लाख रुपयांची देणगी शास्त्रीय आणि औद्योगिक शिक्षणाकरितां दिली, ती हिंदुस्थानच्या सर्व लोकांच्या फायद्याकरितां म्हणून दिली आहे. अशीं शेंकडों उदाहरणें देतां येतील. सारांश जातिभेदाचा संबंध भलत्याभलत्या बाबतींत आणूं

नये अशा प्रकारचा कित्ता मोठ्या मोठ्या लोकांनीं घालून दिला आहे; तो सर्व लोकांनीं वळवून एकदिलानें देशहित करण्यास झटलें पाहिजे.

राज्यकर्ते कितीहि शहाणे आणि उदार असले तरी प्रजेनें आपलीं गाऱ्हाणीं योग्य रीतीनें त्यांच्या नजरेस आणून दिलीं पाहिजेत; व तसें करण्यासाठीं सर्व प्रजेन आपल्या प्रतिनिधींची एक सभा करणें जरूर असतें. इंग्लंडसारख्या देशांत देखील अशा प्रकारची 'पार्लमेंट नामक सभा' आहे. राजा आणि प्रजा ह्यांस एकमेकांचे हेतु समजून परस्परांमध्यें सलोखा रहाण्यास अशा प्रकारची सभा अवश्य असते. लोकांच्या हक्कांची पायमल्ली होऊं लागली किंवा लोकांवर बेताबाहेर कर बसूं लागला तर ती गोष्ट राजाचे नजरेस आणून तिचा प्रतिबंध करण्यास अशा प्रकारची सभा हें उत्तम साधन होय. प्रजा कितीहि काटकसरीनें राहणारी आणि उद्योगी असली तथापि सरकारचे कर, व राज्यांतील खर्च वगैरे बाबींवर प्रजेच्या तर्फे नजर ठेवणारी सभा नसल्यास, त्या बाबी अनावर वाढून प्रजेच्या द्रव्याचें शोषण व उद्योगधंद्यांची निकृष्टावस्था होण्याचा संभव असतो. प्रजा संतुष्ट आहे किंवा असंतुष्ट आहे हेंहि ह्या सभेच्या द्वारें राजास वेळींच कळून राज्यांत दंगेधोपे होण्याचीं कारणें रहात नाहींत.

राज्यरूपी महाशकटाचीं राजपक्ष आणि प्रजापक्ष हीं दोन मोठीं चक्रें आहेत. हीं दोन्ही सारखीं असलीं म्हणजे राज्यशकट सरळ मार्गानें जाऊन त्याची प्रगति होते. पण त्यांपैकीं एक चाक मोठें व दुसरें लहान, किंवा एक

चाक चालणारें व दुसरें स्थिर असलें तर तो शकट आपणाभोंवतींच गरगर फिरत राहील किंवा एकाद्या खड्ड्यांत पडून आदळेल.

हिंदुस्थान देशांत राष्ट्रीय सभेचा उदय होऊन आज चौदा वर्षें झालीं. ह्या सभेस हिंदुस्थानच्या प्रत्येक भागांतून लोकांचे प्रतिनिधि येतात. अशा प्रकारची सभा निर्माण झाली हें ह्या देशाच्या भावी उत्कर्षाचें अत्यंत मोठें सुचिन्ह व महाराणीच्या राज्याचें सर्वोत्कृष्ट भूषण आहे. कोणी असें म्हणतात कीं, राष्ट्रीय सभेपासून कांहीं फ़ायदा नाहीं. पण असें म्हणणाऱ्या लोकांची दृष्टि फार संकुचित आहे असें म्हटलें पाहिजे. राष्ट्रीय सभेला जशा प्रकारचें स्वरूप आलें पाहिजे तसें अद्यापि आलें नाहीं व तिच्याकडून जेवढें काम झालें पाहिजे तेवढें अद्यापि होत नाहीं, ही गोष्ट खरी आहे. परंतु एका मनुष्याची पूर्ण वाढ होण्यास जर पंचवीस वर्षें लागतात तर हिंदुस्थानासारख्या प्रचंड देशाच्या राष्ट्रीयसभेची वाढ होण्यास केवढा तरी काल लागला पाहिजे हें उघडच आहे. कांहीं सूक्ष्म जंतूंची वाढ एका दिवसांत होते पण त्यांचें आयुष्यहि त्याच बेताचें असतें. आंब्याचीं झाडें परसांतल्या पालेभाजीप्रमाणें लवकर वाढत नाहींत म्हणून तीं मुळींच लावूं नयेत असें कोणी म्हणेल काय? चौदा वर्षांत राष्ट्रीय सभेची जेवढी वृद्धि व्हावयाची व तिच्याकडून जेवढें काम व्हावयाचें तेवढें झालें आहे ह्यांत शंका नाहीं. ह्या सभेची माहिती सर्वांनीं करून घेऊन तिची वृद्धि होण्याकरितां प्रत्येकानें झटलें पाहिजे व द्रव्यः

द्वारा मदत केली पाहिजे. जगांत येऊन आपलें व आपल्या कुटुंबाचें पोषण केलें म्हणजे कृतकृत्यता झाली असें नाहीं. आपल्या देशाची उन्नति, व आपल्या देशबांधवांचें व भावी प्रजेचें कल्याण जेणेंकरून होईल अशा प्रकारचे प्रयत्न करणें हेंहि प्रत्येक मनुष्य म्हणविणाराचें अवश्य कर्तव्य आहे. व हें कर्तव्य जो करणार नाहीं त्याचें जिणें व्यर्थ होय. एका आधुनिक कवीनें म्हटलें आहे:—

( श्लोक )

मातेचे परि पोसुनी, अगणितें दुःखें महा सोसुनी ।
द्रव्यें त्या निरपेक्ष देउनि किती केला सुखी जाणुनी ॥
हा हा विस्मृति आर्यभूजननिची अंतीं जहाली जया ।
गेला जन्मुनि व्यर्थ तो नर खरा धिक्कार माझा तया ॥ १
माथाकूट अहर्निशीं करुनिया विद्या जरी लाधली ।
किंवा स्वोदरपूरणादिक कला कोणी किती साधली ॥
देशाचे हितकारणींच झटण्या आली न बुद्धी जया ।
गेला जन्मुनि व्यर्थ तो नर खरा धिक्कार माझा तया ॥ २
माझें हें घरदार वित्त मुलगे माझे सगे सोयरे ।
केलें म्यां अमकें करीन तमकें मत्कीर्ति देशीं फिरे ॥
“ माझा देश” असे न शब्द सुचती स्वप्नांत हा हा जया ।
गेला जन्मुनि व्यर्थ तो नर खरा धिक्कार माझा तया ॥ ३

( श्लोक )

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके।
जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेण ॥
इति महति विरोधे विद्यमाने समाने।
नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥ १

—वामन

**भावार्थः**—जो मनुष्य केवळ राजाचें हित पाहतो तो लोकांच्या द्वेषास पात्र होतो. जो केवळ प्रजेचेंच हित पाहतो त्याजवर राजाची इतराजी होते. असा हा दोन पक्षांचा विरोध लक्षांत आणून राजाचें व प्रजेचें हित साधणारा मनुष्य दुर्लभ होय.

# प्रकरण ११

## नागरिकांचें कर्तव्य

आपल्या देशाच्या व्यवस्थेमध्यें आपणांपैकीं प्रत्येकांचें थोडेंबहुत अंग आहेच. व त्यासंबंधानें आपणावर जी मोठी जबाबदारी आहे ती चांगल्या तऱ्हेनें पार पाडण्याची योग्यता आपण संपादिली पाहिजे. अशा प्रकारची योग्यता येण्यास मनुष्यांच्या अंगीं सद्बुद्धि तर असलीच पाहिजे, पण त्याशिवाय अभ्यास आणि विचार ह्यांची मदत पाहिजे. देशाची उन्नति कोणत्या रीतीनें होईल, व ती करण्याचे कामीं आपण कोणत्या प्रकारची मदत केली पाहिजे ह्याचा आपण नेहमीं विचार केला पाहिजे. देशाच्या राज्यकारभारांत आपला फारसा शिरकाव अद्यापि झालेला नाहीं. तथापि म्युनिसिपालिटींत व कायदेकौन्सिलांत सभासद निवडण्याचे हक्क आपणांस मिळाले आहेत त्यांचा शहाणपणानें उपयोग केला पाहिजे. स्थानिकस्वराज्याचा जो काय थोडाबहुत अधिकार मिळाला आहे तो चांगल्या रीतीनें बजावून अधिक हक्क मिळविण्याची आपली योग्यता सिद्ध करून दाखविली पाहिजे. देशाची सांपत्तिक आणि औद्योगिक स्थिति सुधारण्याचे उत्कृष्ट उपाय योजून ते सरकारच्या कानावर वजनदार रीतीनें घातले पाहिजेत. व सरकारच्या मदतीवांचून आपल्या स्वतःच्याच प्रयत्नानें जें कांहीं होण्यासारखें असेल तें मनापासून केलें पाहिजे. मागसलेल्या जनसमूहास योग्य शिक्षण देण्याची खटपट करून त्यांस

आपल्या बरोबरीला आणिलें पाहिजे. आपले हक्क काय आहेत, आपलें कर्तव्य काय आहे, हें जनसमूहांतील प्रत्येक व्यक्तीस कळलें पाहिजे. व तें कळण्यास शिक्षणाच्या प्रसाराशिवाय दुसरा मार्ग नाहीं. बहुजनसमाज जोंपर्यंत मागसलेल्या स्थितींत आहे तोंपर्यंत आमच्या उन्नतीसाठीं आह्मीं जे यत्न करूं त्यांस फारसें यश येण्याचा संभव नाहीं.

सर्व मनुष्यें सारखीं आहेत, व त्यांना सारखे हक्क असले पाहिजेत. काळे लोक असोत किंवा गोरे असोत ते सर्व परमेश्वराचीं लेंकरें असून त्यांचें परस्परांशीं बंधुत्वाचें नातें आहे. हें उदात्त तत्त्व इंग्लिश लोकांच्या मनांत वागत आहे. ह्या तत्त्वाची अंमलबजावणी जशी व्हावी तशी होत नाहीं, व त्या तत्त्वाविरुद्ध वर्तन करणारे लोक इंग्लंडांत आहेत, ही गोष्ट खरी आहे. तथापि वरील तत्त्व इंग्लिश लोकांपैकीं बहुतेकांच्या हाडामांसांत खिळलेलें आहे. व दिवसेंदिवस त्या तत्त्वाची प्रगतिच होत जाणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. इंग्रजी राज्यापासून आमची उन्नति खास होणार अशी जी आह्मांस आशा आहे ती ह्याच तत्त्वाच्या आधारावर. ह्याच तत्त्वाच्या प्रेरणेनें इंग्लिश लोकांनीं गुलामांचा व्यापार जगांतून नाहींसा केला. हिंदुस्थानच्या लोकांवर जुलूम केल्याबद्दल वारन हेस्तिंग्स् ह्याजवर पार्लमेंटापुढें खटला करण्यांत आला त्याचें तरी हेंच कारण. इंग्लिश लोकांनीं हिंदुस्थानांत उच्च प्रतीचें शिक्षण सुरू करून आपलें अमोलिक ज्ञानभांडार आह्मांस खुलें करून दिलें ह्याचें इंगित देखील हेंच होय. आपणां-

पैकीं ज्या लोकांनीं कोणत्याहि शास्त्रांत किंवा कलेंत नांव मिळविलें आहे असे डॉक्टर बोस्, कुमार रणजितसिंहजी, वगैरे लोक इंग्लंडांत गेले असतां त्यांचा इंग्लिश लोकांस मत्सर वाटत नाहीं, इतकेंच नाहीं तर ते त्यांचा मोठ्या उत्साहानें बहुमान करितात. ह्याकरितां आपण निरुत्साह न होतां आपली सुधारणा करून आपण अधिक हक्कांस पात्र आहों असें इंग्लिश जनसमाजाचे नजरेस आणून दिलें पाहिजे. म्हणजे कालेंकरून आपणांस इंग्लिशांबरोबर समान हक्क मिळाल्यावांचून रहाणार नाहींत.

हिंदु व इंग्लिश लोक हे प्राचीन काळीं एकाच आर्यशाखेपासून उत्पन्न झाले असा शोध लागला आहे. त्यांच्या भाषांमध्यें सारखेपणा आहे एवढेंच नाहीं तर कांहीं प्राचीन शब्द दोघांच्याहि भाषेंत अद्यापि राहिले आहेत. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील बहुतेक शहरांच्या नांवांच्या शेवटीं ‘ पुर ’ हा शब्द असतो. व तोच शब्द ‘ बरो ’ ह्या रूपानें इंग्लंडांतील शहरांच्या नांवांच्या शेवटीं आढळतो.

हिंदुस्थानची लोकसंख्या इंग्लंडच्या लोकसंख्येच्या दसपट आहे. अशा देशावर राज्य करण्याच्या कामीं इंग्लंडच्या लोकांवर फारच मोठी जबाबदारी आहे, ह्यांत शंका नाहीं. त्याचप्रमाणें इंग्लंडाचा पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांशीं निकट संबंध आहे. त्यामुळें कधीं कधीं असे बिकट प्रश्न उद्भवतात, व पुढेंहि उद्भवतील, कीं त्यांचा निर्णय करितांना उभय पक्षांनीं धोरण, मर्यादितपणा, व सहिष्णुता हे गुण उपयोगांत आणिले पाहिजेत. आपला

हेका केव्हां सोडून द्यावा. व निश्चयीपणा केव्हां दाखवावा हें मुत्सद्दी लोकांस चांगलें समजलें पाहिजे.

मनुष्य जातीच्या इतिहासावरून आपणांस असें कळून येतें कीं जगांत मोठमोठीं राज्यें उदयास येऊन शेवटीं धुळीस मिळालीं. इजिप्त. असिरिया, इराण, रोम, इत्यादि राज्यांचा उत्कर्ष होऊन नंतर त्यांचा नाश झाला. त्यानंतर अलीकडच्या काळीं जिनोवा, वेनिस वगैरे राज्यें हल्लींच्या युरोपियन राष्ट्रांप्रमाणेंच, जहाजें, वसाहती व व्यापार ह्यांच्या साधनानें बलाढ्य झालीं होतीं. पण तींहि फार वेळ टिकलीं नाहींत. प्रस्तुत काळच्या राष्ट्रांस त्यांच्या सारखा शेवट नको असेल तर त्यांनीं त्यांच्या चुका आपल्या हातून होऊं नयेत म्हणून फार जपलें पाहिजे. " एकादें राज्य स्थापन होण्यास हजार वर्षें देखील पुरत नाहींत. पण त्याचा नाश होण्यास एक घटकेचाहि अवकाश लागत नाहीं. "

परराष्ट्रांशीं व्यवहार करितांना त्यांच्याशीं सख्य ठेवणें, हें प्रत्येक राष्ट्राचें कर्तव्य आहे एवढेंच नाहीं तर तें हितावहहि आहे. राष्ट्रें एकमेकांस शत्रूप्रमाणें लेखितात ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. खरा विचार केला तर असें दिसून येईल कीं जर आपण सर्व मनुष्येंच आहों तर आपणांमध्यें सख्यच असलें पाहिजे. एका विद्वान् धर्मोपदेशकानें ही गोष्ट एका उत्कृष्ट दृष्टांताच्या योगानें स्पष्ट करून दाखविली आहे. तो म्हणतो:—" मी एकदां फिरावयास गेलों असतां समोरील टेंकडीवर एक राक्षसासारखी अक्राळ विक्राळ आकृति पाहिली. ती आकृति

जसजशी जवळ येत चालली तसतसा तो एक मनुष्यच आहे असें दिसूं लागलें. पुढें ती अगदींच जवळ आल्यावर पहातों तों माझा प्रत्यक्ष भाऊच आहे, असें मला कळलें."

इतर राष्ट्रांतील लोक मानवी प्राणीच आहेत, एवढें-च नाहीं तर ते आपले बंधु आहेत. त्यांचें व आमचें हिताहित हीं एकमेकांत गुरफटलेलीं आहेत. त्यांचा तोटा झाला तर त्याबरोबर आमचाहि होतो. ज्या गोष्टीनें त्यांचा फायदा होतो तिच्या योगानें आमचाहि होतो. इंग्लंड देशास अत्यंत हितावह गोष्ट म्हटली म्हणजे सर्व जगांत शांति आणि उत्कर्ष असावा ही होय.

कित्येक लोकांस लढाईची मोठी हौस वाटते, व लढाईच्या योगानें देशाचें महत्त्व आणि वैभव हीं वाढतात अशी त्यांची समजूत असते. परंतु तिच्या योगानें मनुष्यजातीस आजपर्यंत केवढें दुःख भोगावें लागलें आहे हें त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. लढाईमुळें जी हत्या होते, व जे अनर्थ होतात त्यांची कल्पना देखील भयानक आहे. म्हणून राष्ट्रांराष्ट्रांमधील तंट्यांचा निकाल पंचांमार्फत व्हावा हेंच योग्य आहे. हल्लीं ह्या तंट्यांचा निकाल लावण्याची जी रीत प्रचारांत आहे ती मनुष्यजातीस अत्यंत लाजिरवाणी आहे. रानटी लोकांनीं आपले तंटे मोडण्याकरितां शस्त्रांचा उपयोग केला तर त्यांना फारसा दोष देतां येणार नाहीं. पण सुधारलेल्या राष्ट्रांनीं तसें करणें हें नीतिविरुद्ध आहे एवढेंच नाहीं तर सारासारविचारासहि सोडून आहे. प्रस्तुत काळीं सगळ्या युरोपांत केवळ राज्यांतील शांततेच्या रक्षणार्थ ३९ लक्ष लष्करी लोक आहेत. व

परराष्ट्रांशीं लढाई करण्याचा प्रसंग येईल म्हणून एक कोटी मनुष्यांचें सैन्य आहे. आणि तेथील राज्यकर्त्यांचा संकल्प पुरा झाला म्हणजे दोन कोटी माणसें लष्करी खात्यांत गुंतणार आहेत. युरोपचा वार्षिक लष्करी खर्च बाह्यदर्शनीं फक्त २० कोटि पौंड आहे. पण खरोखर तो याहून किती तरी अधिक आहे. कारण युरोपच्या सैन्यांतील बहुतेक लोकांस पदरच्या भाकरी खाऊन सरकारच्या लष्करांत काम करावें लागतें. त्यांना जो खर्च लागतो तो वरील रकमेंत जमेस धरलेला नाहीं. वर सांगितलेले ३९ लक्ष लोक जर एकादा उपयुक्त धंदा करते, तर प्रत्येकानें दरवर्षास निदान ९० पौंड मिळविले असते असें मानलें तर वरील लष्करी खर्चाचे रकमेस आणखी १७½ कोटि पौंड मिळावे लागतील. म्हणजे युरोपांत दरवर्षी लष्कराप्रीत्यर्थ ३७½ कोटी पौंडांची रकम खर्च होते! आतां ह्या विषयाचा विचार करितांना पैशाखेरीज इतर महत्त्वाच्या पुष्कळ गोष्टी आहेत हें खरें आहे. तथापि पैसा उत्पन्न होण्यास मनुष्याचे श्रम आणि जीवित हीं खर्चीं पडतात, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. युरोपांतील लष्कराची व आरमाराची चालू व्यवस्था पाहिली असतां पुढें कांहीं तरी भयंकर परिणाम होणार आहेत असें भाकित मनांत आल्यावांचून रहात नाहीं. त्या व्यवस्थेपासून मोठें तुंबळ युद्ध माजेल असें जरी खातरीनें सांगतां आलें नाहीं, तथापि सरते शेवटीं दिवाळें वाजून नाश होणार अशी भीति बाळगण्यास पुष्कळ कारणें आहेत. युरोपांत असा प्रकार असल्यावर हिंदुस्थानांतहि तो नमुना आहे हें सांगावयास नकोच.

युरोपांतील मुख्य मुख्य देश अधिकाधिक कर्जबाजारी होत चालले आहेत. एकंदर जगांतील सर्व राज्यांच्या कर्जाची रकम सन १८७० सालीं ४ अब्ज पौंड होती. हाय हाय! केवढें जबरदस्त ओझें हें! पण तेंच कर्ज हल्लीं ६ अब्ज पौंडपर्यंत वाढलें आहे. व दिवसेंदिवस वाढतच आहे.

आतां वरील माहितीचा आमच्या हिंदुस्थानवासी नागरिकांस काय उपयोग आहे असा कदाचित् प्रश्न निघेल. पण आपण हिंदुस्थानचे नागरिक आहों तसे सर्व जगाचेहि आहोंच. म्हणून जगांत अशा महत्त्वाच्या बाबतींत काय प्रकार चालला आहे हें आपणांस ठाऊक असणें जरूर आहे. दुसरें असें कीं, युरोपांतील जी स्थिति वर वर्णिली आहे तिचा आमच्या देशावरहि परिणाम झाला आहे. म्हणजे हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नापैकीं लष्करी खात्याप्रीत्यर्थ अतोनात खर्च होत आहे.

देशादेशांमध्यें जो परस्परांविषयीं मत्सरभाव दिसून येतो, तोच दुर्दैवानें एकाच देशांतील निरनिराळ्या पक्षांमध्यें दिसून येतो. व त्यामुळें एकाच देशांतील लोकांमध्यें बेबनाव होतो. परंतु प्रत्येकानें असा विचार केला पाहिजे कीं, युक्तिवादाचें काम शिवीगाळीनें कधीं होत नसतें. व जो मनुष्य शिव्याचा उपयोग करितो त्याची बाजू लंगडी आहे असेंच सिद्ध होतें. ज्या दिवशीं पक्षांपक्षांमधील व राष्ट्रांराष्ट्रांमधील मत्सरभाव नाहींसा होऊन सर्व जगांत ऐक्य होईल तो सोन्याचा दिवस केव्हां उगवेल तो उगवो.

"नागरिक ह्या नात्यानें जें आपलें कर्तव्य आहे त उत्तम रीतीनें बजावितां येण्याकरितां आपण आपलें मन

फार काळजीनें सुसंस्कृत केलें पाहिजे; आपल्या अंगीं असणाऱ्या औदार्य, प्रामाणिकपणा इत्यादि गुणांचा पूर्ण विकास केला पाहिजे. आपल्या खासगी वर्तनांत जे रमणीय गुण दृष्टीस पडतात त्यांचा सार्वजनिक कृत्यांत उपयोग केला पाहिजे; म्हणजे देशभक्तीबरोबर आमची सुजनता कायम राहील. सार्वजनिक कारभारांत ज्यांचें अंग आहे त्यांच्या हातीं बरें-वाईट करण्याची बरीच सत्ता असते; व त्यांना कामाचा उरक असण्याची फार जरूर आहे. जो मनुष्य शत्रूला वश होतो तो व जो मनुष्य पहाऱ्यावर असतांना निजतो तो, हे दोघेहि कर्तव्यविमुखतेच्या दोषास सारखेच पात्र होतात." म्हणून प्रत्येक नागरिकानें आपल्या हक्कापेक्षां देखील आपल्या कर्तव्यास फार जपलें पाहिजे.

साक्रेटिसानें म्हटलें आहे कीं, एखादा धंदा कितीहि हलका असला तरी तो शिकून घेतल्याशिवाय कोणीहि मनुष्य पतकरीत नाहीं. पण सर्वांत कठिण असा जो राज्यकारभाराचा धंदा तो आपणास स्वभावतःच येतो असें प्रत्येकास वाटत असतें. साक्रेटिसाचें हें म्हणणें हल्लींच्या काळासहि लागू पडण्यासारखें आहे.

आपल्या समाजव्यवस्थेसंबंधी प्रत्येक नागरिकानें विचार करण्यासारखे पुष्कळ बिकट प्रश्न आहेत. त्यांचा उलगडा त्वरित होण्याची फार जरूर आहे. आपण आपल्या मुलांस शिक्षण देत असतों. परंतु आमच्या शिक्षणपद्धतीची किती तरी सुधारणा झाली पाहिजे! आपल्या देशांत शेंकडा ८० लोक उदरनिर्वाहासाठीं शेतकीवर अ-

वलंबून असतात त्यामुळें हा देश वारंवार दुष्काळाच्या जबड्यांत सांपडून लक्षावधि लोकांची प्राणहानि होते. ह्याकरितां लोकांस नवीन नवीन धंदे कोणत्या उपायांनीं मिळतील हा एक फारच महत्त्वाचा प्रश्न आहे. आपल्या देशांतील खेडीं व शहरें ह्यांमधील आरोग्यसंबंधी स्थिति फारच असमाधानकारक आहे. ही गोष्ट गेल्या पांच-चार वर्षांपासून फारच भयानक रीतीनें प्रत्ययास येत आहे. हवा व उजेड हे दोन पदार्थ परमेश्वरानें आपणांस मुबलक दिले असून आमच्या अज्ञानामुळें त्यांचा देखील आपणांस पूर्ण लाभ घेतां येत नाहीं. आरोग्यशास्त्राच्या मूलतत्त्वांची माहिती आमच्यापैकीं बहुतेकांस नसल्यामुळें किती लोकांस हाल भोगावे लागत आहेत बरें! शास्त्रीय ज्ञानाचा आह्मांस गंध देखील नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

हे समाजाच्या प्रगतीसंबंधाचे प्रश्न क्षणभर एकीकडे ठेविले, तरी समाज सुयंत्र चालण्यासाठीं बऱ्याच उद्योगांची जरूर आहे. म्युनिसिपालीटीच्या सभा, लोकलबोर्डाच्या सभा, कायदेकौन्सिलच्या बैठकी. देवस्थानांची व्यवस्था, ज्यूरी, राष्ट्रीयसभा, प्रांतिकसभा, वर्तमानपत्रें वगैरे बाबतींत ज्याला ज्याला काम करण्याचा प्रसंग येतो त्यानें फार लक्षपूर्वक व काळजीनें काम केलें पाहिजे.

गरीब लोकांची संख्या आपल्या देशांत फार आहे. त्यांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येक सुशिक्षित नागरिकाचें कर्तव्य आहे. गरिबांची स्थिति सुधारण्याकरितां केवळ पैशाचीच अवश्यकता आहे असें नाहीं. ज्यांच्याजवळ पैसा नाहीं अशांच्या हातूनहि गरिबांचें

कल्याण होण्यासारखें आहे. मिस् सिवेल ह्या प्रख्यात विदुषीला ह्या संबंधाचा पूर्ण अनुभव असल्यामुळें तिचें मत फार आदरास पात्र आहे. ती म्हणतेः—" आपले शेजारीपाजारी ज्या मानानें गरीब असतील त्या मानानें त्यांजकरितां खर्चाची लागणारी रक्कमहि कमीच असते." कारण त्यांचे सर्व व्यवहार फार थोड्या खर्चाचे असतात. गरीब लोकांचें कल्याण करण्याचे कामीं द्रव्यापेक्षांहि सुविचार आणि प्रेम ह्यांची अधिक जरूर आहे. एकाद्या मनुष्याजवळ द्रव्य आहे व त्याला परोपकाराची हौस आहे, परंतु त्याला अनुभव आणि शिक्षण हीं नसतील तर त्याचे हातून हितापेक्षां अहितच अधिक होण्याचा संभव आहे. कारण कोणतेंहि काम न केलें असतां जेवढें नुकसान होईल त्यापेक्षां तें वाईट रीतीनें केल्यानें अधिक नुकसान होतें.

गरिबांना पैसा देण्यापेक्षां त्यांच्या मनांत उत्साह आणि उमेद उत्पन्न करण्याची अधिक जरूर आहे. दुसऱ्याच्या संकटांचा भार आपण सोसणें हा परोपकाराचा उत्तम मार्ग नव्हे; तर जेणेंकरून त्यांना आपलें ओझें स्वतः उचलतां येईल व संकटांशीं शौर्यानें टक्कर देतां येईल अशा प्रकारचें धैर्य आणि स्वपराक्रम त्यांच्या अंगीं आणणें हीच सर्वांत उत्कृष्ट मदत होय. मनुष्याच्या मनांत केवळ सदिच्छा असली म्हणजे झालें नाहीं. तर बुद्धिसामर्थ्य व चातुर्य ह्यांचीहि फार अवश्यकता आहे. दुसऱ्यांची विपत्ति दूर करितांना त्यांचें स्वावलंबन नष्ट होऊं न देण्यासाठीं फार जपलें पाहिजे. परोप-

काराच्या कामीं प्रथमदर्शनीं येणारी एक अडचण नेहमीं असते ती अशी कीं. एकाद्याला कांहीं साहाय्य केलें असतां त्याचा कष्ट करण्याचा उत्साह व स्वातंत्र्यप्रियता हीं कमी होतात. जे लोक दुसऱ्यावर अवलंबून असतात त्यांचें जीवित केवळ बांडगुळासारखें होऊन जातें. म्हणून दुसऱ्याला मदत करावयाची ती होतां होईल तों अन्नदानाच्या रूपानें न करितां जेणेंकरून तो आपला चरितार्थ चालविण्यास समर्थ होईल अशा प्रकारानें करावी. आपण मनास असा प्रश्न करावा कीं, माझ्या मदतीपासून लोक आपली जबाबदारी विसरतील किंवा ओळंबू लागतील ! ह्या जगाची रचना अशी कांहीं विलक्षण आहे कीं आपणां सर्वांस आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांची थोडीबहुत तरी मदत घ्यावीच लागते. तथापि प्रत्येक मनुष्यानें होतां होईल तों स्वतःच्या कर्तबगारीनेंच निर्वाह चालवावा.

उन्नतावस्थेची आमची जी कल्पना असेल तीच इतर लोकांस मान्य होईल असें नाहीं. तथापि त्यांच्या कल्पनेपैकीं जो उत्तम भाग असेल तो तरी अमलांत आणण्याच्या कामीं त्यांस आपण मदत केली पाहिजे. आणि आत्मोन्नति करण्याविषयीं त्यांस उत्तेजन दिलें पाहिजे. उधळे लोक कधीं कधीं अव्यवस्थित रीतीनें दानधर्म करितात. त्यांच्याजवळ पैसा मुबलक असल्यामुळें त्यांना त्याची खातर वाटत नाहीं. पण लोकांकरितां अंग मोडून मेहनत करण्याचा प्रसंग आला असतां त्यांच्या हातून कांहीं होणार नाहीं. परोपकाराच्या कामीं झीज

सोसण्यांत जो आनंद आहे तसा स्वतःच्या कामांतहि होत नाहीं. परोपकारासाठीं एकाद्याचे जोडे जरी उचलले तरी त्या कृत्यास पवित्रता आणि महत्त्व येतें.

जें काम आपणास करावयाचें असेल तें कितीहि क्षुल्लक असलें तथापि त्यांत आपलें मन पूर्णपणें घालावें.

सर टामस् मोअर म्हणतोः—जो कार्यभार तुम्हीं आपल्या शिरावर घेतला असेल तो उत्तम रीतीनें पार पाडण्यास चुकूं नका. समाजांत रूढ झालेले दुर्गुण तुमच्या हातून नाहींसे झाले नाहींत म्हणून समाज सोडूं नका. जहाज वादळांत सांपडलें असतां वारा आपणांस आटपत नाहीं ह्या सबबीवर तें सोडून जातां येईल काय? तुमच्यामध्यें जेवढें चातुर्य आणि सामर्थ्य असेल तेवढें खर्चून समाजनौका सुरक्षित ठेवण्याचा यत्न करा. समाजांतील ज्या गोष्टींचा कांहीं चांगला उपयोग करितां येत नसेल त्यांपासून दुष्परिणाम तरी होऊं नये असा यत्न करा. कारण समाजामध्यें नेहमीं कांहीं तरी वाईट लोक असावयाचेच. व त्यांच्यामुळें समाजामध्यें कांहीं वाईट प्रकार असणारच. समाजांतील एकंदर लोक चांगले होतील असा दिवस केव्हां येईल तो येवो.

सर्व मनुष्यें जसजशीं आपलें कर्तव्य करूं लागतील तसतसा तो दिवस लवकर येईल. आपण सर्वांनीं प्रयत्न केला असतां आपण केवढे सुखी होऊं ह्याची कोणास कल्पना तरी आहे काय !

( श्लोक )

न होय, जरि हो म्हणू सकल वीर होवोनियां ।
पराक्रमबळें करूं चकित सर्व लोकत्रया ॥

करूं सुकृतिपूर्ण हें वय गमें सुखें साध्य तें।
उदारकीर्तिचे सदा समय हो उदात्तास ते ॥ १

—मेसन

आपण महाराणीच्या सार्वभौम राज्यांतील नागरिक आहों. ह्या राज्यांत जेवढें व्यक्तिस्वातंत्र्य आहे तेवढें दुसऱ्या थोड्याच राज्यांत असेल. ह्या राज्यांत कायद्याच्या दृष्टीनें सर्व लोक समान आहेत. प्रत्येक मनुष्य अपराधी असा शाबीत होईपर्यंत निरपराधी मानला जातो. एक वेळ एकाद्या मनुष्याचा इनसाफ झाल्यावर पुनः त्याच गुन्ह्यासंबंधानें त्याजवर काम चालवितां येत नाहीं. सर्व इनसाफाचें काम लोकांच्या नजरेसमोर चालतें. आरोपीला फिर्यादीच्या तोंडास तोंड देऊन भांडण्याचा अधिकार आहे. ज्याचा एकाद्या फिर्यादीच्या कामांत हितसंबंध आहे त्याला त्या फिर्यादीचा इनसाफ करितां येत नाहीं, व तो कितीहि मोठा असला तरी त्यानें इनसाफ मिळविण्याकरितां योग्य न्यायाधीशाकडेच गेलें पाहिजे.

आपल्या देशाकरितां हरतऱ्हेनें झटणें हें आपलें फार महत्त्वाचें कर्तव्य आहे. "जो मनुष्य संकटाच्या किंवा मरणाच्या भीतीनें आपल्या देशाची कामगिरी बजावीत नाहीं व स्वाभिमान सोडून देतो, तो जगण्यासच योग्य नाहीं; मरण हें अपरिहार्य आहे तर त्याची काय भीति बाळगावयाची आहे ? व सद्गुणी मनुष्य मरण पावला तरी तो कीर्तिरूपानें अमर होतो."

( श्लोक )

चलं वित्तं चलं चित्तं। चले जीवितयौवने॥

१ जिल्बर्ट

चलाचलमिदं सर्वं । कीर्तिर्यस्य स जीवति ॥ १
स जीवति यशो यस्य । कीर्तिर्यस्य स जीवति ॥
अयशोऽकीर्तिसंयुक्तो । जीवन्नपि मृतोपमः ॥ २

—सुभाषित

**भावार्थ:**—वित्त, चित्त, जीवित आणि यौवन हीं सर्व क्षणभंगुर आहेत. ज्याची कीर्ति होते त्याचेंच जीवित खरें होय. कीर्तिमान् मनुष्य देहावसानानंतरहि जिवंतच असतो. व ज्याला कीर्ति नाहीं तो जिवंत असून मेल्याप्रमाणेंच आहे.

आपल्या देशाची नोकरी बजाविण्यांत संकटाचा प्रसंग क्वचितच येतो, पण त्याकामीं आपल्या सुखाचा थोडासा त्याग व वेळेचा थोडासा व्यय करावा लागतो. सार्वजनिक कामें कधीं कधीं कांहींशीं कंटाळवाणीं देखील असतात. पण तीं करणें जरूर आहे.

म्युनिसिपालिटीचीं कामें, निवडणुकी, सभा, वगैरे सार्वजनिक कामें फारशीं रमणीय असतात असें नाहीं. त्यांत आवेश उत्पन्न करणारे किंवा मनास थक्क करून सोडण्यासारखे प्रसंग मुळींच नसतात. तथापि शांततेच्या प्रसंगीं मतदारानें दिलेलें एकादें मत लढाईत केलेल्या घावासारखेंच परिणामकारक असतें. फरक एवढाच कीं, त्यांत दंगाधोपा किंवा रक्तपात होत नाहीं. मत देणें हा आपला हक्क नव्हे, तर आपलें कर्तव्य आहे. व मत देण्याची पात्रता अंगीं आणणें हेंहि आपलें कर्तव्य आहे.

प्रत्येकानें देशाच्या कल्याणासाठीं कांहीं तरी मेहनत करणें जरूर आहे.

बेकन् म्हणतो, " आपली खासगी संपत्ति वाढविणें हा ह्या आयुष्यास साजण्यासारखा हेतु नाहीं. "

( श्लोक )

यस्य जीवन्ति धर्मेण । पुत्रामित्राणि बांधवाः ॥
सफलं जीवितं तस्य । नात्मार्थे कोहि जीवति ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः**—ज्याच्या धर्मानें पुत्र, मित्र, बांधव इत्यादिकांचें हित होतें त्याचेंच जीवित सफल होय. आपल्या हिताकरितांच जगणारे लोक थोडे आहेत काय ?

घरदार, अन्न, वस्त्र एवढ्या वस्तु मिळविल्या म्हणजे कृतार्थता झाली असें नाहीं. ह्या वस्तूंपेक्षांहि अधिक जरूरीच्या दुसऱ्या गोष्टी आहेत.

"निवळ स्वार्थाच्या दृष्टीनें जरी पाहिलें तरी देशाच्या कल्याणार्थ घालविलेला वेळ फुकट गेला असें म्हणतां येणार नाहीं. कारण शेजाऱ्यापाजाऱ्यांविषयीं प्रेमबुद्धि, सत्कार्य व परोपकार करण्याचा उत्साह, लोकांस कुमार्गांतून काढून सन्मार्गास लावण्याची इच्छा, मनुष्यजातीचें दुःख कमी करण्याची उत्कंठा, जगाच्या ज्ञानांत आणि सुखांत भर पाडण्याची हौस, इत्यादि समाजहिताच्या सद्वासनांपासून दुसऱ्याचें हित होतें एवढेंच नाहीं तर आपणांसहि सुख होतें.

ह्या जगांत कांहीं गोष्टी अशा आहेत कीं, त्यांमध्यें स्वाभाविकरीत्या आह्मांप्रमाणेंच इतर सर्व लोकांस वांटा मिळतो. उदाहरणार्थ, शांतता, सुबत्ता, स्वातंत्र्य, निरोगी हवा वगैरे. पण त्यांत कांहीं आह्मांस भूषण नाहीं. पण जर आमच्यामध्यें खरी भूतदया वास करीत असेल तर शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या सुखदुःखांचे आपण वांटेकरी झाल्यावांचून रहाणार नाहीं. आमच्या स्वार्थलंपटपणामुळें

आह्मांस आमच्या हिताशिवाय दुसरें कांहीं किंमत नाहीं. पण शेजाऱ्याविषयीं आमच्यांत प्रेमबुद्धि असेल तर त्याचें कल्याण तें आमचेंच कल्याण असें आपणांस वाटेल. परोपकारबुद्धि आमच्यामध्यें असेल तर ती आह्मांस आमच्या देशबांधवांच्या हितार्थ झटण्याची प्रेरणा करील."

तर मग मार्कस आरेलियस् म्हणतो त्याप्रमाणें, "तुमच्या हृदयांत जी देवता वास करीत आहे ती तुमचें सदा संरक्षण करो; तुम्हांस वीर्यवान् आणि दीर्घायुषी करो. तुमच्या राजकीय, सामाजिक व खाजगी वर्तनावर तिची देखरेख असो. तुम्हांस ईश्वरानें नेमून दिलेल्या अधिकारावर तुम्ही अशा तत्परतेनें रहा कीं, तुम्हांस परलोकींचें बोलावणें केव्हांहि आलें तरी उजळ माथ्यानें तिकडे जाण्याची तुमची तयारी असावी. त्यावेळीं तुमच्या सद्वर्तनाबद्दल काडीभरहि संशय राहील असें होऊं देऊं नका."

सार्वजनिक कामांत आपण जो वेळ घालवूं त्याबद्दल आपणांस एक चांगला मोबदला मिळतो, तो हा कीं, सत्कृत्य करण्यापासून होणारा आनंदानुभव घेण्यास आपण शिकतों. जेव्हां आपणांस विपत्तीचे प्रसंग येतात तेव्हां सार्वजनिक हिताशीं आपला संबंध असल्यास खाजगी दुःखाचा विसर पडतो.

कांहीं लोक दुसऱ्यांस त्रास देतात. व कांहीं लोक दुसऱ्यांकरितां आपण त्रास सोसतात. सर्व लोकांनीं मनावर घेतलें तर त्यांस धैर्य आणि देशभक्ति हे गुण संपादितां येतील. प्रत्येक मनुष्यास आपल्या देशबांधवांचें आरोग्य,

१ बिशप बटलर

सौख्य व नीतिमत्ता वाढविणाऱ्या संस्थांमध्यें कांहीं थोडें-बहुत तरी काम करितां येईल, आणि अशा प्रकारचीं कामें जे करतील त्यांसच खालील प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देतां येईलः—

( श्लोक )

तूं तारुण्यभरांत येउनि पुढें आयुष्यमध्याप्रती
येण्याच्या अवधींत सांग मनुजा सत्कार्य केलें किती ।।
सत्यान्वेषणकारणीं, सुमति वा आणावया दुर्जनीं ।।
ईशाच्या भजनीं, तसें जनसमूहाच्या सुखोत्पादनीं ।।

—व्हिटियर

( श्लोक )

सानंदं सदनं सुताश्च सुधियः कान्ता सुधाभाषिणी ।
सन्मित्रं सधनं स्वयोषिति रतिश्चाज्ञापराः सेवकाः ॥
आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिनं मिष्टान्नपानं गृहे ।
साधोः सङ्गमुपासते हि सततं धन्यो गृहस्थाश्रमः ॥ १

—सुभाषित

**भावार्थः**—घरामध्ये जिकडे तिकडे आनंद आहे, पुत्र बुद्धिमान् आहेत, कांता प्रियभाषिणी आहे, मित्र सधन आणि सुस्वभावी आहेत, स्वस्त्रीच्याविषयीं प्रेम आहे, सेवक आज्ञा मानण्याविषयीं तत्पर आहेत, अतिथींचा योग्य सत्कार आहे, परमेश्वराचें पूजन होत आहे, खाण्यापिण्याचा उत्तम बेत आहे, साधूंचा सहवास नेहमीं घडत आहे, अशा प्रकारचा जो गृहस्थाश्रम त्याची थोरवी काय सांगावी ?

# प्रकरण १२

## सामाजिक वर्तन

गृह कशाला म्हणावें ? जेथे प्रेम सहानुभूति, व विश्राम हीं मूर्तिमंत वास करितात; जेथे बालपणांत घडलेले मनोहर प्रसंग डोळ्यांपुढें उभे राहतात; जेथे पितृवात्सल्य, मातृवात्सल्य, भगिनीप्रेम, व बंधुप्रेम ह्यांचा अनुभव येतो; जेथे एकास सुख झालें तर सर्वांस सुख होतें व एकास दुःख झालें तर सर्वांस दुःख होतें, जेथे सर्वांचे मनोरथ व हेतु एकच असतात त्यालाच गृह म्हणावें. ज्या सदनांत प्रेम नाहीं त्याला पाहिजे तर किल्ला म्हणा, किंवा राजवाडा म्हणा, पण गृह ही संज्ञा त्याला देतां येणार नाहीं. ज्या गृहांत प्रेम नाहीं तें मृतशरीराप्रमाणेंच होय.

( अभंगचरण )

शृंगारिलें मढें । जीवेंवीण जैसे कुडें ॥

—तुकाराम

( श्लोक )

संतोषामृततृप्तानां । यत्सुखं शान्तचेतसाम ॥
कुतस्तद्धनलुब्धानामितश्चेतश्च धावताम् ॥ १
अकृत्वा परसंतापमगत्वा खलनम्रताम् ॥
अनुत्सृज्य सतां वर्त्म । यत्स्वल्पमपि तद्बहु ॥ २
अकिंचनस्य दान्तस्य । शान्तस्य समचेतसः ॥
सदासंतुष्टमनसः । सर्वाः सुखमया दिशः ॥ ३
आत्माधीनशरीराणां । स्वपतां निद्रया स्वया ॥
कदन्नमपि मर्त्यानाममृतत्वाय कल्पते ॥ ४

—सुभाषित

**भावार्थ:**—संतोषामृत पिऊन तृप्त झालेल्या शांत मनुष्यास

जें सुख-मिळतें तें धनलोभानें ज्यांची नेहमी तारांबळ उडत असते त्यांना कोठून प्राप्त होणार? (२) दुसऱ्यास संताप दिल्यावांचून, दुष्टाची खुशामत केल्यावांचून, व सज्जनांचा मार्ग सोडिल्यावांचून जें मिळेल, तें थोडें असलें तरी फारच आहे असें समजावें. (३) आत्मसंयमी, शांतचित्त, आणि संतुष्ट अशा मनुष्याजवळ द्रव्य नसतांहि त्याला सर्व दिशा सुखमय होतात. (४) ज्यांनीं आपलें शरीर स्वाधीन ठेविलें आहे, व ज्यांना सुखानें झोंप येते, त्यांना साधें अन्न देखील अमृताप्रमाणें मधुर लागतें.

गृहाचा मुख्य उपयोग हा आहे कीं, त्याच्या योगानें संसारांतील चिंतांचा विसर पडतो. भवसागरांतून मार्गक्रमण करीत असतां वाऱ्यावादळाचे प्रसंग वारंवार यावयाचेच. अशा प्रसंगीं निवाऱ्याचें बंदर गृहाशिवाय दुसरें नाहीं.

जगांत ज्यांना आपण यशस्वी म्हणतों त्यांना देखील कठिण प्रसंग येतात. आणि केवळ धनधान्यसमृद्धि असली म्हणजे सुख आणि शांति हीं निश्चयानें प्राप्त होतात अशी थोडीच गोष्ट आहे.

ईश्वरानें मनुष्यप्राणी निर्माण केला त्याचा हेतु त्यानें एकटें रहावें असा नाहीं.

मनुष्याच्या अंतःकरणास गृहाचा ओढा असणें जरूर आहे. पण गृहाबाहेर कांहीं तरी काम करण्यास असावें हेंहि हितकर आहे. मनुष्यानें आपला सर्वच काळ मंडळींत घालविणें ठीक नाहीं. तसेंच तो सर्वच एकांतांत बसून घालविणें हेंहि योग्य नाहीं. मंडळी व एकांत ह्या दोन्ही गोष्टी हितकर आहेत इतकेंच नाहीं, तर अवश्य आहेत.

(श्लोक)

न लोकांच्या संघीं नच तिथुनि वा दूर बहुसें ।

अशा मध्यस्थानीं मम अभिमतोद्यान विलसे ॥
विवाहाचीं वाद्यें मृतविधिक घंटारवहि तो ।
सघोषा पूराची मज विविध वार्ता कळवितो ॥ १
बसोनी वल्लींच्या हरिततर पर्णी वत इथे ।
घड्याळाचा घंटारवन पवननीत श्रुतिपथीं ॥
पडे माझ्या देवालय-शिखर-भागांत निघतां ।
जरी मध्यें आहे बहु वितत भूमि तृणयुता ॥ २
तिच्या पृष्ठीं वाहे अचपळगती एक सरिता ।
वरी नौका जाती, कमळतति डोले प्लवहता ॥
नदी जातां ऐशी प्रभु-भजन-देवालय-शिखा ।
सनाथा सेतूतें बहु गमतसे ईक्षणसुखा ॥ ३ *

सृष्टींतील सौंदर्य सर्वकाळीं आनंददायक असतें. पण ज्याचें मन प्रसन्न नाहीं, त्याला सृष्टीचें प्रसन्नस्वरूप काय होय ?

आपल्या कुटुंबांतील मनुष्यांविषयीं आपल्या मनांत प्रेम आणि आदर असला पाहिजे. कुटुंब हाच देशोन्नतीचा खरा पाया आहे. सर्व उत्तम गुण शिकण्याची ती शाळाच आहे. कुटुंबामध्येंच आपल्या उदात्त मनोवृत्तींचा विकास होण्याचीं उत्कृष्ट साधनें असतात. त्यांचा उपयोग केला असतां मनुष्यास देवदूतांची योग्यता प्राप्त होईल. कारण देवदूत झाले तरी दुसऱ्यांना सुखी करण्यापेक्षां अधिक काय करितात ?

तुमचें गृह साधें, ओंगळ, रुक्ष असें जरी असलें तरी तें तुमचें आहे, आणि तुमच्या कर्तव्याचें स्थान आहे, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. तुमचें कर्तव्य करण्यांत जेवढ्या

* टेनिसनचें काव्य " मालाकार सुता "

अडचणी येतील त्या मानानेंच तें कर्तव्य पार पडल्यावर सुख होणार आहे.

कटकट व अन्याय शांतपणें सहन करणें हें बिकट श्रमापेक्षांहि कठिण आहे. अशा सोशिकपणांत जो स्वार्थ-त्याग आहे त्याची योग्यता द्रव्याच्या, वेळेच्या, किंवा श्र-माच्या स्वार्थत्यागास येणार नाही.

दुसऱ्यास जाणून बुजून दुःखी करणारे लोक फारच थोडे असतील. व जे असतील ते बहुधा हें पुस्तक वाच-णार नाहीतच. पण एकंदरीत दुष्टपणापेक्षां विचार आणि धोरण ह्यांच्या अभावामुळें पुष्कळ लोक दुसऱ्याच्या दुः-खास कारण होतात. कोणीहि आला असतां प्रसन्नमुखानें व गोड शब्दांनीं त्याचा आदरसत्कार करावा. जे आपणांस प्रिय आहेत त्यांच्याविषयी केवळ आपल्या मनांत प्रीति असली म्हणजे झालें नाही; तशी प्रीति असल्याचें त्याचे नजरेस आणलें पाहिजे. ज्यांच्याविषयी आपणांस अत्यंत प्रीति वाटते, व ज्यांना साहाय्य करण्याची आपणांस उत्कट इच्छा असते अशा माणसांस देखील आपण तार-तम्याच्या अभावामुळें दुखवितों.

थोड्याशा उत्तेजनपर शब्दांनी मनुष्यास किती उमेद चढते, व मदत झाल्यासारखी वाटते ह्याचा आपणां स-र्वांस अनुभव आहे.

लार्ड चेस्टरफील्ड म्हणतोः— " प्रीति कशी करावी व द्वेष कसा करावा हें फार थोड्या लोकांस कळतें. बहु-तेक लोकांची अशी स्थिति असते कीं, ते ज्यांच्यावर आ-

पल्यामतें प्रीति म्हणून करावयास जातात, त्यांचे ते फाजील लाड करितात, व त्यांच्या दोषाकडे डोळेझांक करितात, व अशा प्रकारच्या प्रीतीनें तें त्यांस अपायच करितात. ते जेव्हां द्वेष करितात तेव्हां त्यांच्या द्वेषापासून दुसऱ्याचें कांहीं वांकडें होत नाहीं, पण त्यांच्या अप्रासंगिक क्रोधामुळें व चिडखोरपणामुळें त्यांना स्वतःला मात्र अपाय होतो. "

मित्रामित्रांमध्यें देखील एकप्रकारचा आडपडदा र-हातो. " आमचीं शरीरें हीं जणूं काय बेटें आहेत, हाडें हे कठडे आहेत, व त्वचा हा पडदा आहे. अशा बेटांत आह्मी कोंडलेले असल्यामुळें आह्मांस एकमेकांची पूर्ण माहिती होत नाहीं. "

आमच्या मित्रांचें किंवा आमच्या नातेवाईकांचें खरें हृद्गत आपणांस क्वचितच कळतें. एकाच कुटुंबांतील माणसांस देखील परस्परांचे स्वभाव कळत नाहींत असें पुष्कळ वेळां घडतें. त्यांचीं मनें जणूं काय समांतर मार्गांनीं जातात, व म्हणून त्यांचें कधींहि संमीलन होत नाहीं. " आमच्या अत्यंत प्रियकर आप्तांसहि आमच्या हर्षविषादाचीं सर्व कारणें कळत नाहींत. "

आह्मीं एकत्र जमलों म्हणजे हवा, पीकपाणी, नवीन पुस्तकें, राजकीय विषय, आमच्या शेजाऱ्यांचे गुणदोष, इत्यादि गोष्टींसंबंधानें संभाषण करितों. परंतु आमच्या मनांतील खऱ्या हृद्गताविषयीं आपण चकारशब्द काढीत नाहीं. ज्या गोष्टींना कांहींच महत्त्व नाहीं अशाच गोष्टी फार बोलण्यांत येतात. व जे लोक फार बोलतांना दृष्टी-

१ रिक्टर

स पडतात त्यांना खरोखर थोडाच मजकूर सांगावयाचा असतो.

संभाषण ही एक कलाच आहे ही गोष्ट फार थोड्या लोकांस समजते. कुटुंबामध्यें खरें ऐक्य व खरी सहानुभूति जर पाहिजे असेल तर नुसतें प्रेम व सद्बुद्धि असून भागत नाहीं; तर एकमेकांच्या कल्पना समजून घेण्याची व देण्याची शक्ति पाहिजे. जर दुसऱ्याकडून आपलें मनोरंजन होत नसेल तर आपण त्याचें मन रिझविण्याचा यत्न करावा.

पुष्कळ लोकांच्या बोलण्यांत ' उचलली जीभ आणि लावली टाळ्याला ' असा प्रकार असतो. बोलण्यामध्यें खरेपणा व निष्कपटपणा असावा हें खरें आहे. पण इतर गोष्टींप्रमाणेंच संभाषणांतहि तारतम्याची जरूर आहे. संभाषण चित्तवेधक व्हावें अशी इच्छा असेल तर त्यासाठीं कांहीं तरी यत्न केला पाहिजे. "

आपलें गृह सुखमय करण्याचें आपणा सर्वांस साध्य आहे.

गरीब लोकांस यथेच्छ धन देऊन श्रीमंत करणें, किंवा रोगग्रस्त लोकांस आरोग्यसंपन्न करणें ह्या गोष्टी आमच्या नशिबीं नाहींत. पण लोकांवर प्रेम करणें, त्यांचा समाचार घेणें, त्यांचें समाधान करणें, ह्या गोष्टी देवानें सर्वांस साध्य करून ठेविल्या आहेत. ह्या गोष्टी करण्यांत कोणाची खुशामत करण्याची जरूर नाहीं, व त्यांत जें पुण्य आहे तसें दुसऱ्या कशांतहि नाहीं.

चिडखोर मनुष्य लोकांस त्रास देतो त्यापेक्षां स्वतःस.

जास्त त्रास करून घेतो. त्याला कधीहि संतोष होत नाहीं. त्यामुळें त्याला सुखाचा लवलेशहि मिळत नाहीं. तथापि त्याच्यापासून लोकांसहि बराच त्रास होतो. आपल्या सभोंवतालच्या लोकांस सुख देण्यास फारसा स्वार्थत्याग लागतो असें नाहीं. पण केवळ मनांत सद्धेतु असून कांहीं उपयोग होत नाहीं; तर अभ्यास आणि सारासारविचार ह्यांचीहि मदत पाहिजे. कोणतीहि गोष्ट अभ्यासावांचून चांगली करितां येणार नाहीं.

प्रेमयुक्त व कळकळीच्या वर्तनापासून मोठमोठे सुपरिणाम होतात. " चांगल्या रीतिभातींनीं मनुष्यास मनुष्यत्व येतें " अशी एक जुनी इंग्रजी म्हण आहे. आणि खरोखरच चांगल्या रीतीभातींनीं कैक लोक भाग्यास चढले आहेत, व वाईट रीतिभातींनीं कैक लोकांच्या जन्माचें मातेरें झालें आहे. जेव्हां एकादा मुख्य प्रधान आपल्या मंत्रिमंडळासाठी माणसें निवडतो तेव्हां त्यांच्या अंगीं शहाणपणा, वक्तृत्व, कर्तृत्व, सद्वर्तन, इत्यादि गुणांशिवाय आणखी चांगल्या रीतीभाती आहेत किंवा नाहींत, व लोकांशीं गोडीगुलाबीनें त्यांना वागतां येतें किंवा नाहीं हेंहि तो पहात असतो.

आडदांडपणा हा निश्चयी स्वभावाचा सूचक आहे असें कोणास वाटत असेल तर ती चूक आहे; इतकेंच नव्हे, तर अनेक प्रसंगीं तो मानसिक दुर्बलता झांकण्याचें एक साधन बनून राहतो. शेक्सपियरनें मार्क अँटोनी याच्या तोंडानें ब्रूट्स ह्याच्या गुणांचें वर्णन करितांना असें वदविलें आहे:—

( ओंवी )

पंचतत्त्वांच्या अपूर्व मिश्रणें । निर्मिला तो नरवीर विधीनें ॥
जयाचें सौजन्य पाहूनि सन्मानें । विश्वही मान डोलवी ॥ १

—शेक्सपिअर

दुसऱ्याचे दोष काढण्याची जरूर पडते, तेव्हां फार ममतेनें बोलावें. विशेषेंकरून मुलांना फार कोमल शब्दांनींच ताडन केलें पाहिजे. कारण मोठ्या माणसांपेक्षां लहान मुलांच्या मनास कठोर शब्दांपासून फार धक्का बसतो. प्रसिद्ध चितारी रूबन्स् ह्याची अशी गोष्ट सांगतात कीं, कलमाच्या एका झटक्यासरशीं तो तसबिरींतील बालकाचें हास्यमुख रडकें करून टाकीत असे, व रडकें तोंड हांसरें करीत असे. व्यवहारांत आपणां सर्वांस असें करितां येतें; व तें काम एका शब्दानें होण्यासारखें आहे.

मृदु शब्दांनीं भाषण करावें. तें अल्प जरी असलें तरी तें अंतःकरणाच्या खोल प्रदेशापर्यंत पोंचून कालान्तरानें चांगल्या फळास येतें.

कोणाला दोष द्यावयाचा असला तर तो खासगी रीतीनें द्यावा, व शाबासकी द्यावयाची असेल तर प्रसिद्धपणें द्यावी. खासगी रीतीनें कोणाचे दोष दाखविल्यास त्याला त्याबद्दल वैषम्य वाटत नाहीं. व आपल्या कल्याणासाठीं ते दाखविले असें तो समजतो. व त्यामुळें तो आपलें वर्तन सुधारण्याचा यत्न करितो. तसेंच, शाबासकी प्रसिद्धपणें दिल्यापासून मनुष्यास अधिक उत्तेजन येतें. व आपल्या श्रमांचा योग्य मोबदला मिळाला असें वाटतें.

दोष देण्याचा प्रसंग आला असतां तें काम फार गं-

धीरपणानें करावें व आपली दिलगिरी दाखवावी; आणि होतां होईल तों संतापल्यासारखें कधीं दाखवूं नये. आर्किटस् हा एका प्रसंगीं आपल्या गुलामास म्हणाला, " मला जर राग आला नसता तर मीं तुला शिक्षा केली असती. " जर आपणांस राग आला तर कांहीं वेळ थांबून व विचार करून मग तोंडावाटे शब्द काढावे. म्याथ्यू आर्नोल्ड ह्यानें उत्तम शिक्षणाचीं चिन्हें सांगितलीं आहेत तीं अशीं कीं, " अंगीं निस्सीम क्षमाशीलता असावी; आजूबाजूंच्या गोष्टींचा विचार करावा. मनुष्याच्या कृत्यांची योग्यायोग्यता ठरविण्यांत कडकपणा असावा. पण मनुष्यांस दोष देण्यांत सदयता असावी. "

मृत्यूच्या योगानें लहान थोर हा भेद लवकरच नष्ट होणार आहे. ही गोष्ट ध्यानांत आणून प्रत्येकाशीं सभ्यपणाची वर्तणूक ठेवावी.

मित्राशीं भाषण करितांना एकादे वेळीं रागांत आलां तर त्याच्याशीं समेट केल्याशिवाय त्याच्यापासून जाऊं नका. कारण तीच तुमची शेवटची भेट होणार नाहीं असा काय नियम आहे ?

कांहीं शब्द सूर्यकिरणासारखे आनंददायक असतात; व कांहीं शब्द शल्ययुक्त बाणासारखे किंवा सर्पाच्या दंशासारखे असतात. कठोर शब्दांनीं काळजास घरे पडतात. आणि मृदु शब्दांनीं अप्रतिम सौख्य होतें.

" चांगल्या शब्दांस कांहीं पैसे पडत नाहींत असें असून त्यांची किंमत फार मोठी आहे. "

" सहज सोडलेले बाण अनेक वेळां धनुर्धराच्या

ष्यानी मनींहि नाहींत अशा ठिकाणीं जाऊन लागतात. त्याचप्रमाणें सहज बोललेले शब्द एकाद्याच्या दुःखित मनाचें सांत्वन करितात किंवा त्यास अधिक दुखवितात.'

कधी कधी शब्दांचें कार्य बोलल्यावांचून होतें. जीअस ह्याच्याशी स्नेहसंबंध ठेवणाऱ्या लोकांवर रोमन त्यासमसंत खटले चालले होते. तेव्हां पीटर नामक एका स्नेह्यानं जोझसची व माझी ओळख देखील नाही असा जबाब दिला. तेव्हा जीझसनें त्याच्याकडे नुसतें अवलोकन केलें. त्या तिरस्कारयुक्त मुद्रेनें पीटरच्या मनावर परिणाम झाला; व तो बाहेर जाऊन धाय मोकलून रडला.

एका दृष्टिपातानें जशा दुःसह वेदना होऊं शकतात त्याचप्रमाणें सस्नेहनें एक वेळ पाहिलें असतां हृदयांत आनंदाच्या लहरी येतात. फार दिवसांच्या वियोगानंतर आपण परत आल्यावर आपणांस आपले आप्त प्रेमानें भेटावयाचेच अशी आपली खात्री असते; व त्या सुखसोहळ्यासंबंधानें आपणांस केवढी उत्कंठा असते बरें! आणि परत आल्यानंतर सर्वांच्या गांठी पडल्या म्हणजे तो दिवस किती आनंदानें जातो!

फार संकोचवृत्ति ठेवूं नये. आपली ममता प्रदर्शित करण्यास लाजूं नये. बाहेरून जर तुम्ही निष्ठुर दिसत असलां तर तुमच्या मनांत कितीहि प्रेम असलें तरी त्याचा कांही उपयोग नाही. म्हणून स्वभावांत मार्दव, प्रेमळपणा आणि कळकळ ही असावी. मनुष्यांस सहानुभूतीपासून जसें साहाय्य होतें तसें प्रत्यक्ष कार्य केल्या-

1 ल्यांगफोर्ड

पासूनहि होत नाहीं. प्रेमाची योग्यता द्रव्याहून अधिक आहे. एका प्रेमळ शब्दानें जें सौख्य होईल तें देणगी पासूनहि होणार नाहीं.

बेंजामिन् वेस्ट ह्याला एकानें विचारिलें कीं, तुम्हीं चित्रकार कशानें झाला? तो म्हणाला. "माझ्या आईनें घेतलेल्या चुंबनाच्या योगानें." कान्फ्युशियस म्हणतो. "गृहांतील कर्तव्यें नीट बजाविलीं असतां यज्ञयागादिक देखील करण्याची जरूर नाहीं."

मित्रांची निवड फार काळजीनें करावी. कारण आपल्या जीविताचा आमच्या मित्रांच्या जीवितांशीं फार निकट संबंध आहे. जार्ज हर्बर्ट म्हणतो. "नेहमीं चांगल्या लोकांच्या मंडळींत वागावें. म्हणजे तुम्हांस त्यांचे गुण लागून तुम्हीं त्यांपैकींच एक व्हाल." स्प्यानिश भाषेत अशी एक म्हण आहे कीं. "तुमचा कोणाशीं सहवास आहे तें सांगा, म्हणजे तुम्ही कशा प्रकारचे आहां हें मी सांगेन." ज्या मनुष्यास आपलें कल्याण समजत नाहीं तो दुसऱ्याचा मित्र झाला तर त्याचेंहि नुकसानच करील.

( ओंवी )

लाधल्या सन्मित्रसंगती । सर्व आनंद दुणावती ।।
हिरा विभागे विपत्ति । थोर महिमा मैत्रीचा ।।

—डेन्हाम

( श्लोकचरण )

तन्मित्रमापदि सुखे च समक्रियं यत् ।

म्हणजे सुखाच्या आणि दुःखाच्या प्रसंगीं जो सारखा उपयोगीं पडतो तोच खरा मित्र.

स्त्रियांशीं मैत्री करितांनाहि योग्य सावधगिरी ठेविली पाहिजे. वंचक स्त्रियांच्या स्नेहानें प्राचीन काळापासून केक लोकांचा नाश झाला आहे.

( आर्या )

पात्रमपात्रं कुरुते, दहति गुणं स्नेहमाशु नाशयति ॥
अमले मलं नियच्छति दीपज्वालेव खलमैत्री ॥ १

भावार्थः – दुर्जनाची संगति ही दिव्याच्या ज्योतीप्रमाणे पात्र ( योग्य किंवा भांडे ) मनुष्यास अपात्र करिते, गुण ( दोरी अर्थात वात ) दग्ध करिते, स्नेहाचा ( तेलाचा ) नाश करिते, स्वच्छ वस्तूच्या ठिकाणीं मल ( काजळ ) टाकिते.

(श्लोक)

अहो दुर्जनसंसर्गान्मानहानिः पदे पदे ॥
पावको लोहसङ्गेन । मुद्गरैरभिहन्यते ॥ २

—सुभाषित

भावार्थः—दुर्जनाच्या संगतीपासून पावलोपावली मानहानि होते ती काय सांगावी ! अग्नीला देखील लोखंडाच्या संगतीमुळे लोहाराच्या घणाचा मार सोसावा लागतो.

( ओंवी )

दैव जयावरी पूर्ण कोपले । जयाते स्वकीय कोणी नुरले ॥
तन्मनाशींहि मन मिळे । एकाचे तरी ह्या जगीं ॥ १

—लांगफेलो

केबल् म्हणतोः " आमचे आत्मे आपआपल्या आनंदाच्या किंवा दुःखाच्या अदृश्य गोलांवर एखाद्या फटिंगाप्रमाणें राहून आपआपल्या कक्षांतून एकटेच फिरतात. आमच्या मनाची जशी स्थिति असेल त्याप्रमाणें जग आह्मांस उदास किंवा प्रसन्न दिसतें. "

तथापि वरील उद्दाम वचनाप्रमाणें आपणां सर्वांस एकलकोंड्यासारखें राहाण्याची जरूर आहे असें आह्मास वाटत नाहीं. मात्र केव्हां केव्हां एकांतीं बसून विचार करणें हें हितकर आहे. आपण नेहमींच मंडळींत राहिलों तर मंडळीविषयीं आपलें प्रेम सारखें राहणार नाहीं.

कधीं कधीं दुसऱ्यानें आपल्या अन्याय केला आहे असा आपणांस भास होतो. अशा प्रसंगीं शान्ति आणि सुविचार ह्यांचें अवलंबन करावें, व त्या गोष्टीसंबंधानें आपल्या मित्राच्या बाजूनें विचार करून पहावा. कोणतीहि गोष्ट उतावळीनें करूं नये. सृष्टीचे व्यापार कधींहि उतावळीनें होत नाहींत. उतावळीनें केलेलें काम लौकर न होतां त्याला विलंबच लागतो. विशेषेंकरून कोणाशीं भांडण्याची उतावळी कधीं करूं नये. शांतपणें विचार करावा. कांहीं वेळ जाऊं द्यावा. ज्या गोष्टीबद्दल आपणास मनस्वी संताप झाला असेल तीच गोष्ट एक रात्र उलटल्यावर अगदीं निराळी भासूं लागेल.

आपण एकादें प्रमाणसिद्ध पण लागट मजकुराचें पत्र लिहिलें असेल तर तें एक दिवस तसेंच राहूं द्यावें. दुसरे दिवशी तें पत्र पाठवावें. असें आपणांस बहुधा वाटणार नाहीं.

चांगल्या लोकांशींच मैत्री करावी. कुमित्रापेक्षां मुळींच मित्र नसलेला बरा.

( श्लोक )

आनन्दमृगदावाग्निः । शीलशाखिमदद्विपः ॥
ज्ञानदीपमहावायुरयं खलसमागमः ॥ १
परोक्षे कार्यहन्तारं । प्रत्यक्षे प्रियवादिनम् ॥
वर्जयेत्तादृशं मित्रं । विषकुम्भं पयोमुखं ॥ २

रहस्यभेदो याच्ञाच । नैष्ठुर्यं चलचित्तता ॥
क्रोधो निःसत्यता द्यूतमेतन्मित्रस्य दूषणम् ॥ ३

—सुभाषित

**भावार्थः**—( १ ) खलाचा समागम हा आनंदरूपी मृगास जाळून टाकणारा वणवा, सत्वभावरूपी वृक्षास उपटून टाकणारा मदोन्मत्त हत्ती, व ज्ञानरूप दीपाला मालवून टाकणारा महावात आहे. ( २ ) आपल्या तोंडापुरतें गोड बोलणारा व मागून घात करणारा मित्र हा ज्याच्या तोंडी अमृत आहे अशा विषाच्या घड्याप्रमाणें होय. त्याला कधीही जवळ करूं नये. ( ३ ) गुप्त गोष्ट बाहेर फोडणें, याचना, निष्ठुरता, चंचलमन, क्रोध, असत्य भाषण, आणि द्यूत हीं मित्राचीं दूषणें होत.

( अभंग )

दुर्जनांचो संग विषेचीयापरी ॥ देखोनियां दुरी व्हावें तया ॥ १
आईकाहो तुम्ही मीत हे सज्जन ॥ करूं संघटन बोलो नये ॥ २
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी ॥ पिसाळलेपरी धांवे श्वान ॥ ३
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग ॥ बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ४
तुका म्हणे किती सांगावें पृथक ॥ अंग कुंभपाक दुर्जनाचें ॥ ५

—तुकाराम

" दुष्ट लोकांच्या मार्गांत शिरूं नका. त्या मार्गाच्या जवळून देखील जाऊं नका. तो दिसतांच तोंड फिरवून त्यापासून दूर व्हा. कारण दुष्ट लोकांना कांहीं तरी अनर्थ केल्याशिवाय किंवा कोणाचा तरी घातपात केल्याशिवाय झोंपच येत नाहीं. दुष्टपणा हेंच त्यांचें अन्न व अपकृति हेंच त्यांचें पान. परंतु सज्जनांचा मार्ग सरळ आणि उज्ज्वल असतो, व जसजसें पुढें जावें तसतसा तो अधिक प्रकाशमान् दिसूं लागतो. "

इंग्रजी म्हणी

दुष्ट व मूर्ख लोकांची मैत्री करूं नये हें जरी खरें आहे, तथापि तशा लोकांचें वैरहि संपादितां कामा नये; कारण जगांत त्या लोकांची संख्या फार आहे.

मित्रांस आपल्याकडून जेवढें साहाय्य होण्यासारखें असेल तेवढें मिळण्याचा त्यांचा हक्क आहे. पण मित्रानें कधींहि द्रव्य उसनें मागूं नये.

" आपण कोणाचें कर्ज काढूं नये, व कोणास कर्ज देऊं नये. कारण कर्ज दिलें तर बहुधा तें बुडतें व मैत्रीसही बुडवितें. व कर्ज काढण्यानें मितव्ययाशीं संवय नाहींशी होते."

" जो कोणी अपरिचित मनुष्यास जामीन होतो तो पश्चात्ताप पावतो. जो कोणाचा जामीन होत नाहीं त्याचें धन सुरक्षित रहातें. "

आपल्या मित्रांस अनेक संकटांपासून आमचें संरक्षण करितां येईल. व आमचीं अनेक दुःखें टाळतां येतील.

( श्लोक )

पापान्निवारयति योजयते हिताय ।
गुह्यंच गूहति गुणान् प्रकटीकरोति ॥
आपद्गतच न जहाति ददाति काले ।
सन्मित्रलक्षणमिदं प्रवदन्ति सन्तः ॥ १

**भावार्थः—**

( श्लोक )

योजी हिताप्रति निवारिति पापकर्म ।
वर्णी बरेच गुण झांकुनियां कुकर्म ॥

१ शेक्सपियर २ सालोमन

दे आपणांस असतां व्यसनीं त्यजीना।
सन्मित्रलक्षण असें वदतात जाणा ॥ १

—**वामन**

अशा प्रकारचे मित्र मिळाले म्हणजे त्यांची मैत्री कायमची ठेवावी. त्यांचा असंतोष होण्यासारखें कांहीं करूं नये.

( ओंवी )

जे सन्मित्र भाग्यें लाधले। प्रसंगीं ज्यांचें सत्व न ढळे॥
प्रेमरज्जूंनीं दृढ बांधिले। राखीं हृदयीं तयांतें॥ १

—**शेक्सपिअर**

मृत्यूमुळें ज्या मित्रांचा वियोग होतो त्यांची परलोकीं पुनः भेट होईल हें जाणून आपलें समाधान करावें.

आपल्या आयुष्यामध्यें विवाह हा संस्कार फार महत्त्वाचा आहे. प्रेम ही एक अजब वस्तु आहे. हिच्या योगानें सकल सृष्टीला स्फूर्ति होऊन ती फार रमणीय दिसूं लागते; हिच्या योगानें जमिनीवर लोळणाऱ्या किड्याला पतंगाचें स्वरूप प्राप्त होऊन तो आकाशपंथें यथेच्छ विहार करितो. हिच्या योगानें वसंतऋतूंत पक्ष्यांच्या पिसाऱ्यावर सुंदर रंग चढतात, व काजव्याला सुवर्णमय प्रकाश प्राप्त होतो; पक्ष्यांच्या तोंडांतून सुस्वर आलाप निघतात, आणि कवीला काव्याची स्फूर्ति होते. अचेतन सृष्टीवर देखील हिचा अम्मल बसतो असें दिसतें, व त्यामुळें फुलांवर अप्रतिम रंग झळकूं लागतात.

सिमोनाइड्स ह्याचें असें म्हणणें आहे कीं, सुपत्नी असणें ह्यासारखें सुख नाहीं. व कुपत्नी असणें ह्यासारखें दुःख नाहीं.

( श्लोक )

जशा दुर्दिनीं वर्षती मेघधारा ।
करा शब्दवर्षाव तैशी कुदारा ॥
सुपत्नीसवें पर्णशाला सुखा दे ।
न जें राजवाडा कुभार्येसवें दे ॥ १

—इंग्रजी म्हण.

नवरी पसंत करण्यासंबंधानें उपयुक्त सूचना करणें जरासें अवघड आहे. तथापि कांहीं गोष्टी अगदीं उघड दिसण्यासारख्या आहेत. फार लवकर लग्न करणें हें चांगलें नाहीं. टेलर म्हणतो, " अल्पवयी स्त्रीपुरुषांनीं लग्न करणें हें एका वाटाण्यास दुसऱ्या वाटाण्याचा आधार देण्यासारखें आहे. " पैशाच्या लालचीनें कोणाशीं लग्न करूं नये. पैसा जवळ असल्याशिवाय लग्न करूं नये. जे पैशासाठीं लग्न करितात त्यांना संसारसुखापेक्षां पैशाची योग्यता अधिक वाटते असें म्हटलें पाहिजे. अशा लोकांना पुढें त्राहि त्राहि होऊन असें वाटूं लागतें कीं, नको तो पैसा आणि नको ती कटकट.

कित्येकांना असें वाटतें कीं, लग्न झाल्यानंतर देखील आपण स्वतंत्र रीतीनें वागूं; आपल्या पत्नीला आपण एखाद्या सुंदर फुलपांखरासारखी मौजेकरितां बाळगूं. आमच्या जीवितार्शी तिचा संबंध कारणापुरताच ठेवूं; आह्मांला कामाचा कंटाळा आला म्हणजे कांहीं वेळ तिच्याशीं बोलूं; परंतु आमची तब्यत लागत नसेल त्यावेळीं तिनें आह्मांस त्रास देतां कामा नये. अशा प्रकारचे तरंग कांहीं तरुणांच्या मनांत येत असतात; पण ते व्यर्थ आहेत.

होमर कवीनें पतीचें कर्तव्य सांगितलें आहे. तो म्ह-

णतो; पतीनें आपल्या पत्नीस अशा प्रेमानें वागवावें कीं, तिला आपल्या आईबापांचा व बंधूंचा वियोग झाला आहे असें मुळींच भासूं नये. नाहीं तर तिची स्थिति पोरक्या पोराप्रमाणेंच व्हावयाची. कारण तिला आपल्या आईबापांचा व बंधूंचा सहवास नवऱ्यासाठीं सोडून द्यावा लागतो. असें असतां तिला नवऱ्याच्या घरीं माहेरच्या प्रेमाचा अनुभव मिळत नसला तर तिच्यांत आणि पोरक्या पोरांत काय अंतर आहे ? लग्न करावें किंवा नाहीं अशी शंका वाटत असेल तर लग्न करूं नये हेंच चांगलें. लग्नापासून एक तर अप्रतिम आनंद होतो, नाहीं तर अतिशय दुःख होतें.

विवाह करणें हें मोठें जबाबदारीचें काम आहे. केवळ आपल्या डोळ्यांच्याच तंत्रानें वागूं नका. केवळ बाह्य स्वरूपासच भुलूं नका. विवाहबंधन विचार आणि प्रेम ह्यांच्या साह्यानेंच केलें पाहिजे.

साध्वी स्त्रियेपासून संसारांत साहाय्य होतें एवढेंच नाहीं, तर आपली मानसिक उन्नतिहि होते. शेक्सपिअर म्हणतो, " पत्नीप्रेमाच्या योगानें अधम मनुष्यासहि औदार्य येतें. " नीच मनुष्यावर जर एवढा सत्परिणाम घडता, तर स्वभावतः जे उदार मनाचे आहेत त्यांच्यावर किती घडेल !

( ओव्या )

महात्मे भूतलावरी असती । स्वर्गींचे जणूं देवचि भासती ॥
ज्या ज्या स्थानीं पद ठेविती । मंत्रें भारिलें होय तें ॥ १

अमोघ ज्यांचे आशीर्वचन । जे प्रेमाचे पूर्ण निधान ॥
ज्यांचें अगाध महिमान । वर्णनातीत सर्वथा ॥ २

—केवल

जेरेमी टेलर म्हणतो, " लग्न ही संस्था परमेश्वरनिर्मित आहे. तिच्यापासून जडणारा संबंध फार पवित्र आहे. त्या संस्थेंत जें कांहीं रहस्य आहे तें मंगलमय आहे. लग्नाचा मुख्य हेतु धर्माचरणाचा आहे. लग्नापासून मनुजाचें मोठें कल्याण आहे. व त्यापासून ईश्वरभक्तीस योग्य अशी पवित्रता अंगी येते.

एकमेकांस अनुरूप अशा वधूवरांचा विवाह झाला असतां त्यांच्या सुखाचें काय वर्णन करावें ? सर्व मंगलकार्ये पति आणि पत्नी जोडीनें बसून आनंदानें करितात. सुखाच्या आणि दुःखाच्या प्रसंगीं त्यांच्या चित्ताचें ऐक्य असतें. तीं एकमेकांपासून कांहीं लपवून ठेवीत नाहीत, व त्यांस एकमेकांचें ओझें कधीहि वाटत नाहीं. जेथ पतिपत्नी सुखानें नांदतात तेथें प्रत्यक्ष परमेश्वर आहे असें समजावें.

आपल्यामध्यें लग्नाच्या वेळी " अर्थेच कामेच नातिचरामि " अशी शपथ वर घेत असतो. इंग्रज लोकांनहि विवाहाच्या प्रसंगी नवऱ्यास अशाच अर्थाची शपथ घ्यावी लागते ती अशीः—" सुख असो किंवा दुःख असो, श्रीमंती असो किंवा गरिबी असो, रुग्णावस्था असो किंवा आरोग्य असो, माझा जीवात्मा आहे तोंपर्यंत मी तुला अंतर देणार नाहीं. व तुझ्यावर प्रेम केल्यावांचून रहाणार नाहीं. "

लग्न सुखाचें झालें तर वधूवरांच्या आयुष्यास अगदीं नवेंच वळण लागतें. त्यांना आजपर्यंत ठाऊक नाहीं अ-

शा सुखाचा अनुभव येऊं लागतो. त्यांच्यामध्यें लोकांच्या उपयोगीं पडण्याची विलक्षण शक्ति येते. तेथपासून मनुष्यास आपले पूर्वीचे सर्व दुर्गुण पार सोडून द्यावेसे वाटतात व त्याच्या मनांत नवीन आशांकुर उत्पन्न होऊन तो ताज्या दमानें व मोठ्या उमेदीनें आपल्या पुढील आयुष्याचा सद्व्यय करण्याच्या मार्गास लागतो. स्वर्गलोकाशीं साम्य पावणारें ह्या जगांत जर कांहीं असेल तर तें 'सुखमय गृह' होय. अशा गृहामध्यें नवराबायको, आईबाप, बंधुभगिनी, व मुलें हीं आपआपल्या परीनें एकमेकांस जें साहाय्य करितात तसें दुसऱ्या कोणाकडून होणार नाहीं. कारण एका हाडामांसाच्या माणसांस एकमेकांचा स्वभाव जसा कळेल व एकमेकांच्या हिताबद्दल, नांवाबद्दल, व उत्कर्षाबद्दल जशी कळकळ वाटेल तशी दुसऱ्यास कशी वाटेल? एकाचा हर्ष तोच सर्वांचा हर्ष, एकाचें दुःख तेंच सर्वांचें दुःख, एकाचें वैभव तेंच सर्वांचें वैभव, एकाची कीर्ति तीच सर्वांची कीर्ति व एकाची अपकीर्ति तीच सर्वांची अपकीर्ति. अशा प्रकारचा भाव कुटुंबीय माणसांमध्यें परस्परसंबंधानें जसा रहातो तसा परकी लोकांमध्यें असण्याचा संभव नाहीं.

मुलें असणें ह्यासारखें सौख्य क्वचित् असेल, पण त्यांचें योग्य प्रकारें संवर्धन करण्याची जबाबदारीहि तशीच मोठी आहे. जार्ज हर्बर्ट म्हणतो, एका चांगल्या आईची योग्यता शंभर शालागुरूंच्या योग्यतेबरोबर आहे. मुलें जगांत ईश्वर पाठवितो असें म्हणण्याचा परिपाठ आहे. व कित्येक आळशी आईबाप असें म्हणतात कीं, ईश्वरानें

आह्मांस मुलें दिलीं, तेव्हां तो त्यांच्या पोषणाची तजवी-ज करील. पण ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ज्या मनुष्यास मुलाचें नीट संगोपन करण्याची शक्ति नसेल त्यानें त्यांस जगांत आणूंच नये.

लहान मुलांस फार ममतेनें वागविलें पाहिजे म्हणजे तीं जगांत पुढें चांगल्या रीतीनें वागण्यास समर्थ होतात.

बालकाचे बोबडे बोल ऐकून हृदयामध्यें आनंदानें भ रतें कसें येतें ह्याची कल्पना मुलांवर प्रेम करणाऱ्या आ ईबापांशिवाय इतरांस यावयाची नाहीं. त्यांच्या बाल्ली ला, त्यांचें अडखळत बोलणें, त्यांचें रुसणें, त्यांचा निष्क-पट स्वभाव, त्यांचें परावलंबन इत्यादि गोष्टी प्रेमळ आ-ईबापांस पदोपदीं सुख आणि आनंद देतात.

( श्लोक )

आलक्ष्य दंतमुकुलाननिमित्तहासै-
रव्यक्तवर्णरमणीय वचः प्रवृत्तीन् ॥
अङ्काश्रयप्रणयिनस्तनयान् वहन्तो ।
धन्यास्तदङ्गरजसा मलिनी भवन्ति ॥ १

—कालिदास

भावार्थः—

( श्लोक )

दावी सुदंतकलिका अनिमित्तहासें ।
अव्यक्त शब्द बहु गोड वदे सुभासे ॥
येतां असा तनय आवडिनें निजांकीं ।
तद्धूलिनें मलिन धन्याचे होति लोकीं ॥ १

ज्या मनुष्यानें आपल्या बायकोवर व मुलांवर प्रेम नाहीं त्याच्या मनाला गृहामध्यें असह्य यातना होतात.

म्हणून आपल्या पत्नीवर प्रेम ठेवणें हें स्वार्थदृष्टीनें देखील प्रत्येकास अवश्य आहे.

( श्लोक )

मोठे महत्त्वगिरिशिखरिं बैसतातीं ।  
उड्डाण एक करुनी नच तेथ जाती ॥  
जेव्हां दुजे जन सुषुप्तित मग्न होती ।  
हे तेथवां सतत उद्यम चालवीती ॥ १

—ॲबटकृत नेपोलियनचें चरित्र

# प्रकरण १३

## उद्योग

कोणत्याहि वस्तूचा अपव्यय करूं नये. पण वेळेचा अपव्यय होऊं न देण्याविषयीं फारच जपलें पाहिजे. पैसा आपल्या पेटींत ठेविला तर त्याचा पाहिजे तेव्हां उपयोग करितां येईल. पण वेळ पेटींत सांठवून ठेवितां येत नाहीं. तिचा जेव्हांच्या तेव्हां सदुपयोग केला नाहीं तर आपण तिला कायमचे अंतरतों. ईश्वरदत्त देणग्यांमध्यें वेळ ही अत्यंत मूल्यवान् आहे. आणि ती एकदां आपल्या हातून गेली म्हणजे कांहीं केलें तरी पुनः प्राप्त होणार नाहीं.

( आर्या )

गतकाळावरि साक्षात् परमेशाची न शक्ति चालतसे ॥
जे घडलें तें घडलें, मम घटिका मज मिळोनि गेलि असे ॥ १

— ड्रायडन

आपल्या वेळेचा अशा रीतीनें व्यय करावा कीं पुढें पश्चात्ताप होण्यास कारण राहूं नये. अमुक गोष्ट कर ण्याची माझी वेळ निघून गेली, किंवा अमुक गोष्ट मीं पूर्वीं केली असती तर होण्यासारखी हानी असे विचार मनांत येणें ह्यासारखें दुःख नाहीं. वेळ ही एक ठेव आपणांजवळ ठेवलेली आहे. व तिच्या प्रत्येक क्षणाबद्दल आपणांस हिशोब द्यावा लागेल. निद्रा बेतानेंच घ्यावी. जेवण बेताचेंच असावें. व वेळेचा उपयोग फार काटकसरीनें करावा.

नेल्सन् ह्यानें एकदां असें बोलून दाखविलें कीं, मला

नें ह्या जगांत यश मिळालें त्याचें मुख्य कारण मी आपल्या कामावर वेळेच्या पूर्वी पाव तास तयार असें हें होय.

लार्ड मेल्बोर्न म्हणतो, " तरुण लोकांच्या तोंडांतून दुसरे तिसरे कांहीं शब्द येतां कामा नयेत. त्यांनीं नेहमीं असें म्हटलें पाहिजे कीं, आह्मीं आपल्या हिंमतीनें आपलें नशीब काढूं. जगांत आमचा उत्कर्ष होणें किंवा न होणें हें सर्वस्वीं आमच्या श्रमांवर अवलंबून आहे. "

जगांत मनुष्यास यश येण्यासाठीं उद्योगाची जरूर आहेच. पण उद्योग मनुष्यास कुमार्गापासून दूर ठेवितो हाहि एक त्याचा मोठा उपयोग आहे.

जेरेमी टेलर म्हणतोः—" मनुष्यानें कधीं रिकामें राहूं नये. जेव्हां जेव्हां वेळ सांपडेल तेव्हां तेव्हां कांहीं तरी श्रमाचें व उपयोगी असें काम करीत असावें. कारण मन आणि शरीर हीं केव्हां रिकामीं सांपडतील आणि केव्हां त्यांच्यावर झडप घालूं म्हणून कामादिक रिपु टपलेले असतात. मनाचें स्वास्थ्य, शरीरसंपत्ति, आणि रिकामपणा एवढ्या गोष्टी असल्यावर मनुष्यास पापाचरणाचा मोह बहुधा हटकून उत्पन्न होतो. मनांत कुवासना शिरूं न देण्याच्या कामीं शारीरिक श्रमांची योग्यता फार मोठी आहे. "

केबल् म्हणतोः " ह्या जगांत आह्मांस जन्म दिला आहे त्याचा हेतु एवढाच कीं, परलोकीं अनंतकालपर्यंत रहाण्याची योग्यता आपण मिळवावी. आह्मीं ज्याप्रमाणें आपल्या वेळेचा उपयोग ह्या जगांत करूं, त्याप्रमाणेंच परमेश्वर आह्मांस परलोकीं बरी-वाईट गति देईल. "

लोकांना सुखी करण्याच्या कामीं, त्यांचें कल्याण करण्याच्या कामीं, थोडें कां होईना पण कांहीं तरी करावयाचें, अशा प्रकारचा मनोरथ मनुष्यास अत्यंत भूषणावह आणि उन्नतिकारक आहे.

युरोपांतील एका राजानें मिचेल् एंजलो या विख्यात चित्रकाराकडून एक बर्फाचा पुतळा तयार करविला होता. अमोलिक वेळ फुकट घालविण्याचा हा अत्यंत मूर्खपणाचा प्रकार झाला, हें उघडच आहे. पण ज्याप्रमाणें मिचेल् एंजलोचा वेळ सर्व जगास अमोलिक होता, त्याप्रमाणें आमचा वेळ निदान आम्हां स्वतःस तरी अमोलिक आहे. असें असून आपण तो बर्फाचे पुतळे करण्यांत म्हणा किंवा त्याहीपेक्षां निष्फळ गोष्टी करण्यांत म्हणा, कैकवेळां फुकट घालवितों नाहीं तरं !

रोमचा प्रख्यात मुत्सद्दी व तत्त्ववेत्ता सेनेका म्हणतो:—
"आम्हांस फार थोडा वेळ आहे असें आपण नेहमीं म्हणतों. पण खरें म्हटलें तर आम्हांस इतका वेळ मिळतो कीं, त्याचा कसा उपयोग करावा हें आम्हांस समजत नाहीं. आमचें आयुष्य एक तर रिकामपणांत जातें, नाहीं तर भलत्याच गोष्टी करण्यांत जातें. पण आपलें खरें कर्तव्य करण्यांत फारच थोडें जात असेल. आपणांस फार थोडें आयुष्य आहे म्हणून आम्हीं कुरकुरतों. पण अशा रीतीनें वागतों कीं, जणुं काय आम्हांस उदंड आयुष्य आहे."

वेळेची काटकसर केल्यास मनुष्याच्या हातून इतकें काम होतें कीं तें पाहून एकाद्याला आश्चर्य वाटेल.

( श्लोकार्ध )

जलबिन्दुनिपातेन । क्रमशः पूर्यते घटः ॥

**भावार्थः**—पाण्याचा एक एक थेंब पडूनहि घागर भरते.

( श्लोक )

अञ्जनस्य क्षयं दृष्ट्वा । वल्मीकस्य च संचयम् ॥
अवंध्यं दिवसं कुर्याद्दानाध्ययनकर्मसु ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः**—डबींतील काजळ दररोज थोडथोडें डोळ्यांत घालून कांहीं दिवसांनीं संपून जातें; मुंग्या थोडथोड मातीचे कण आणून त्याचें मोठें वारूळ तयार करितात. ह्या दोन गोष्टी पाहून मनुष्यानें एकहि दिवस फुकट न घालवितां झटून उद्योग करावा.

आपल्या वेळेचा आपण कितीहि काळजीनें आणि शहाणपणानें व्यय केला, तथापि आमच्याचशा काय पण आमच्यामध्यें जे अत्यंत दैवशाली आहेत त्यांच्या हातून देखील ब-याच गोष्टी करण्याच्या राहून जातात; पुष्कळ ग्रंथ वाचावयाचे रहातात. पुष्कळ देश व देखावे पहावयाचे रहातात.

जगांत यश आणि सुख हीं प्राप्त होण्यास चांगलें आणि पुष्कळसें काम करण्याची योग्यता अंगीं असली पाहिजे. सिसिरो म्हणतो कीं, उत्कर्ष होण्यासाठीं मनुष्याच्या अंगीं पहिला गुण कोणता पाहिजे म्हणाल तर धाडस. दुसरा कोणता तर धाडस. आणि तिसरा कोणता तर धाडसच. आतां आपल्या कर्तृत्वशक्तीविषयीं खातरी असणें हें फार उपयुक्त आहे ह्यांत शंका नाहीं, तथापि आमच्या मतें पहिला अवश्य गुण म्हटला म्हणजे दृढनिश्चय. दुसरा दृढनिश्चय. आणि तिसरा दृढनिश्चयच,

असें म्हटलें तर तें अधिक सयुक्तिक होईल. श्रम काय आणि खेळ काय, हे ह्या नरजन्माचे हेतु नव्हत; तर एकच हेतु साधण्याचीं हीं दोन्ही साधनें आहेत.

मनाची शांतता आणि शरीराचें आरोग्य हीं कायम ठेवण्याकरितां कांहीं तरी काम करणें हें जरूर आहे. काळजीमध्यें घालविलेल्या एका दिवसानें जेवढा थकवा येईल तेवढा एक आठवडाभर काम केल्यानें येणार नाहीं. काळजीनें आपल्या शरीरांतील सर्व यंत्रें बिघडतात, आणि कामाच्या योगानें तीं निरोगी आणि व्यवस्थित राहतात. स्नायूंच्या श्रमानें शरीर निरोगी राहतें, व मेंदूच्या श्रमानें मन शांत राहतें.

रस्किन् म्हणतोः—" एकाद्या मुलीला अशा प्रकारचें काम द्यावें कीं तिला दिवसभर श्रम होऊन रात्रीं थकवा यावा, व आपल्या हातून आपल्या देशबांधवाचें थोडें तरी हित झालें आहे अशी समजूत व्हावी. म्हणजे मग तिला आपल्या हातून कांहीं लोककल्याण होत नाहीं म्हणून जी हुरहूर लागलेली असते ती नाहींशी होऊन तिच्या मनास प्रसन्नता येईल, व परोपकाराचें तेज तिच्या तोंडावर झळकूं लागेल." तुम्हांला वाटेल तो उद्योग करा.पण कांहीं तरी केल्याशिवाय राहूं नका. परीस शोधून काढण्याचा किंवा वर्तुळाचा चौकोन करण्याचा ज्यांनीं यत्न केला त्यांच्या श्रमांपासून देखील कांहीं फलप्राप्ति झाली आहे.

डॉक्टर जॉनसन् म्हणतोः-केवळ शब्दपांडित्य हें ह्या भूलोकींचें आहे. पण कृति करून दाखविण्याची शक्ति ही देवलोकींची वस्तु आहे.

( अभंगचरण )

बोलों जाणें अंगीं नाहीं शूरपण। काय तें वचन जाळावें तें ॥

तुकाराम

( श्लोकचरण )

क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ।

—रामदास

जें कांहीं करावयाचें असेल तें मन लावून उत्तम रीतीनें करावें. आपल्या सर्व शक्तींचा विकास करून घ्यावा; त्यांचा उपयोग केला नाहीं तर कांहीं काळानें त्या अगदीं नष्ट होतील. हेझेक्या नामक एका मनुष्याची अशी गोष्ट सांगतात कीं तो जें काम हातीं घेई तें अगदीं मनापासून करीत असे. व त्यामुळें त्याचा मोठा उत्कर्ष झाला.

मोठमोठ्या बुद्धिमान् लोकांच्या महत्कृत्यांचें इंगित शब्दांनीं वर्णन करणें कठिण आहे. तथापि जें शब्दांनीं सांगतां येण्यासारखें आहे तें हें कीं, त्यांनीं कोणत्याहि संकटांची पर्वा न बाळगतां दृढनिश्चयानें उद्योग केला. बुद्धिवान् लोक स्वतः असें सांगतात कीं, बुद्धि* म्हणजे

* ह्या गोष्टी इंग्लंडांतील बुद्धिमानांच्या आहेत. पण प्रुफ पाहतांना आमचे इकडील गोष्ट ताबडतोब मनापुढें उभी राहिली ती अशी:—रा० रा० गणेश कृष्ण आपटे एक्झिक्युटिव इंजिनियर ( हल्लीं रत्नागिरी ) हे पुणें एथें नुकतेच आपल्या बरोबरीच्या एका सुप्रसिद्ध विद्वानांकडे खाजगी भाषणांत अक्षरशः हेच शब्द बोलले.—हे गृहस्थ जात्या मोठे बुद्धिमान् आहेत. पण ते उद्योगी होते असेंच म्हणावयाचें. ते बी. ए. च्या परीक्षेंत व एल. सी. ई. च्या परिक्षेंत पहिल्या क्लासांत पहिले आले होते. त्यांजविषयीं लोक असें सांगतात कीं. जेवतांना बाजूला पुस्तक ठे-

उद्योग, दुसरें कांहीं नाहीं. 'जार्ज इलियट' हें नांव धारण केलेली नामांकित कादंबरीकर्त्री म्हणत असे कीं " उत्तम कादंबरी लिहिणें हें प्रामादिक आहे असें म्हणतात तें सर्व थोतांड आहे." प्रेसिडेंट ड्वाईट ह्यानें एकदां शाळेंतील विद्यार्थ्यांस सांगितलें कीं बुद्धि म्हणजे श्रम करण्याची शक्ति.

याचना करणें हें श्रम करण्यापेक्षां खरोखर कठिण आहे. व त्यापासून प्राप्तिहि फार कमी होते. आणखी प्रत्येक मनुष्यानें स्वतःच्या प्रयत्नानें निर्वाह करावा हेंच योग्य आहे. फ्रांकलिन् म्हणतो. स्वतःच्या श्रमानें पोट भरणाऱ्या नांगऱ्याची योग्यता परावलंबी सरदारापेक्षां जास्त आहे असें मी समजतों.

कॉबेट् आपल्या प्रसिद्ध इंग्रजी व्याकरणासंबंधानें लिहितांना म्हणतो: मी चार आण्यांच्या रोजमुऱ्यावर शिपायाचें काम करीत होतों तेव्हां व्याकरण शिकलों. माझी पहाऱ्याची जागा हीच माझी अभ्यासाची खोली. माझी

(मागील पृष्ठावरून)

वून व शौचास जातांना पुस्तक नेऊन त्यांनी अभ्यास केला. इतकेंच नाहीं तर वर्तमानपत्र बरोबर नेऊन अर्धा तास बसल्याखेरीज शौचास व्हावयाचें नाहीं, हें त्यांचें व्यसन होऊन राहिलें होतें, व तें त्यांस पुढें बरीच वर्षे टाळतां आले नाहीं. आह्मी खरोखर बुद्धिमान् आहों काय? आमच्या उद्योगाचें फल आह्मास मिळालें, व उद्योगानें मनुष्य बुद्धिमान् होतो, असें ते स्वतः म्हणतात. कै० महादेव गोविंद रानडे ह्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल म्ह० उद्योगीपणाबद्दल कोणास सांगावयास नकोच. **व० ग० दाभोळकर.**

पडशी, हेंच पुस्तकाचें कपाट, व एक फळीचा तुकडा हें माझें लिहिण्याचें टेबल होतें. अशा स्थितींत देखील व्याकरणाचा अभ्यास मीं एका वर्षाच्या आंत केला. दिव्यासाठीं मेणबत्ती किंवा तेल विकत घेण्यास मजपाशीं पैसा नव्हता. हिंवाळ्यांत मला फक्त शेगडीचा प्रकाश मिळत असे व तोहि माझ्या पाळीप्रमाणें. शाई, लेखण्या व कागद विकत घेण्यासाठीं मला एकादा आणा खर्चावा लागत असे. ही रक्कम फार लहान असें तुम्हांला वाटेल; पण नाहींहो. तुम्हांला काय सांगावें. ती रक्कम मला भारी वाटत असे. माझें वय त्यावेळीं बरेंच झालें होतें. माझी प्रकृति सुदृढ असून मला फार श्रम पडत असत. दर आठवड्यास माझा खाण्यापिण्याचा खर्च जाऊन पांच पैसे शिल्लक रहात. एका प्रसंगाची तर मला पक्की आठवण आहे, व ती कधींहि माझ्या मनांतून जाणार नाहीं. एके दिवशीं सर्व अवश्य खर्च भागवून मीं कांहीं वस्तू विकत घेण्याकरितां अर्धा आणा राखून ठेविला होता. तो माझे हातून हरवला. त्यावेळीं मी एकाद्या मुलाप्रमाणें रडलों. म्हणून मी सांगतों कीं, अशा स्थितीमध्यें देखील जर मी व्याकरण शिकलों, तर इतर मनुष्यांस तें न शिकण्याची कांहीं तरी सबब सांगतां येईल काय ? "

काबेट् ह्याजवळ पैसा नव्हता; पण त्याच्या अंगीं हिंमत आणि धैर्य हीं होतीं. बेकन म्हणतो:—" पुष्कळ लोकांस आपल्या संपत्तीची योग्यता किती व आपल्या सामर्थ्याची किती हें समजत नाहीं. त्यांना संपत्तीची योग्यता आहे त्याहून अधिक वाटते, व आपल्या सामर्थ्याची

योग्यता आहे त्याहून कमी वाटते. स्वावलंबन व आत्मनिग्रह ह्यांच्या योगानें कोणाहि मनुष्यास आपला चरितार्थ स्वतःच्या श्रमानें चालवितां येतो, व ईश्वरानें दिलेल्या देणग्यांचा योग्य उपयोग करितां येतो. "

उद्योग्याचे घरीं। रिद्धिसिद्धि पाणी भरी ॥

ह्या सृष्टींतील आदिशक्ति मनुष्यास नेहमी सांगत असते, " तूं प्रत्येक घटकेस कांहीं तरी काम कर. मग त्याबद्दल तुला वेतन असो किंवा नसो. तूं काम करण्याचा क्रम मात्र निश्चयानें ठेव. मग त्याबद्दल बक्षीस तुला खातरीनें मिळणारच. तुझें काम हलकें असो किंवा मोठें असो, धान्य पेरण्याचें असो किंवा काव्यरचनेचें असो, तें तूं कसोशीनें कर, व तें चांगलें झालें आहे अशी आपल्या मनाची खातरी करून घे; म्हणजे त्यापासून तुला जो आनंद होईल तेंच खरें बक्षीस होय. तुला कितीहि वेळां अपयश आलें तरी अखेरीस यश येणारच. कोणतेंहि काम चांगल्या रीतीनें करितां आलें म्हणजे तेंच तुझ्या श्रमाचें उत्तम फळ होय. "

सर **वाल्टर स्काट्** ह्यानें आपल्या एका कादंबरीत **मिचेल स्काट्** नामक जादुगाराची गोष्ट सांगितली आहे. ती अशी कीं, त्याला एक भूत वश होतें. पण त्या भूतापासून कांहीं अपाय होऊं नये म्हणून त्याला प्रतिक्षणीं कांहीं तरी काम सांगावें लागत असे. आमची सर्वांची स्थिति कांहींशी वरील जादूगाराप्रमाणेंच आहे. आमच्या शरीरांत असलेलें भूत बाहेर घालविलेलें आहे. पण आमचें शरीर रि-

१ इमर्सन

कामें पाहिलें की तें आंत येतें व बरोबर आणखी दुसरीं दुष्ट भुतें घेऊन येतें.

रिकामपणालाच विश्रांति समजूं नये. खरें म्हटलें तर उद्योगापेक्षां रिकामपणच अधिक कंटाळवाणें होय. जो मनुष्य कांही उद्योग करीत नाही त्याला विश्रांतीच्या सुखाचा अनुभव मिळणें अशक्य आहे.

काम करीत असतांना कधी घाई करूं नये. सृष्टीचे व्यापार देखील धिमेपणानेंच होत असतात. स्वित्सरलँडांतील पर्वत पहावयास जाणाऱ्या लोकांस तेथील वाटाड्या क्षणोक्षणी सांगत असतो की, 'बाबानों सावकाश आणि स्थिरपणानें चाला. चालतांना घाई करूं नका व रेंगाळत राहूं नका.' काम करीत असतां मधून मधून विश्रांति घेणें अगदी जरूर आहे. पण संसारामध्यें पुढें पाऊल टाकण्याची मुख्य गुरुकिल्ली जी आहे ती ही की, कधी घाई करूं नये व कधी रेंगाळूं नये. पुष्कळ लोकांस असें वाटतें की, घाई करून आपणांस वेळ वांचवितां येईल. पण ही त्यांची मोठी चूक आहे. कोणत्याहि कामांत लवकर गति होणें हें चांगलें आहे, तथापि काम लवकर होण्यापेक्षां तें चांगलें व्हावें हें अधिक महत्त्वाचें आहे.

दुसरें असें की, काम अनियमितपणें, झटक्याझटक्यांनी व घाईनें केलें तर त्यापासून आपणांस अतिशय श्रम व त्रास होतो. पण तेंच नियमानें, धिमेपणानें व स्थिरचित्तानें केलें असतां सहज होऊन जातें. उतावीळपणानें कामहि बिघडतें, व संसारहि बिघडतो.

( श्लोक )

उतावीळ होऊं नको सर्वथा रे ।
विवेकाविणे कार्य तेंही नको रे ॥
करीं सद्विचारा मनीं सत्य नीति ।
धरोनी स्थिर जाणुनी आत्मशक्ति ॥ १
विचाराविणें अल्पही कृत्य होतां ।
न तें शुद्ध होई बहू अब्द जातां ॥
नसे विश्रमू काळ हा जात आहे ।
करा विक्रमा मृत्यु जो दूर राहे ॥ २
करा श्रेष्ठ सत्कृत्य कांहीं निजांगें ।
न जेणें तुझी कीर्ति कल्पांति भंगे ॥
विनाशी तनू नष्ट होणार साची ।
चिरंजीव ते होय जो धन्य तोचि ॥ ३

—गेटी

( श्लोक )

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ॥
वृणुते हि विमृश्यकारिणम् । गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥ १

—भारवि

**भावार्थः—**

( श्लोक )

सहसा न करी क्रिया कदा । अविवेकें बहु येति आपदा ॥
करि जो सुविचार सुक्रिया । गुणलुब्धा वरि संपदा तया ॥

( श्लोकार्ध )

तनु त्यागितां कीर्ति मागें उरावी । मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥

—रामदास

म्हणून काम नेटानें करावें पण स्वस्थपणानें व शांत मनानें करावें, आणि काळजीनें मनास त्रास करून घेऊं नये.

गाल्टन् ह्यानें अज्ञात प्रदेश पहाण्यास जाणाऱ्या प्र-

वाशांस जो उपदेश केला आहे, तो संसारपथाचें आक्रमण करितांनाहि उपयुक्त आहे. तो म्हणतोः—" आपल्या प्रवासाची गति कशी चालली आहे ह्याजकडे विशेष लक्ष द्यावें. आपला प्रवास केव्हां संपेल अशा उत्कंठेनें मन व्यग्र करूं नये. जेव्हां रानटी देशांतून सुधारलेल्या देशांजवळ आपण येऊं तेव्हां ही कटकट एकदांची संपेल, व संकटांतून कसेबसे पार पडूं असें मनास वाटतां कामा नये, तर साहसाच्या प्रसंगांनीं मनोहर झालेली वेळ निघून जाणार म्हणून खेद वाटला पाहिजे. अशा बुद्धीनें हळूहळू मार्गाक्रमण करावें, म्हणजे फारशीं संकटेंहि येणार नाहींत; व वाटेनें स्नेहसंबंध जडतील, आणि देशाची चांगली माहिती होईल. तेणेंकरून तसाच कांहीं भयंकर प्रसंग येऊन एकदम पळून जाण्याची जरूर पडल्यास आपणास बरीच मदत होण्याचा संभव आहे. अशा रीतीनें कांहीं महिने प्रवास केल्यावर मागें वळून पहावें म्हणजे आपण केवढ्या लांबीचा प्रवास केला म्हणून आपलें आपणासच आश्चर्य आणि कौतुक वाटेल. कारण दररोज आपण तीन मैल गेलों तरी एका वर्षांत एक हजार मैल विस्ताराचा मुलूख पाहून होईल, ही कांहीं लहान सहान गोष्ट नव्हे. मला वाटतें कीं, ससा आणि कांसव ह्यांची गोष्ट विस्तीर्ण आणि अज्ञात प्रदेशांतून जाणाऱ्या प्रवाशांस अनुलक्षूनच रचिलेली असावी. "

सकाळीं लवकर उठावें. स्नायूंना व मेंदूला योग्य व्यायाम व योग्य विश्रांति द्यावी. आहार नियमित असावा. जरूर तेवढी झोंप घ्यावी. कोणत्याहि गोष्टीबद्दल मनास

आंच लावून न घेतां समाधानवृत्ति ठेवावी. अशा रीतीनें वागलें असतां कामापासून कधींहि अपाय होणार नाहीं हें खातरीनें समजावें. हुरहूर, अस्वस्थता, काळजी आणि उतावीळपणा ह्यांच्या योगानें आपलें काम लवकर होण्याचें दूरच, पण त्यांच्या योगानें अकालीं मरण येतें. किंवा निदान भयंकर व्याधी जडतात. आनंदानें व समाधानवृत्तीनें वागलें असतां ज्याप्रमाणें व्यायाम आणि मोकळी हवा हीं शरीरास हितकर होतात, त्याप्रमाणें मानसिक श्रम आणि स्वतंत्र विचार हे मनास हितकर होतात. त्यांच्या योगानें आयुष्य कमी न होतां दीर्घच होतें.

( श्लोक )

सत्कार्यसंकल्प सदा धरावा ।
जेणें जगीं मान सदा रहावा ॥
ज्याला नुरे कार्य जगांत कांहीं ।
निर्माल्य तो केवळ होय पाहीं ॥ १

—शेक्सपीअर

( श्लोकार्ध )

सत्कर्मयोगें वय घालवावें । सर्वांमुखीं मंगळ बोलवावें ॥

—रामदास

निश्चय हें मुत्सद्याचें बुद्धिबल, वीराची तरवार, शोधकाची युक्ति व विद्वानाचा चिंतामणी होय. आपल्या परलोकवासी महाराणीसाहेब इतिहासांतील उत्तम राज्यकर्त्यांपैकीं एक होत्या असें समजतात. ह्याचें कारण काय ? त्या मोठ्या विचारी आणि धोरणी होत्या ह्यांत शंका नाहीं. पण त्यांचा विशेष गुण म्हटला म्हणजे हा कीं त्यांना काम करण्याचा मुळींच कंटाळा नसे. काम करण्यासंबंधानें त्यां-

चें काय मत असे हें एका गोष्टीवरून व्यक्त होईल. लार्ड मांट् इगल हा एकदां त्यांना कांहीं कामासंबंधानें भेटण्यास गेला असतां म्हणाला, मला आपणांस तसदी द्यावी लागली ह्याबद्दल मी दिलगीर आहें. तेव्हां त्या म्हणाल्या, "तसदी हा शब्द माझ्याजवळ कधीं बोलूं नका. हें काम कसें केलें असतां चांगलें होईल तें मला सांगा म्हणजे मी तें मनापासून करीन."

ह्या जगामध्यें जें कर्तव्य किंवा धंदा आपल्या शिरावर पडला असेल. तो उत्तम रीतीनें करण्याचा यत्न करावा.

, ड्यूक ऑफ् वेलिंगटन् ह्यानें जे जय मिळविले त्यांचें कारण तो चांगला सेनापति असून आणखी व्यवहारचतुर होता हें होय. फौजेस लागणारी अन्नसामग्री व इतर सामान वगैरे किरकोळ बाबतींत देखील तो बारकाईनें मन घालीत असे. त्याच्या घोड्यांना भरपूर दाणावैरण मिळत असे, व शिपायांना चांगलें अन्न व भरपूर वस्त्रें प्रावरणें मिळत असत.

सालोमन म्हणतो. "जो मनुष्य आपला धंदा काळजीनें करितो तो केव्हां तरी राजापुढें उभा रहाण्याच्या मानास पात्र होईल." सेंट पाल म्हणतो, "आपल्या धंद्याच्या कामांत कधीं आळस करूं नये. धर्मशील मन ठेवावें, व ईश्वराची भक्ति करावी."

उद्योगापासून कांहीं ना कांहीं फल प्राप्त होतेंच. कोलंबस हा हिंदुस्थानाचा मार्ग शोधून काढीत असतां, त्याला अमेरिकाखंड सांपडलें. व सॉल ह्याला गाढवें शोधीत असतां राज्य मिळालें.

फ्रांकलिन् म्हणतो, आपलें कर्तव्य करण्याचा दृढनिश्चय करा, व जें करण्याचा निश्चय तुम्हीं केला तें काम केल्यावांचून कदापि सोडूं नका.

कांहीं लोकांस असें वाटतें कीं, ज्याला बुद्धि आहे त्याला उद्योगाची जरूर नाहीं. कांहीं लोकांसंबंधानें आपण असें ऐकतों कीं, त्यांनीं विद्यालयांत असतां आपला बहुतेक वेळ आळसांत घालवून परीक्षेच्या सुमारास कांहीं महिने रात्रीचा दिवस करून व डोक्यावर गार पाण्याची पट्टी ठेवून अभ्यास केला, आणि परीक्षेंत बरेच वर आले. पण त्या लोकांस थंड पाण्याच्या पट्टीबद्दल पुढें चांगलें प्रायश्चित्त मिळालें हें खूप समजा. अशा लोकांस देखील शेवटीं शेवटीं कां होईना, पण कष्ट करावे लागलेच. मोठमोठ्या लोकांनीं जें यश संपादन केलें आहे तें बुद्धीपेक्षां उद्योगाच्याच योगानें मिळविलें आहे, असें त्यांच्या शाळेंतील वृत्तांतावरून दिसून येईल. नेपोलियन, क्लाइव्ह, स्काट् व शेरिडन् हे शाळेंत असतांना फार जडबुद्धीचे होते अशी प्रसिद्धि आहे.

कांहीं लोक इतरांपेक्षां अधिक बुद्धिमान् असतात ही गोष्ट खरीच आहे. पण असें समजा कीं, दोन मनुष्यांनीं संसार करण्यास एकदम सुरवात केली आहे. त्यांपैकीं एकजण फार तैलबुद्धीचा आहे, पण निष्काळजी, आळशी, आणि चैनी स्वभावाचा आहे; दुसरा साधारण बुद्धीचा पण दीर्घोद्योगी, काळजीनें काम करणारा, व सद्वर्तनाचे उत्तम नियम ज्याच्या मनांत बाणलेले आहेत असा आहे. तर ह्यांपैकीं दुसरा पहिल्यास खातरीनें मागें टाकी-

ल. एकंदरींत उद्योगहीन पण बुद्धिमान् मनुष्याच्या हातून जें काम होईल त्यापेक्षां बुद्धिहीन पण उद्योगी अशा मनुष्याच्या हातून अधिक काम होईल ह्यांत शंका नाहीं.

मनुष्यास जगांत कितीहि उत्कृष्ट साधनें असोत, केवढीहि अचाटबुद्धि असो, व कितीहि श्रीमंत व वजनदार सोयऱ्याधायऱ्यांचा वशिला असो; उद्योग आणि सद्वर्तन ह्यांची उणीव कशानेंहि भरून येणार नाहीं.

लिंकनचा बिशप ग्रोसेट, हा मोठा वजनदार मुत्सद्दी होता. त्याचा एक आळशी भाऊ त्याजपाशीं आला आणि म्हणाला कीं, तूं आपलें वजन खर्च करशील तर मला मोठ्या योग्यतेस चढविणें तुला अगदीं सुलभ आहे. तेव्हां तो बिशप म्हणाला "बाबारे, तुझा नांगर मोडला असेल तर तो नीट करण्यास लागणारा पैसा मी तुला देईन; किंवा तुझा बैल मेला असेल तर मी तुला नवा घेऊन देईन; पण तुला मोठ्या पदवीस चढविण्याचें माझ्या हातांत नाहीं. तुला मी नांगऱ्याच्या स्थितींत पहात आलों व सदोदित तुला त्याच स्थितींत रहावें लागणार असें मला वाटतें."

( ओंवी )

धरूनि पराची आस। प्रयत्न सांडी सावकाश ॥
निसुगाईचा संतोष। मानी तो एक मूर्ख ॥ १

—रामदास

महाकवि मिल्टन् ह्याची बुद्धि विशाल होती त्याप्रमाणें त्याचा उद्योगहि जबरदस्त होता. त्यानें आपल्या वर्तनक्रमाचें वर्णन स्वतः लिहून ठेविलें आहे तें असें:— "हिंवाळा असो किंवा उन्हाळा असो, मी पहांटेस उठतों,

व चांगले चांगले ग्रंथ वाचतों किंवा दुसऱ्याकडून वाचवून श्रवण करितों. तें कोठपर्यंत तर चित्त सावधान होऊन स्मरणशक्तीची भूक निवेपर्यंत. नंतर धर्म आणि स्वदेश-स्वातंत्र्य ह्या दोन बाबतींत जी देशसेवा करण्याविषयीं मनास स्फूर्ति होईल ती आपल्या शरीराचें आरोग्य राखून निर्मल अंतःकरणानें व तत्परतेनें करावयास लागतों. ”

कोणाचें कसलेंहि कर्तव्य असो; तें नीरस व कंटाळवाणें आहे अशी कल्पना मनांत आणूं नये. आपल्या मनांत असेल तर तेंच काम मनोरंजक करून घेण्याचें आपल्या हातीं आहे. आपल्या कामांत पूर्णपणें मन घालावें. त्याचें पूर्ण स्वरूप ओळखून घ्यावें. त्यांतील कार्यकारणभाव व पूर्वपीठिका ध्यानांत आणावी. त्याचा सर्व दिशांनीं विचार करावा. अगदीं हलक्या प्रतीच्या कामाचा देखील किती लोकांच्या हिताशीं संबंध आहे ह्याचा विचार करावा. अशा रीतीनें कसलेंहि कर्तव्य असलें तरी त्या संबंधानें आपणांस उल्हास वाटल्यावांचून रहाणार नाहीं. आपल्या कर्तव्याविषयीं आपल्या मनांत प्रेमबुद्धि उत्पन्न होईल, व तें करतांना आपणांस आनंद वाटेल, तर तें आपल्या हातून सुलभ रीतीनें पार पडेल. पहिल्या पहिल्यानें अशा प्रकारचें वर्तन जरा अवघड जाईल, व ही एक प्रकारची हमाली आहे असें वाटेल. पण हा अवघडपणा, पर्वतावरील हवेप्रमाणें आमच्या मनास शक्तिवर्धक होईल.

आतांपर्यंत श्रमाविषयीं विवेचन झालें. आतां विश्रांतीसंबंधानें कांहीं सांगितलें पाहिजे. झोंपेस किती वेळ द्यावा हा एक प्रश्न आहे. व तो ज्याच्या त्याच्या प्रकृ-

तीवर अवलंबून आहे. कांहीं लोकांस अधिक झोंपेची जरूर असते, व कांहीं लोकांस कमी झोंप पुरते. प्रकृतिमानानें जेवढी झोंप पाहिजे त्याहून कमी घेणें हें अपायकारक आहे. खऱ्या झोंपेंत गेलेला वेळ फुकट गेला असें कधीं समजूं नये. ज्ञानतंतूंचा क्षय भरून काढणारें रामबाण औषध झोंपेशिवाय दुसरें नाहीं. शहरवासी लोकांस झोंप हवी तेवढी बहुधा मिळत नाहीं.

सर एडवर्ड कोक ह्यानें आपल्या कालाची व्यवस्था अशी केली होती कीं, दिवसाच्या चोवीस तासांपैकीं झोंपेंत सहा तास, कायद्यांच्या अभ्यासांत सहा, ईश्वरभक्तींत चार, आणि बाकी राहिलेले सृष्टीच्या अभ्यासांत घालवावयाचे.

सर विल्यम जोन्स् ह्यानें ह्या नियमांत थोडासा बदल केला होता, तो असाः—झोंपेला सात तास, कायद्याच्या अभ्यासांत सहा, जगांतील व्यवहाराकडे दहा, आणि ईश्वर चिंतनांत सर्व; म्हणजे कोणतेंहि काम करीत असतां ईश्वराची आठवण ठेवावयाचीच.

पण सहा किंवा सात तासांची झोंप सर्वांनाच पुरेशी होईल असें वाटत नाहीं. आपण इतकी झोंप घेतली पाहिजे कीं, उठल्यानंतर आपल्या अंगीं थकवा न रहातां आपणांस हुषारी वाटली पाहिजे.

असो, उद्योगाचा एक मोठा उपयोग सांगावयाचा राहिला. तो हा कीं, दुःखाच्या प्रसंगीं उद्योगाच्या योगानें आपल्या विचारास नवी दिशा लागून दुःखाचा विसर पडतो, व मनाचें शांतवन होतें. मनुष्यास जोंपर्यंत कांहीं

तरी कर्तव्य आहे, जोंपर्यंत त्याच्या प्रेमास पात्र अशी कांहीं तरी वस्तु आहे, व जोंपर्यंत त्याला कांहीं तरी मनोरथ आहे, तोंपर्यंतच ह्या जगांत सौख्य आहे. आपणास रिकामपण असलें कीं, भलत्याच प्रकारची भीति व भलत्याच प्रकारची काळजी मनांत येऊन असह्य वेदना होतात. म्हणून नेहमीं कांहीं तरी उद्योग करीत रहावें. विपत्तीच्या प्रसंगीं शोक करीत बसण्याऐवजीं कांहीं तरी उद्योग आणि सुविचार ह्यांत काळ घालविला तर आपल्या मनास शांति प्राप्त होईल.

लिली म्हणतो, शहाण्या मनुष्यास प्रत्येक स्थल हें एकाद्या विस्तीर्ण देशाप्रमाणें विविधचमत्कारपूर्ण आहे, व ज्याची समाधानवृत्ति आहे त्याला कोणतेंहि स्थल एकाद्या राजवाड्याप्रमाणें आहे. प्रकृतीच्या धोरणानेंच काम करावें; तिच्या विरुद्ध दिशेनें काम करूं नये. तथापि तसाच प्रसंग आल्यास तसेंहि करण्यास डगमगतां कामा नये. पण बहुधा असे प्रसंग फारसे येत नाहींत, व आपण योग्य रीतीनें वागल्यास प्रकृति आपल्या कामाच्या आड न येतां उलटी मदतच करील.

जो सृष्टीच्या एका नियमाविरुद्ध वागतो तो सर्व नियमांचें उल्लंघन करण्याच्या दोषास पात्र होतो. त्याच्यावर सकल विश्व जणूं काय आपलीं सर्व शस्त्रास्त्रें घेऊन धांवतें; सर्व सृष्टि आपल्या असंख्य शक्तींच्या योगानें त्याच्यावर व त्याच्या संततीवर आपलें वैर उगविण्यास उद्युक्त होते, व ती केव्हां व कोठें तें उगवील ह्याला नियम नाहीं. पण जो मनुष्य सृष्टीचे नियम मनोभावेंक-

रून पाळतो त्याला जगांतील सर्व वस्तू साह्यकारी हो-तात. जड विश्वाशीं त्याचा सख्यभाव होतो. त्याला आ-काशांतील सूर्य व पायाखालील मृत्तिका व इतर सर्व वस्तु साह्यकारी होतात. कारण ज्या परमेश्वराच्या इच्छेप्रमाणें तो वागतो त्यानेंच सूर्य, मृत्तिका व इतर वस्तू निर्माण केल्या, व त्यांस अबाधित नियम घालून दिले आहेत.

( श्लोक )

यान्ति न्यायप्रवृत्तस्य । तिर्यञ्चोपि सहायताम ॥
अपंथानं तु गच्छंतं । सोदरोपि विमुञ्चति ॥ १

**भावार्थः**—न्यायानें जो वागतो त्याला पशुपक्षी देखील सहाय होतात. जो अन्यायानें वागतो त्याला प्रत्यक्ष बंधु देखील सोडतात.

( अभंग )

सर्वभावें आलों तुजचि शरण । कायावाचामनासहित देवा ॥ १

आणीक दुसरें नेणें माझ्या मना । राहिली वासना तुझे पायीं ॥ २

—तुकाराम

# प्रकरण १४

## श्रद्धा

पृथ्वीवरील खानेसुमारीची माहिती ज्या पुस्तकांत आहे त्यांवरून आपणांस असें समजतें कीं. सर्व जगामध्यें बौद्ध धर्माचे लोक चाळीस कोटी आहेत, ख्रिस्ती धर्माचे पसतीस कोटी, हिंदु धर्माचे वीस कोटी. व मुसल्मानी धर्माचे पंधरा कोटी आहेत. परंतु, सेल्डन् नामक ग्रंथकार असें म्हणतो कीं, " पुष्कळ लोक आपणांस एकाच धर्मातले म्हणवितात, ह्याचें कारण वितंडवाद नको असतो एवढेंच होय. पण खरें पाहूं गेलें तर धर्माच्या सर्व बाबतींत ज्यांचें ऐक्य आहे अशीं माणसें हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीं देखील कोठें मिळतील कीं नाहींत ह्याची शंकाच आहे. " ह्या म्हणण्यांत फार अतिशयोक्ति आहे, तथापि सत्याचाहि भाग बराच आहे. अशी स्थिति असणें ह्यांत कांहीं मोठेंसें नवल नाहीं. कारण खरें म्हटलें तर ह्या जगासंबंधें देखील आपलें ज्ञान जर इतकें अल्प आहे, तर परलोकांविषयीं आपणांस अधिक ज्ञान कोठून असणार ?

" जो परलोक आपणांस श्रद्धेच्या बळानेंच जाणतां येतो, व जो नजरेनें पहाण्याचें तर मुळींच साधन नाहीं, त्याची गोष्ट क्षणभर राहूं द्या; पण आमच्या आत्म्याच्या अनंत आयुष्याचा चालू भाग ज्याच्यावर आपण घालवीत आहों तें आश्चर्यकारक जग देखील अनेक मोठमोठ्या गूढांनीं परिपूर्ण आहे. एक घटकाभर एकाद्या रानांत जाऊन पहा. तेथे झाडांवर पोसत असलेल्या कळ्या, किंवा नुक-

तींत फुटत असलेली हिरवीगार पालवी तुमच्या दृष्टीस पडेल. व दरवर्षाप्रमाणें वसंतऋतु आपल्या ऐश्वर्याचा रमणीय प्रभाव प्रकट करण्याच्या बेतांत आहे, असें तुम्हांस समजून येईल. तुमच्या सभोंवतीं जिकडे तिकडे एका अज्ञेय शक्तीचा खेळ चालला आहे अशीं चिन्हें तुम्हांस दिसतील. पण ती शक्ति तुम्हांस दिसत नाहीं, तिला हातानें स्पर्श करितां येत नाहीं, तिची व्याख्या करितां येत नाहीं, ती मोजतां येत नाहीं, तिचें स्वरूप कळत नाहीं. ती शक्ति तुमच्या डोक्यावरील प्रत्येक फांदींत व तुमच्या पायांखालील गवताच्या प्रत्येक पानांत वास्तव्य करीत असते, आणि मौनभाव धरून, शांतपणानें व अदृश्य रीतीनें आपलें काम मोठ्या नेटानें करीत असते."

शंका ही तत्त्वज्ञानाचा मूळ पायाच आहे असें म्हटलें तरी चालेल. आपण अज्ञेयवस्तूंनीं परिपूर्ण अशा जगांत रहात आहों. आम्हांस एकाद्या साधारण फुलाचें किंवा किड्याचें देखील स्वरूप समजत नाहीं. मग जी वस्तु अनादि व अनंत आहे तिचें आकलन आपणांस कसें होणार? डॉक्टर मार्टिनो म्हणतो:—"परमात्मा सर्व आकाश व्यापून आहे, व त्यानें मौनभाव धारण केलेला आहे, असे त्याचे दोन गुण सर्वांस समजण्यासारखे आहेत; व जेव्हां दिवसाच्या सर्व काळज्या सायंकाळच्या थंडवेळीं विराम पावतात, जेव्हां क्षुद्रचिंतेनें व्यग्र झालेलें मन चिंतनाच्या विस्तीर्ण प्रदेशांत फिरूं लागतें, जेव्हां पृथ्वीवर सर्वत्र सामसूम होऊन ती नक्षत्रजडित अफाट चांदव्याखालीं जणूं

काय निद्रिस्त झाल्यासारखी दिसते, अशा वेळीं परमात्म्यानें अवर्णनीय सान्निध्य आपणांसभोंवतीं दिसून येतें; तो रात्रीच्या थंडगार वायूनें आपणांस जागृत करितो; व आकाशांत लखलखणाऱ्या त्या पुरातन दीपांच्या द्वारें आपणांकडे निरखून पाहतो."

**जॉन स्टुअर्ट मिल** म्हणतोः—"मानवी आयुष्य अव्यक्त तत्त्वानें व्यापिलेलें आहे. आमचें अल्प आयुष्य एक लहानसें बेट असून तें काल आणि आकाश ह्या दोन अनंत महासागरांनीं वेष्टिलेलें आहे. त्यांचें विस्तीर्णत्व व अज्ञेयत्व पाहून आपल्या मनोवृत्ति विस्मित होतात, व कल्पनाशक्ति थक्क होऊन जाते."

( श्लोक )

अव्यक्तादीनि भूतानि । व्यक्तमध्यानि भारत ॥
अव्यक्तनिधनान्येव । तत्र का परिदेवना ॥ १

—भगवद्गीता

**भावार्थः**—प्राण्यांचा आदि व अंत आपणांस कळत नसून फक्त मध्य मात्र कळतो. तर त्यांच्याविषयीं शोक करण्यांत काय अर्थ आहे ?

ह्याप्रमाणें आपण कोठून आलों व कोठें जाणार ह्यांसंबंधानें आपणांस नेहमीं अज्ञानदशेंत रहावें लागत आहे, व त्या प्रश्नाचा निर्णय करण्याचें काम लांबणीवर पडत आहे. तथापि त्यामुळें आपणांस निराश होण्याचें कारण नाहीं.

( श्लोक )

हें अल्प जीवित जिचाच विभाग आहे ।

• तो थोर ईशरचना क्षणभंगि नोहे ॥
पावेल पूर्ण फल तों, विरमे कदा ना ।
तत्सूत्र आयु सरल्यावरिही तुटेना ॥ १

ह्या जगांत पुष्कळ गोष्टी अशा आहेत कीं, त्यांचा आपणांस अनुभव येतो. पण त्यांचा खुलासा म्हणून करितां येत नाहीं. हा प्रकार केवळ धर्माच्याच बाबतींत घडतो असें नाहीं. वेळ ही काय वस्तु आहे म्हणून कोणीं विचारिलें तर सांगतां येत नाहीं. पण वेळ म्हणून एक वस्तु आहे ह्याबद्दल आपणांस शंका वाटत नाहीं.

वेस्ले म्हणतोः "हे परमेश्वरा! वितंडवादास कंटाळून मी तुझ्या चरणाजवळ शरण आलों आहें. माझ्या अंतःकरणांत तुझ्या भक्तीची ज्वाला प्रदीप्त झाली आहे. तूंच मला सत्य आणि सन्मार्ग दाखविशील. माझ्या जीवांत जीव आहे तोंपर्यंत मी तुझे पाय सोडणार नाहीं."

( अभंग )

ठेवा जागींच गुंडून । एथे भावाचें प्रमाण ॥ १
एका अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरीराज ॥ २
होणें तर्कवितर्कासि । वाव नलगे सायासासी ॥ ३
तुका म्हणे भावाविण । अवघा बोलती तो शीण ॥ ४

—तुकाराम

कांहीं लोक ईश्वराविषयीं अतिशय माहिती सांगण्याचा आव घालितात; त्यांना असें वाटतें कीं, ईश्वरानें जी जी वस्तु निर्माण केली ती ती कशी केली व काय हेतूनें केली तें आपणांस पूर्णपणें समजतें; अमुक वस्तूचें अमुक कारण आहे व अमुक गोष्ट घडली ती ईश्वराचें सदयत्व अमुक रीतीनें दाखविते असें सिद्ध करण्यास ते

नेहमीं तत्पर असतात. हें विश्व एकसारखें चालू ठेवण्यांत ईश्वराचें केवढें कौशल्य आहे म्हणून त्याला शाबासकी देण्याचेंहि धाडस करितात. अशा प्रकारच्या लोकांच्या निःशंक वल्गना ऐकून समाधान न होतां माझें मन साशंक होतें, व त्यामुळें मला जें दुःख होतें तें सांगतां येत नाहीं ”

डीन स्टान्ले ह्या नांवाचा एक साधु असें म्हणतो कीं, जगांत जीं धर्ममतें व जे धर्मवाद आहेत त्यांमधील विरोध मोडावे व ज्या उच्च तत्त्वांपासून आपली खरी उन्नति होते त्या तत्त्वांवर निश्चल दृष्टि ठेवावी, हा माझ्या आयुष्याचा मुख्य हेतु आहे.

हर्बर्ट स्पेन्सर म्हणतो, ह्या विश्वांतील[1] गूढांचा जसजसा विचार करावा तसतशीं तीं अधिकच गूढ होतात. तथापि ह्या सर्व अव्यक्तांच्या समुदायामध्यें एक गोष्ट पूर्णपणें व्यक्त आहे; ती ही कीं, मनुष्यप्राणी हा सदोदित एका अनंत व सनातन आदिशक्तीच्या सन्निध आहे. व त्याच शक्तीपासून सर्व वस्तूंचा उद्भव होतो.

म्हणून धर्माच्या बाबतींत आपणांस अनुभवजन्य बोध होतो एवढ्यावर आपण तृप्त राहिलें पाहिजे. आपणांस अमुक गोष्टींची व्याख्या किंवा वर्णन करितां येत नाहीं म्हणून असंतोष मानण्यांत कांहीं फायदा नाहीं.

जगांत ज्या मतभेदांच्यामुळें निरनिराळे पंथ उत्पन्न आले आहेत, त्यांपैकीं बहुतेकांस, धर्म ह्या नांवापेक्षां पक्ष अथवा तट हेंच नांव अधिक शोभेल.

१ मार्टिनो

खरी ईश्वरप्राप्ति शब्दजालापासून होत नाहीं, तर धर्मशील व भक्तियुक्त आचरणापासून होते. बहुतेक लोकांची धर्मश्रद्धा म्हणजे पक्षाभिमान, पक्षांधत्व व सर्व जगाशीं वितंडवाद ह्यांशिवाय दुसरें कांहीं नसतें. अमुक मनुष्य कोणत्या धर्माचा आहे असें विचारलें, म्हणजे तो कोणत्या तटाचा आहे, त्याच्या पंथाचीं काय मतें आहेत, असाच आपणांस त्या प्रश्नाचा बोध होतो. पण त्या मनुष्याचें आचरण कोणत्या प्रकारचें आहे ह्याचा त्या प्रश्नांत अंतर्भाव होतो असें आपण समजत नाहीं. जे लोक आपल्या पक्षासाठीं अतिशय कळकळ दाखवितात त्यांची योग्यता फार मोठी मानण्यांत येते; मग ते कितीहि लोभी, आचारहीन, भांडखोर आणि अभिमानी असले तरी चालतात. पदार्थविज्ञानशास्त्राचा ज्यांना व्यासंग आहे अशा लोकांवर नास्तिकपणाचा वृथा आरोप कधीं कधीं करण्यांत येतो; पण खरें म्हटलें तर त्या शास्त्रापासून धर्माचें ज्ञान होण्यास बरीच मदत होते. शास्त्रविशारद लोक ज्या शंका प्रकट करितात त्या उपहासबुद्धीनें करीत नाहींत. त्या शंका ईश्वराविषयीं पूज्यभावच व्यक्त करितात.

( श्लोक )

श्रद्धा चला, परि असे कृति शुद्ध ज्याची ।
तो काढितो भजनमार्ग पुढें सुखेंची ॥
जो सत्यनिष्ठ नर संशयमग्न झाला ।
तो दांभिकापरिस धार्मिक मन्मतीला ॥ १

—टॅनिसन्

शास्त्रनिष्णात लोकांवरील आरोप खरे मानण्यापूर्वीं

आपण त्यांचें म्हणणें तरी काय आहे हें समजून घेऊं. अशा लोकांपैकीं अग्रगण्य , गुरुवर्य टिंडल हा म्हणतो:— " ह्या विश्वांत प्रकट होणाऱ्या आदिशक्तीला देहधारी किंवा अन्य तऱ्हेचा दृश्य आकार मी कल्पूं लागलों, म्हणजे ती माझ्यापासून निसटून जाते, व माझ्या बुद्धीला कुंठित करून टाकिते. त्या आदिशक्तीला ' तो ' हें सर्वनाम लावण्याची मला छाती होत नाहीं. तिला चित् किंवा मन ही संज्ञा देण्याचा धीर मला होत नाहीं. तिला ' कारण ' हेंहि नांव देणें मला प्रशस्त वाटत नाहीं. तिची अव्यक्तता मला घोर अंधारांत निमग्न करून टाकिते. " गुरुवर्य हक्स्ले हा अज्ञेयवादी आहे. पण तो देखील म्हणतो, " देवळें असावीं, पण त्यांमध्यें निरनिराळ्या मतांची काथ्याकूट करण्यांत वेळ घालवूं नये. जेणेंकरून सत्य, न्याय आणि शुद्ध आचरणाच्या उदात्त कल्पना लोकांच्या मनांवर ठसतील अशा प्रकारचीं कीर्तनें तेथे व्हावीं. सारा दिवस कष्टानें व काळजीनें भागलेल्या लोकांस तेथे क्षणभर विसावा मिळून सर्वांस साध्य अशा उन्नत जीविताचा थोडासा विचार करण्याची संधि मिळावी. तेथे प्रपंचांत गुंतलेल्या लोकांस समाधानवृत्ति आणि परोपकार ह्यांच्यापुढें आपले मोठमोठे मनोरथ किती क्षुद्र आहेत हें समजण्याचें साधन मिळावें. "

धर्माच्या ग्रंथांमध्यें लोकांस समजेल अशी भाषा योजिलेली असते. सबब त्या भाषेचा शब्दशः अर्थ करून त्या ग्रंथांचा खरेखोटेपणा ठरविणें रास्त नाहीं. मोठमोठे कवि " सूर्य उगवला " असें म्हणतात, म्हणून त्यांना

ज्योतिःशास्त्राचें ज्ञान नाहीं असें कोणी म्हणेल काय ? शास्त्रीय शोधांचें वर्णन करितांना निराळ्याच भाषेची योजना करावी लागते. एकाद्या फुलाची किंवा दगडाची यथार्थ व्याख्या करण्याचें काम जर नवीन शब्द रचिल्यावांचून होत नाहीं, तर जो अनंत आहे त्याचें यथार्थ वर्णन मानवी भाषेनें कसें होईल ? जे परिणाम मज्जातंतूच्या विकारापासून होतात असें आपणांस हल्लीं कळलें आहे, ते दैत्यांनीं घडविले असें प्राचीन ग्रंथकारांनीं त्या वेळच्या लोकांच्या समजुतीप्रमाणें लिहिलें तर त्यांत मोठेंसें नवल नाहीं.

जें आपणांस मुळींच समजत नाहीं त्याचें स्वरूप अमुक प्रकारचें आहे अशी श्रद्धा बाह्यात्कारीं दर्शविण्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. ज्या गोष्टीचा भरपूर पुरावा नाहीं तीवर विश्वास ठेवण्यापासून कांहीं उपयोग नाहीं. व तशा गोष्टीवर विश्वास ठेवणें अशक्य आहे. उलट पक्षीं ज्या गोष्टीबद्दल भरपूर पुरावा आहे तिच्यावर विश्वास ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे, व जिच्याबद्दल तसा पुरावा नसेल त्या गोष्टीसंबंधानें ठाम मत करूं नये. पुष्कळ लोकांची अशी समजूत असते कीं, कोणत्याहि गोष्टीसंबंधानें आपला विश्वास तरी असावा, किंवा अविश्वास तरी असावा. पण अशा पुष्कळ गोष्टी आहेत कीं त्यांच्यावर विश्वास ठेवण्यास किंवा अविश्वास ठेवण्यास पुरेशीं कारणें नसतात.

खरी श्रद्धा ही केवळ बुद्धिसामर्थ्याचा परिणाम नव्हे. जो भाव ठेवावा म्हणून साधुसंत सांगत आले तो भाव

मन:पूर्वक पाहिजे. व तो आचरणांत दिसून आला पाहिजे. आचरणाशीं ज्याचा मेळ नाहीं तो भाव मिथ्या होय. सेल्डन् ह्यानें भाव आणि क्रिया ह्यांना प्रकाश आणि उष्णता ह्यांची उपमा दिली आहे. दिव्याचा प्रकाश आणि उष्णता हीं पृथक् आहेत अशी कल्पना आपल्या बुद्धीस करितां येते. पण दिवा मालविला म्हणजे ह्या दोन्ही वस्तु एकदम नाहींतशा होतात.

( ओंवी )

गोडी आणि गुळु । कापर आणि परिमळु ॥
निवडूं जातां पांगुळु । निवाडू होय ॥ १

—अमृतानुभव

जेथे जेथे श्रद्धेसंबंधानें वर्णन केलें आहे तेथे तेथे आचरणाचा निकट संबंध दाखविला आहे. भावाच्या बलानेंच हरिश्चंद्रानें राज्याचा त्याग केला; प्रल्हादानें आपल्या बापाचा छळ सोशिला; ध्रुवानें ईश्वरप्राप्ति करून घेतली; व सावित्रीनें आपली पतिनिष्ठा दाखविली. खऱ्या आणि निःसीम भावावांचून त्यांच्या हातून तसें आचरण घडलें नसतें. त्यांनीं जो भाव ठेविला, तो सबळ कारणावांचून ठेविला नाहीं ह्यांत शंका नाहीं. लोक त्यांची कीर्ति गातात त्याचें कारण हेंच आहे कीं, आपलें कर्तव्य अमुक आहे असें समजल्यावर कितीहि दुःखें व संकटें आलीं तरी त्यांची पर्वा न करितां तें त्यांनीं तडीस नेलें. ज्या गोष्टीचा निश्चयात्मक पुरावा नाहीं त्या गोष्टीसंबंधानें आस्तिक्य किंवा नास्तिक्य बुद्धि न धरितां, आपले विचार स्तंभित ठेवावे. अशा पुष्कळ गोष्टी असतात कीं, त्यांच्याविषयीं संदिग्धवृत्ति ठेवणें हेंच आपलें कर्तव्य असतें.

( श्लोक )

हे सर्व पंथ आमुचे अचिरायु होती ;
आहेत आज, विलयास उद्यांहि जाती ॥
ते अल्प तेज तव दाखविती जनांला ।
तूं थोर त्यांहुनि विभो असशी दयाला ॥ १

—टेनिसन

( श्लोक )

जसे वर्णिती अंध बैसोनि हस्ती ।
धरूनी तदंगासही स्वस्वहस्तीं ॥
तुतें वर्णिती अज्ञ जैशा प्रकारें ।
तयां वाटसी तूं तसा त्या विकारें ॥ १
जया सांपडे हस्तिचा पाय हस्तीं ।
वदे तो स्वयें स्तंभरूपेंचि हस्ती ॥
जया सांपडे कान तो शूर्प दावी ।
अशी आत्मता सर्व शास्त्रीं वदावी ॥ २

—वामन

आपल्या अज्ञानाचा पडदा हळू हळू वर चढत आहे. तथापि अनेक प्रश्नांसंबंधानें आपणांस तूर्त अज्ञानावस्थेंत रहाणें भाग आहे.

" ज्या गोष्टींशीं आमचा निकट संबंध आहे त्यांचें देखील आपणांस अपूर्ण ज्ञान होतें; पण तेवढ्यावर आपण संतोष मानला नाहीं तर आपणांस ह्या जगांत मुळींच सुख होणार नाहीं. अज्ञानरूपी ढगामध्यें राहून आपणांस सुखानें श्वासोच्छ्वास करितां येत असेल तरच आपल्या हातून शक्तीचीं कार्यें होतील, व तीं करण्यांत आपणांस सौख्य वाटेल. त्या ढगाला केव्हां केव्हां छिद्रें पडतील

त्यांतून सत्य व सनातन वस्तूंचें थोडेंसें स्वरूप आपणांस दिसलें तर आपण आनंद मानला पाहिजे. जर आपणांस अनंत सत्याच्या प्रखर तेजांत ठेविलें असतें तर आपण कदाचित् होरपळून गेलों असतों. म्हणून हा अज्ञानरूपी पडदा आपणांस हितकरच आहे."

आपल्या आर्यधर्माचें जो लक्षपूर्वक अवलोकन करील त्याला असें दिसून येईल कीं तो अत्युच्च आणि सनातन तत्त्वांनीं परिपूर्ण आहे. त्यांत आत्मोन्नतीची अत्यंत श्रेष्ठ कल्पना सांगितली आहे. त्यांत धैर्य, शांति, भूतदया, स्वार्थत्याग, आत्मनिग्रह, नीतिमत्ता, शुद्धता आणि औदार्य इत्यादि गुण मोठमोठ्या मुनींनीं आणि संतांनीं आपल्या प्रासादिक वाणीनें व आपल्या पवित्र आचरणानें मूर्तिमंत उभे केले आहेत. त्यांतील उदात्त कल्पनांचा परिणाम आजपर्यंत लक्षावधि लहान मोठ्या लोकांच्या मनांवर होऊन त्यांस सन्मार्गाचें वळण लागलें आहे. ह्या धर्माचीं तत्त्वें सर्व जगभर पसरण्याचा रंग दिसूं लागला आहे. वरील गोष्टीचा जो क्षणभर विचार करील त्याला आर्यधर्माचा मनुष्याच्या खऱ्या उन्नतीशीं किती निकट संबंध आहे हें सहज कळून येईल.

परमेश्वराच्या ठिकाणीं अनन्यभक्ति, व प्राणिमात्रांविषयीं प्रेम हींच धर्माचीं मुख्य तत्त्वें आहेत. हीं दोन्ही तत्त्वें खालील ओंव्यांत सुंदर रीतीनें वर्णिलीं आहेत.

१ रस्किन्

( ओंव्या )

तूं मनबुद्धी साचेशीं । जरी माझिया स्वरूपीं अर्पिशीं ॥
तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥ १

—ज्ञानेश्वरी

जैसें उंचाहूनि उदक पडलें । तें तळवटवरी येऊं लागलें ॥
तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावचि तयांचा ॥ १
कां फळालिया तरूची शाखा । सहजें भूमीसी उतरे देखा ॥
तैसें जीवमात्रां अशेखां । खालावती ते ॥ २
अखंड अगर्वता होऊन असती । तयांची विनय हेचि संपत्ति ॥
जे जयजय मंत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ॥ ३

—ज्ञानेश्वरी

( श्लोक )

नात्मानमवमन्येत । पूर्वाभिरसमृद्धिभिः ॥

आमृत्योः श्रियमन्विच्छेन्नैनां मन्येत दुर्लभाम् ॥ १

—**मनु**

**भावार्थः**–आजपर्यंत आपला उदयकाल आला नाहीं म्हणून उमेद खचूं देऊं नये. मरेपर्यंत आपला अभ्युदय करण्याची खटपट करावी, व तो दुर्लभ आहे असें कधीं मानूं नये.

# प्रकरण १५

## सदाशा

औदार्यादि गुणांप्रमाणें आशेची सद्गुणांमध्येंच गणना केलेली पाहून कित्येकांस आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. पण निराशेच्या आधीन होणें हा जर दुर्गुण आहे, तर आशा हा एक सद्गुण आहे असें कबूल करणें भाग आहे. सहिष्णुता व दृढनिश्चय ह्या दोन गुणांच्या पोटीं आशेचा अंतर्भाव होतोच. म्हणजे ज्या मनुष्यास कोणत्याहि प्रकारची आशा नाहीं त्या मनुष्याच्या अंगीं वरील दोन गुण असण्याचा संभव नाहीं. सहिष्णुतेच्या योगानें मनुष्याचा मोठेपणा जसा व्यक्त होतो तसा एकाद्या पराक्रमाच्या कृतीनेंहि होत नाहीं. निःसीम प्रेम आणि सहिष्णुता ह्यांच्या योगानें अनेक स्त्रीरत्नें जगास वंद्य झालीं आहेत.

कोणत्याहि गोष्टीसंबंधानें मनास हुरहूर लावून घेऊं नये, कारण तसें केलें असतां त्या गोष्टीचा प्रतिकार होण्याचें दूरच राहून आपल्या प्रकृतीस अपाय मात्र होतो, व आपली कार्यक्षमता कमी होते. जोंपर्यंत मनुष्य निराशेला वश झाला नाहीं तोंपर्यंत त्याला खरोखर अपयश आलें असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं.

( श्लोक )

पावे पराजय जरी बलवान्निमित्तें ।
तेणें नरास न कदापि लघुत्व येतें ॥
सोडी भयें रण, मिळे स्वसुखें रिपूला ।
तैसा कलंक न दुजा मळवी यशाला ॥ १

—बट्लर

ज्यांना ह्या जगांत नांव घेण्यासारखी कांहीं कृति करावयाची आहे त्यांनीं संकटाच्या भीतीनें कांपत कांपत उभें राहून उपयोग नाहीं. जसा एकादा धाडसी पुरुष नदींत उडी मारून आपल्या बाहुबलानें पैलतीरास जातो, त्याप्रमाणें मनुष्यानें हिंमतीनें आणि बहादुरीनें वागून जगांत आपलें पाऊल पुढें टाकिलें पाहिजे. लोकांना खऱ्या संकटांपेक्षां काल्पनिक संकटांचीच अधिक भीति वाटते हें मोठें आश्चर्य आहे. उदाहरणार्थ, पुष्कळ लोक केवळ उपहासाच्या भीतीनें एकादें चांगलें कृत्य करण्यास देखील धजत नाहींत.

' जेथे लाज वाटण्याचें कांहीं कारण नाहीं तेथे कधींहि लज्जावश होऊं नये.

" भेकड लोकांस जिवंतपणीं देखील अनेक वेळां मृत्यु येतो. पण जे शूर आहेत त्यांना एकदांच मृत्यु येतो. "

पुष्कळ संकटें दुरून फार भयंकर दिसतात. पण त्यांचे जवळ जाऊन धैर्यानें तोंड दिलें असतां तीं मृगजळाप्रमाणें वितळून जातात.

( श्लोक )

तावद्भयस्य भेतव्यं । यावद्भयमनागतम् ॥
आगतंच भयं वीक्ष्य । प्रहर्तव्यमभीतवत् ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः**—संकट जोपर्यंत आलें नाहीं तोंपर्यंतच त्याची भीति बाळगावी; पण तें एकदां आलें म्हणजे धैर्य धरून त्याशीं टक्कर देणें हेंच उचित होय.

ज्या सेनेनें मोठमोठ्या लढाया मारल्या, तीच सेना रात्रीच्या वेळीं एकाद्या यत्किंचित् कारणानें गर्भगळित हो-

ऊन पळून गेली, अशा प्रकारचीं कैक उदाहरणें आपण इतिहासांत वाचतों. हें तर काय, पण दिवसा ढवळ्या देखील व्यर्थ भय आणि चिंता बाळगणारे लोक थोडे आहेत काय?

( ओंव्या )

एशा बहुत आपदा येती । जलबुद्बुदांपरी ज्या असती ।
विवेकवातें फुंकितां जाती । विलयातें क्षणार्धें ॥ १
तयांसी हृदयीं थारा देतां । शोषिती देहींच्या रक्ता ॥
पुष्ट होउनी क्षण न लगतां । अनिवार होती सर्वथा ॥ २

—बर्क

ज्या मनुष्यास आपल्या स्थितीविषयीं असंतोष वाटतो त्यानें आपल्या मनास असा प्रश्न करावा कीं, कोणत्या मनुष्याशीं माझ्या स्थितीची अदलाबदल केली असतां मला बरें वाटेल? कोणी आरोग्यसंपन्न असेल, कोणी मोठा धनवान् असेल, व कोणाला गृहसौख्याचा लाभ मिळत असेल. ह्यांपैकीं प्रत्येकाचें चांगलें तेवढें घेईन असें कोणी म्हणेल तर अर्थात् तें अन्याय्य होईल. जर कोणाला आपल्या स्थितीची अदलाबदल करावयाची असेल तर ती सर्व बाबतींत करण्यास तयार असलें पाहिजे. म्हणजे आपणास ज्या चांगल्या देणग्या असतील त्या सोडण्याची, व दुसऱ्याच्या विपत्ती घेण्याची तयारी पाहिजे. अशा दृष्टीनें आपण विचार केला म्हणजे दिसून येईल कीं कोणालाहि आपल्या स्थितीसंबंधानें असंतुष्ट असण्याचें कारण नाहीं.

कोलरीज् ह्यानें आपल्या मित्रास एका पत्रांत स्वतःविषयीं असा मजकूर लिहिला होताः—"जरी मला ही कष्टदशा प्राप्त झाली आहे, जरी मला एवढा अपमान सोसावा लागत आहे, व माझ्यावर नानाप्रकारचीं संकटें येत आहेत,

तथापि त्या सनातन प्रभूचें स्मरण मला सर्वकाळ होत असल्यामुळें माझ्या ठिकाणीं नेहमीं समाधानवृत्ति आहे, व जें काय मला भोगावें लागत आहे तें सर्व माझ्या कल्याणासाठींच आहे अशी मला पूर्ण खातरी वाटते."

मोठमोठ्या लोकांचा जर असा अनुभव आहे, तर आपण कधींहि निराश होऊं नये हेंच उचित आहे. सर्व गोष्टींना उपाय आहेत, पण निराशेला कांहीं उपाय नाहीं. थोड्याशा विपत्तीनें ज्याचें धैर्य गळून जातें त्याच्यासारखा दुर्दैवी कोणी नसेल.

( आर्या )

धृति-रत्न ढळल्यावरि मग सर्वचि गेलें लया किमपि नुरलें ॥
ऐशा भीरु नरानें जन्मुनि मातेस व्यर्थ कष्टविलें ॥ १

—गेटी

( श्लोकचरण )

दैवासही जिंकितसे सहिष्णुता ।

—क्यांपबेल्

( आर्या )

नैराश्या वश होउनि मनुज कदाही जरी न वर्तेल ॥
धैर्यें काल क्रमितां अजिचा दुर्दिन उद्यां न राहील ॥ १

—कूपर

( ओंवी )

पोटीं चिंता धरूं नये । कष्टें खेद मानूं नये ।
समयीं धीर सोडूं नये । कांहीं केल्या ॥ १

—रामदास

ज्याचे हातून चुका होत नाहींत असा एकहि मनुष्य नाहीं. जो मनुष्य ह्या जगांत कांहींतरी उद्योग करील त्याच्या हातून कधीं कधीं चुका होणें हें साहजिक आहे. त-

थापि जी चूक एकवेळ आपल्या हातून घडली•ती पुनः होऊं न देणें हें मात्र आपल्या स्वाधीन आहे. म्हणून आपल्या हातून जे दोष होतील त्यांपासून आपण बोध घेतला पाहिजे, व आपल्या वर्तनांत सुधारणा केली पाहिजे.

जोसेफ् ह्यूम ह्यानें असें म्हटलें आहे कीं, लाख रुपयांच्या मिळकतीपेक्षां समाधानवृत्तीची योग्यता मी अधिक समजतों, व ह्या दोहोंपैकीं कोणतीहि एक वस्तु निवडून घेण्यास जर कोणीं मला सांगितलें तर मी समाधानवृत्तीच मागून घेईन.

कृतीच्या संबंधानें पाहिलें तर वर्तमानकालाचें महत्त्व विशेष आहे ह्यांत शंका नाहीं. तथापि भूतकाल आणि भविष्यत्काल ह्यांचाहि विचार करणें महत्त्वाचें आहे. लोक वर्तमानकालासाठीं भविष्यत्कालाची हानि करून घेतात, क्षणिक सुखासाठीं पुढें येणाऱ्या अनेक वर्षांच्या सुखावर पाणी सोडतात, ह्यामुळेंच ह्या संसारांत येणाऱ्या बहुतेक संकटांचा उद्भव होतो.

( श्लोक )

यो ध्रुवाणि परित्यज्य। अध्रुवं परिसेवते ॥
ध्रुवाणि तस्य नश्यंति । अध्रुवं नष्टमेवच ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः**—जो हातचें सोडून पळत्याच्या पाठीं लागतो त्याच्या हातची वस्तु जाते, आणि पळणारी वस्तु मिळत नाहीं ती नाहींच.

वरील श्लोकांतील तत्त्व जर कोणी भविष्यत्कालाच्या सुखास लागू करील तर ती त्याची मोठी चूक होईल. कारण भविष्यत्काल हा अध्रुव नसून, तो खातरीनें येणारच

आहे; तेव्हां त्याची काळजी बाळगणें हें अत्यंत आवश्यक आहे.

" ज्याला गतकालाची आठवण सुखद होते, व ज्याला परलोकीं सद्गति मिळेल अशी पूर्ण आशा आहे, त्यासारखा सुखी मनुष्य दुसरा कोणी नाहीं. "

आपण भविष्यत्कालाचीच काळजी सर्वांत अधिक घेतली पाहिजे, ह्यांत कांहीं संशय नाहीं. हें विनाशी आणि क्षणभंगुर शरीर आपल्या आत्म्याचें कायमचें ठिकाण नव्हे. हें शरीर सोडल्यावर आपल्या खऱ्या आणि अविनाशी जीवितास आरंभ होणार आहे व त्याबरोबर येणाऱ्या सर्व सुखांचा अनुभव मिळणार आहे.

पुरुषाच्या अंगीं विशेषेंकरून पौरुष असलें पाहिजे, म्हणजे, धारिष्ट आणि कर्तव्याचा उत्साह हे गुण पाहिजेत. कारण,

( अभंग )

आपुल्याची शंका आपणां बाधती ॥
यत्न न करूं देती स्वहिताचा ॥ १

—शेक्सपिअर

धारिष्ट हा एक महत्त्वाचा सद्गुण आहे इतकेंच नाहीं, तर तो असल्यावांचून पौरुषाची पूर्णताच होत नाहीं. ज्याच्या अंगीं धारिष्ट नाहीं त्याला पुरुष हें नांव शोभत नाहीं. व जिच्या अंगीं सौजन्य नाहीं तिला स्त्री हें नांव शोभत नाहीं. तथापि पुरुषाला धारिष्टाबरोबर सौजन्यहि असलेंच पाहिजे, व स्त्रीला सौजन्याबरोबर धारिष्टहि पाहिजे.

अविचारीपणालाच धारिष्ट समजूं नये. संकटाविषयीं

१ रस्किन्

बेफिकीर असणें अथवा विनाकारण आपला जीव धोक्यांत घालणें ह्याचें नांव धारिष्ट नव्हे. संकट आलें असतां धीरानें त्याला तोंड देणें ह्यालाच धारिष्ट म्हणतात. अपरिहार्य कारणांमुळें आपणांवर संकटाचा प्रसंग आला तर त्यावेळीं भित्रेपणाचा स्वीकार केला असतां तो प्रसंग आहे त्याहून अधिक भयंकर होतो. अशा समयीं धैर्य आणि शांति यांचा अवलंब करणें हाच आपल्या संरक्षणाचा उत्तम मार्ग होय. रणांगणांतून शत्रूपासून पळून जाणें म्हणजे मृत्यूस पाचारण करणेंच होय.

( श्लोक )

यदि समरमपास्य नास्ति मृत्यो: ।
भयमितियुक्तमितोन्यत: प्रयातम् ॥
अथ मरणमवश्यमेव जंतो: ।
किमिति मुधा मलिनं यश: कुरुध्वं ॥ १

—वेणीसंहार

**भावार्थः—**

( श्लोक )

सजुनि रण जरीहि मृत्यु येतो ।
करुनि पलायन लाभ काय होतो ॥
जरि मरण चुकेच जंतुला न ।
तरि करितां यश कां वृथा मलीन ॥ १

" कोणत्याहि वस्तूविषयीं ज्या मानानें आपलें अज्ञान असेल, त्या मानानेंच त्या वस्तूची आपणांस भीति वाटत असते. संकटाचें खरें स्वरूप एकदां कळून तें पाहण्याची डोळ्यांस संवय झाली, म्हणजे त्याविषयींची भीति बरीच कमी होते[1]."

१ बर्क

" आशा मर्यादित असावी; पण जें प्राप्त झालें आहे त्यापासून जेवढें सौख्य मिळण्यासारखें आहे तेवढें घ्यावें, हीच हा संसार यशस्वी करून घेण्याची गुरुकिल्ली आहे. "

" मोठी हांव धरूं नये. आपला हेतु पूर्ण होण्यासाठीं उतावीळपणा करूं नये. योग्य समयाची वाट कशी पहावी हें ज्यांना समजतें त्यांना सर्व कांहीं साध्य होतें."

मनुष्य बहुधा आपल्याच सांवलीला फार भितो. तथापि आपण कितीहि सावधगिरीनें वागलों तरी कधीं-कधीं दुःखाचे प्रसंग यावयाचेच. पण ते आले असतां धैर्यानें सोसणें हें आपल्या स्वाधीन आहे. अशा प्रसंगीं आपले जे आनंदाचे दिवस गेले त्यांची आठवण करून समाधान मानावें. सहिष्णुतेनें मानसिक बल संपादन करणें हें अत्यंत उन्नतिकारक आहे. कसाहि वाईट प्रसंग आला तरी तो कालाच्या तडाक्यापुढें टिकत नाहीं ही एक समाधानाचीच गोष्ट आहे.

" आपल्या हृदयांत सत्य आणि प्रेम ह्यांचें वास्तव्य आहे तोंपर्यंत संकटांपासून आपली फारशी हानि होणार नाहीं. आपल्या डोळ्यांत दुःखाश्रु आले तर कांहीं वेळानें प्रेमाच्या योगानें आनंदाश्रु येतील. "

" हिंवाळ्यानंतर उन्हाळा येतो, रात्रीनंतर दिवस येतो, वादळानंतर हवा शांत होते. " आयुष्याचा मार्ग क्रमीत असतां कितीहि दुःखें येवोत, कालांतरानें त्यांचा विसर पडतोच. दुःखरूपी रात्रीनंतर आनंदरूपी दिवस खास उगवतो.

१ गेटी २ म्याकडोनल्ड

( श्लोक )

प्रसाद धरिं हे मना न करिं तूं विलापा कदा ।
प्रचंड घन दाटती, परि रवि प्रकाशे सदा ॥
त्वदीय गति वा असे सकळ लोकिं सामान्य ती।
मिळे सुखहि दुःखही न कुणि सौख्यची पावतो ॥ १

—लाँगफेलो

आपल्या स्थितींत कांहीं फेरफार झाला असतां प्रथमतः तो अहितकारक वाटला तरी तो खरोखर तसाच आहे कीं काय ह्याचा नीट विचार करावा. बाह्य देखावे कधीं कधीं आपणांस भूल पाडितात. ह्या जगांत लहानशा कारणांनीं आपण आपली उमेद खचूं देऊं नये. आपण प्रयत्न करीपर्यंत आपल्या हातून काय काय होण्यासारखें आहे हें आपणांस कळत नाहीं. कधीं कधीं विपत्ति आणि दुःख हे आपले वेषधारी मित्रच असतात. नेलसन् ह्याला एका डोळ्यानें दिसत नव्हतें, पण त्याचाहि तो उपयोग करून घेत असे. तो असा कीं, तो समुद्रावर लढाईंत गुंतला असतां वरिष्ठ अंमलदारानें मागें फिरण्याचा बावटा चढविला, आणि तो ह्याच्या मनांत मानण्याचा नसला म्हणजे हा आपला आंधळा डोळा त्या बाजूस करी.

सर ग्रांट डफ् ह्यानें एका ग्रंथांत म्हटलें आहे त्याप्रमाणें अनेक लोकांचें आचरण स्तुत्य नसतांहि ते मरणसमयीं जें धैर्य दाखवितात तें पाहून आश्चर्य वाटतें. आपणांस इतिहासावरून असें कळून येतें कीं, फांसावर चढल्या वेळच्या वर्तनामुळें ज्यांनीं आपलें नांव अमर करून घेतलें अशा लोकांची संख्या, राज्यपद मिळवून अमर झालेल्या लोकांच्या संख्येपेक्षां कमी नाहीं.

जेव्हां जेव्हां मनुष्यास विपत्ति सोसण्याचा प्रसंग येतो तेव्हां तेव्हां आपणांस साधारणपणें असें दिसून येईल कीं, एक तर ती विपत्ति मनुष्यास स्वतःच्या दोषामुळें प्राप्त होते, अगर ती लोकांच्या कल्याणासाठीं तो सोशीत असतो.

( ओंवी )

जे शहाणे जन असती । ते वक्ष पिटीत न बैसती ॥
शांतचित्तें उपाय करिती । स्वहानीच्या निवारणा ॥ १

—शेक्सपिअर

जीं अनंत सुखें परमेश्वरानें आपणांस दिलीं आहेत त्यांबद्दल उपकार मानून त्यांचा आपण पूर्ण उपभोग घ्यावा पण दुःखाचे प्रसंग आले असतां ते सर्वांशीं अहितकारक आहेत असें समजूं नये. मनुष्याला एकसारखें यशच येत गेलें तर त्याची खरी सुधारणा कधींहि होणार नाहीं. तशा प्रकारच्या यशापासून त्याला सुख होणार नाहीं एवढेंच नाहीं, तर मानसिक दुर्बलता प्राप्त होईल. विघ्नांचा प्रतिकार करणें, मोहास जिंकणें, दुःख धैर्यानें सोसणें, इत्यादि गोष्टींपासून मन विकसित होऊन, त्याचे ठिकाणीं दृढता येते व सौजन्य येतें.

आपणां सर्वांस हा देह सोडून अनंतकालरूपी महासागराकडे जावयाचें आहे. तर त्या प्रसंगास अनुरूप अशा थाटानें जाणें हेंच योग्य आहे.

दुःखें व संकटें ह्यांपासून मनुष्याच्या अंगच्या सर्व गुणांचा व शक्तींचा विकास होतो.

“ग्रीस देशांतील प्रख्यात वीर हर्क्युलिस् ह्यानें आपल्या विलक्षण बाहुबलानें एक मोठा सिंह, एक दहा तोंडांचा मोठा

नाग, व एक बलिष्ठ डुकर ह्यांचा नाश करून लोकांचें संरक्षण केलें. त्याचप्रमाणें कांहीं बलाढ्य दुष्ट लोकांचा संहार केला. त्यामुळें त्याचें नांव अद्याप प्रसिद्ध आहे. पण जर ते दुष्ट पशु व पशुतुल्य नराधम जगांत नसते, तर हर्क्युलिस् एवढ्या योग्यतेस खास चढला नसता. ते नसते तर त्यानें आपला वेळ ऐषआरामांत व झोंपेंत घालविला असता. त्याच्या अंगीं एवढी मोठी पराक्रमशक्ति आली नसती, व जरी कदाचित् येती तरी तिचा उपयोग होण्याची संधि मिळाली नसती. त्याला जे जे युद्धप्रसंग आले ते आलेच नसते, तर त्याचें विशाल बाहुबल, त्याची सहनशक्ति आणि उदार स्वभाव ह्यांचें काय चीज झालें असतें बरें ? "

रामचंद्राची पितृभक्ति, मातृभक्ति, बंधुप्रेम, एकपत्नीव्रत, प्रजावात्सल्य, पराक्रम इत्यादि लोकोत्तर गुण सुप्रसिद्ध आहेत. तथापि त्याला कैकेयीसारखी दुष्ट सापत्न माता, मंथरेसारखी कुटिल दासी व रावणासारखा महाप्रतापी पण दुराचारी शत्रु नसता, तर त्याचे गुणांचा एवढा विकास झाला नसता. त्याचप्रमाणें हरिश्चंद्रास विश्वामित्रासारखा छळणारा नसता तर त्याच्या सत्त्वगुणाची कीर्ति इतकी अजरामर झाली नसती.

साक्रेटिस् ह्यास न्यायाधीशांनीं देहांत शिक्षा देण्याचा हुकूम दिला, तेव्हां त्याचा एक मित्र शोकानें विव्हळ होऊन त्याला म्हणाला, तुह्मांला अन्यायानें शिक्षा होत आहे हें पाहून मला फार दुःख होतें. तेव्हां साक्रे-

१ एपिक्टिटस्

टिस् ,म्हणाला " तर मग मीं खरोखर अपराधी असावें अशी तुमची इच्छा आहे काय

" मनुष्यास स्वतःच्या दोषावांचून प्राप्त झालेली विपत्ति जर त्यानें धैर्यानें सोशिली तर त्यांतच काय तो खरा मोठेपणा आहे. आपल्या अन्याय्य वर्तनानें आलेली विपत्ति शांतपणें सोशिली तर त्यांत काय मोठा पुरुषार्थ आहे ? पण जर कांहीं सत्कार्य करीत असतां दुःखाचा प्रसंग आला, व तो आपण निमुटपणें सोशिला, तर त्या सहिष्णुतेनें परमेश्वर आपणांवर संतुष्ट होईल. "

१ सेंट पिटर

( ओव्या )

दुसऱ्याचें दुःखें दुःखी व्हावें। परसंतोषें सुखी व्हावें॥
प्राणिमात्रास मेळवून घ्यावें। बऱ्या शब्दें॥ १

बहुतांचे अन्याय क्षमावे। बहुतांचे कार्यभाग करावे॥
आपुल्यापरी व्हावें। पारिखे जन॥ २

—रामदास

( श्लोक )

सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्नब्रूयात्सत्यमप्रियं।
प्रियंच नानृतं ब्रूयादेष धर्मः सनातनः॥ १

—मनु

**भावार्थः**—सत्य आणि प्रिय भाषण करावें. पण सत्य देखील अप्रिय वाटेल अशा रीतीनें बोलूं नये व प्रिय पण असत्य असें भाषण करूं नये, हा धर्म सनातन आहे.

## प्रकरण १६

### सौजन्य

आपणांशी इतरांनी जसें वागावें असें आपणांस वाटतें त्याचप्रमाणें आपण इतरांशी वर्तणूक ठेवावी, एवढेंच नाही, तर इतरांनी आपणांविषयी प्रेमयुक्त विचार मनांत बाळगावे असें आपणांस वाटतें. त्याप्रमाणेंच आपणींहि दुसऱ्याविषयीं विचार बाळगावे. आपण त्यांच्या दोषांकडे थोडीशी डोळेझांक केली नाही तर ते आमच्या संबंधानें तरी तसें कां करतील? दुसरें असें आहे की, दुसऱ्याच्या वर्तनाचा उदारमनानें विचार केला असतां त्याजविषयीं-चें आपलें मत जेवढें बिनचूक होईल तेवढें अन्य रीतीनें होणार नाही.

कांही लोक इतरांशी सौजन्यानें वागून संसारातील बहुतेक अडचणी दूर करितात. दुसरे कांही लोक पाहिजे तेवढा स्वार्थत्याग करण्यास तयार असतात, पण ज्यां-च्या योगानें जीवितक्रम बराच सुखावह होतो, अशी प्रे-माची व कळकळीची लहानमहान कर्तव्यें करण्याची ते हयगय करितात.

दुसऱ्याविषयी कागाळी करण्याचा आपणांस जेव्हां जेव्हां प्रसंग येतो, तेव्हां तेव्हां बहुतकरून दुसऱ्याचा अन्याय आपणांस वाटतो त्यापेक्षां बराच कमी असतो. दुसऱ्यानें केलेल्या अपराधाबद्दल सूड उगविण्याच्या भ-रीस सहसा पडूं नये. कारण तसें केल्यानें आपली अ-धिकच हानि होते. जो मनुष्य दुसऱ्यास अपकार करूं प-

होतो तो दुसऱ्यापेक्षां आपणा स्वतःसच अधिक अपाय क-रून घेतो. मधमाशीनें रागानें दंश केला तर ती स्वतःच मरते.

गिधाडांस मांसाशिवाय दुसऱ्या कशाचा वास येत नाहीं असें म्हणतात. त्याप्रमाणें कांहीं लोकांस जगांत इतरांचीं छिद्रें काढण्याचाच नाद असतो. पण दुसऱ्यांचे दोष काढण्यापेक्षां त्यांच्या गुणांचें कौतुक करणें ह्यांतच खरा शहाणपणा आहे. दोषैकदृष्टी लोकांच्या हातून म-नुष्याची खरी परीक्षा कधीं होणार नाहीं.

एक मनुष्य दुसऱ्यावर टीका करितो तेव्हां त्या टीकेंत सत्याचा कांहीं भाग असतोच. पण ती टीका बहुधा ए-कदेशीय असते. म्हणजे तिच्यामध्यें दोषांप्रमाणें गुणांचेंहि आविष्करण केलेलें नसतें. नाटकाच्या पडद्यामागें बस-ण्यांत एकप्रकारची मौज आहे. पण नाटकापासून होणारा आनंद अनुभविण्यास ती जागा चांगली नाहीं. लोकांमध्यें जें जें चांगलें आहे तें शोधून काढावें. पण त्यांच्यामधील वाईट गोष्टींची पाठ धरूं नये. अशा रीतीनें वागलें असतां आ-पणांस सर्व कालीं व सर्व ठिकाणीं आनंदाचाच लाभ होईल.

( ओंव्या )

दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदरा आड ॥
परि तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्धाचि सेवी ॥ १
कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं ॥
परि पराग सेविजे भ्रमरीं । येरा चिखलचि उरे ॥ २

—ज्ञानेश्वरी

दुसऱ्यांचे दोष पाहून मनाचा असंतोष होऊं देऊं न-ये. आपण असें पहातो कीं, लहान मुलें जेव्हां किरकीर करतात तेव्हां बहुधा त्यांना कांहीं तरी विकार झालेला

असतो. पुरुष आणि स्त्रिया हीं मोठीं झालेलीं मुलेंच आहेत. त्यांच्या स्थितीची व मनोवृत्तीची जर आपण ओळख करून घेतली तर त्यांच्या चिडखोरपणाबद्दल आपणांस राग न येतां कींवच येईल.

एकादा मनुष्य आजारी आहे असें समजलें म्हणजे त्याच्याविषयीं आपल्या पोटांत दया उत्पन्न होते. त्याच्याकरितां होईल ती खटपट करण्यास आपण तयार होतों. त्याच्या मनास त्रास न होईल अशी काळजी आपण घेतों. पण इतर प्रसंगीं हें सौजन्य कोठे जातें ? सर्व काळीं लोक एकमेकांशीं प्रेमानें व उदार मनानें वागतील तर हल्लींपेक्षां ते दसपट सुखी होतील.

दुसऱ्याच्या हृदयावर कोणत्या दुःखाचें व चिंतेचें दडपण आहे, व त्याच्या मनाला कोणते इंगळे डसलेले आहेत हें आपणांस ठाऊक असण्याचा संभव नाहीं. म्हणून दुसऱ्यास दूषण ठेवण्याचा प्रसंग आल्यास आजूबाजूंच्या गोष्टींचा विचार करावा. असा विचार आपण करूं तेवढा थोडाच आहे. कोणताहि मनुष्य असो किंवा कोणतीहि वस्तू असो, त्याच्या किंवा तिच्यामध्यें जेवढा चांगुलपणा असेल तेवढा ग्रहण करण्याचा परिपाठ ठेवावा.

मृत मनुष्यासंबंधानें कांहीं वाईट गोष्ट बोलूं नये असा शिष्टाचार आहे. पण हा नियम जिवंत माणसांसंबंधानेंहि लागू केल्यास काय हरकत आहे ? आपण असें पाहतों कीं, मनुष्याच्या तोंडांतून इतरांविषयीं एक प्रेमळ उद्गार किंवा स्तुतिपर गोष्ट निघाली तर दहा दुष्ट उद्गार किंवा निंदापर गोष्टी निघतात. लोक मृतमनुष्याविषयीं बोल-

तांना जो सभ्यपणा दाखवितात तसा जिवंत मनुष्यांविषयीं बोलतांना दाखवितील तर विनाकारण होणाऱ्या किती तरी मनोव्याधी नष्ट होतील.

दुसऱ्यास दोष देण्याची अवश्यकता उत्पन्न झालीच तर तें काम उतावीळपणें तरी करूं नये.

( श्लोक )

नै करिं सहसा दोषारोपा अजाण तुझी मती ।
इतर मनिंच्या व्यापारांची तुला न कळे स्थिती ॥
भिउनि पळशी तूं जेथूनि अशा रणिं जाहला ।
व्रण, विजय जो दावी तोचि कलंक गमे तुला ॥ १

—प्रॉक्टर

दुसऱ्याला दोष देणें अगदीं जरूर आहे असे प्रसंग केव्हां केव्हां यावयाचेच. तथापि साधारण नियम म्हटला म्हणजे जेव्हां आपणांस कांहीं प्रिय भाषण करण्याची सवड नसते तेव्हां मौन धारण करावें हाच उत्तम मार्ग होय. सिडनी स्मिथ नामक एक मोठा विनोदी ग्रंथकार इंग्लंडांत होऊन गेला. त्याच्या परोक्ष त्याच्या ओळखीच्या एका मनुष्यानें त्याची फार निंदा केली. तेव्हां त्यानें त्याला निरोप पाठविला कीं, " मी नसतांना तुम्हीं मला लाथा मारल्या तरी माझी हरकत नाहीं. " तथापि बहुतेक लोकांस असें वाटतें कीं, लोकांनीं आपणांस नांवें ठेवावयाचीं असल्यास तीं आपल्यासमोर तरी ठेवावीं. पण त्यांच्या पाठीमागें कोणी निंदा केल्यास ती त्यांना असह्य होते; कारण त्या निंदेला उलट उत्तर देण्याची सवड मिळत नाहीं. दुसऱ्याविषयीं कुत्सित गोष्टी जो बोलतो त्याच्या भाषणानें कांहीं वेळ मोठा हंशा पिकतो, व लोकांचें

थोडेंबहुत मनोरंजन झाल्यासारखें क्षणभर वाटतें. पण ऐकणारे लोक मनांत समजत असतात कीं, आज हा मनुष्य एकाविषयीं असें बोलला तर उद्यां आमच्याविषयींहि तसेंच बोलेल. अशा मनुष्याचें भाषण ऐकून ते क्षणभर हांसले तथापि मनांतून त्याचा तिरस्कारच करतील.

( ओंव्या )

बरें बोलतां सुख वाटतें । हें तों प्रत्यक्ष कळतें ॥
आत्मवत् परावें तें । मानीत जावें ॥ १
कठिण शब्दें वाईट वाटतें । हें तों प्रत्ययास येतें ॥
तरी मग वाईट बोलावें तें । काय निमित्तें ॥ २
आपणांस चिमोटा घेतला । तेणें कासावीस झाला ॥
आपणावरून दुसऱ्याला । राखीत जावें ॥ ३
जे दुसऱ्यास दुःख करी । ते अपवित्र वैखरी ॥
आपणास घात करी । कोणी एके प्रसंगीं ॥ ४
पेरिलें तें उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें ॥
तरी मग कर्कश बोलावें तें । काय निमित्तें ॥ ५

—रामदास

एथवर मनुष्यांविषयीं झालें. पण मनुष्येतर प्राण्यांशीं देखील आपण सदयपणानें वागलें पाहिजे. सेनेका म्हणतो:—" गळ, जाळीं, कुत्रीं, ( हल्लींच्या काळीं बंदुका ). इत्यादि साधनांनीं मनुष्यें सर्व सजीव प्राण्यांचा अन्यायानें नाश करितात." ज्या लोकांमध्यें प्राण्यांवर निर्वाह करण्याची चाल आहे त्यांनीं तर कृतज्ञताबुद्धीनें त्यांचे हाल जेवढे कमी होतील तेवढे करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. आपल्या हिंदुस्थान देशांत अहिंसा हा परम धर्म आहे, असें मानून त्याप्रमाणें वागणारे लोक असंख्य आहेत, हें

आमच्या देशास अत्यंत भूषणावह आहे. ह्या उत्तम तत्त्वाचा प्रसार युरोपांतहि थोडथोडा होऊं लागला आहे, ही आनंदाची व अभिमानाची गोष्ट आहे.

" आपलें अंतःकरण निर्मळ असेल तर आपणांस प्रत्येक प्राणी हा आपणाप्रमाणेंच आहे असें दिसून त्याच्याविषयीं आपली समदृष्टि होईल; व प्रत्येक प्राणी हा धर्मज्ञानाचें एक पुस्तकच आहे असें आपणांस वाटेल. "

( श्लोक )

सर्वभूतस्थमात्मानं । सर्वभूतानि चात्मनि ॥
ईक्षते योगयुक्तात्मा । सर्वत्र समदर्शनः ॥१

—भगवद्गीता

**भावार्थः**—जो खरा योगी आहे, व ज्याच्या ठिकाणीं समबुद्धि झाली आहे, त्याला सर्व भूतांच्या ठिकाणीं आपण आहों व आपल्या ठिकाणीं सर्व भूतें आहेत असा प्रत्यय येतो.

पशूंना आत्मा नाहीं असें मानणारे कांहीं लोक आहेत. तथापि आपल्या धर्मामध्यें तर मनुष्याप्रमाणेंच पशूलाहि आत्मा आहे असें मानलें आहे. व ख्रिस्ती लोकांपैकीं वेस्ले व किंग्स्ले ह्या साधूंचें तसेंच मत आहे.

पक्ष्यांच्या अंगीं तर देवलोकींचा कांहीं अंश आहे कीं काय असा भास होतो. सेंट फ्रान्सिस् म्हणतोः—" पक्ष्यांलाहि आमच्याप्रमाणें आत्मा असावा असें मला वाटतें. हे रमणीय आणि आश्चर्यकारक प्राणी अरण्यांत देवाची स्तुति गातात, तेव्हां ते स्वर्गींच्या गंधर्वांप्रमाणेंच भासतात. अशा प्राण्यांशीं आमचें मनुष्यांचें बंधुत्वाचें नातें आहे असें म्हणण्यांत मला कांहीं कमीपणा वाटत नसून आनंदच वाटतो. "

पण कसेंहि असलें तरी पशुपक्ष्यांला ममतेनें वागविणें हें आपलें कर्तव्य आहे. व त्यांना विनाकारण इजा करणें हा मोठा अपराध आहे.

ज्ञानेश्वर महाराजांनीं खऱ्या साधूचीं लक्षणें सांगतांना म्हटलें आहे:—

( ओंवी )

जो सर्वां भूतांच ठायीं । द्वेषातें नेणेचि कांहीं ॥
आपपरू जया नाहीं । चैतन्या जैसें ॥ १

कोलरिज् कवीची खालील उक्ति अक्षरशः खरी आहे:—

( श्लोक )

भजे साना थोरां मनुज-पशु-पक्ष्यांस सुमती ।
भजे तोचि ईशा इतर भजतां व्यर्थ शिणता ॥
कृपा ज्याची आह्मांवरि वसतसे तोचि सकलां ।
प्रभू निर्मी त्यांच्यावरि करितसे प्रीति विपुला ॥ १

( श्लोक )

सर्वभूतस्थितं यो मां । भजत्येकत्वमास्थितः ॥
सर्वथा वर्तमानोपि । स योगी मयि वर्तते ॥ १

—भगवद्गीता

**भावार्थः**—जो सर्व भूतांच्या ठिकाणीं एकच परमेश्वर आहे असें ओळखून त्याची भक्ति करितो त्याला परमेश्वराची प्राप्ति ह्या जन्मींच होते.

शेक्सपिअर कवीनें दयेविषयीं जे उद्गार काढले आहेत ते फारच सुंदर आहेत. त्यांचें यथामति भाषांतर खालीं दिलें आहे:—

( श्लोक )

घनांबु उतरे नभींहुनी सुखें तशी हो दया ।
न कष्ट घडती तिला प्रकट सत्वरी व्हावया ॥

जयांवरि घडे दया, करित जो दया ती स्वयें ।
सवें उभय पावती सुख कृतार्थता निश्चयें ॥ १
बलिष्ठ बलिमाजिही, वित.रते नृपालांप्रती ।
जशी द्युति तशी न ते मुकुटकुंडलीं पावती ॥
सुचिन्ह नृपयष्टि ही खचित ऐहिका शक्तिचें ।
म्हणूनि भय वाटतें जनमनास भारी तिचें ॥ २
दया गुण परी असे नृपबलाहुनी श्रेष्ठ तो ।
परेशगुणधर्म हा, नृपहृदासनीं शोभतो ॥
जधीं सदय मानसें नृप खलां करी शासना ।
नरेंद्रबल तेधवां खचित दिव्य भासे जनां ॥ ३

यथाशक्ति दानधर्म करणें हाहि सौजन्याचा एक भाग आहे. पण दान करण्यांत तारतम्य ठेविलें पाहिजे. नाहीं तर त्यापासून हित न होतां अपायच होण्याचा संभव असतो.

दानधर्मापेक्षांहि सहानुभूति व प्रेम ह्यांचें महत्त्व विशेष आहे.

( अभंग )

जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनांचें चित्त ॥
ज्यासी आपंगिता नाहीं । त्यासी धरी जो हृदयीं ॥
दया करी जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥

**—तुकाराम**

( श्लोक )

सहानुभूति परदुःखिं व्हावी । छिद्रें परांचीं न खुलीं करावीं ॥
अन्यीं दया आत्मसमा असावी । मातें विभो बुद्धि अशीच द्यावी ॥ १

**—पोप**

( श्लोक )

आत्मौपम्येन सर्वत्र । समं पश्यति योऽर्जुन ॥
सुखं वा यदि वा दुःखं । स योगी परमो मतः ॥ १

—भगवद्गीता

भावार्थः—

( श्लोक )

सर्वभूतां स्वदृष्टान्ते । जो पाहे सम अर्जुना ।
सुखादुःखासही योगी। तोथोर मज संमत ॥ १

—वामन

अपकार विसरावा, पण उपकार कधीं विसरूं नये. "आपला पुत्र कृतघ्न झाला तर त्यामुळें ज्या वेदना होतात तशा सर्पदंशापासूनहि होणार नाहींत." तथापि आपण केलेला उपकार दुसऱ्यांनीं जाणला नाहीं म्हणून नाउमेद होऊन आपली सदयता सोडूं नये. जगामध्यें असे किती तरी लोक आहेत कीं, जे सूर्यप्रकाशाच्या लाभास सर्वथा अयोग्य आहेत. असें असून सूर्य उगवल्याशिवाय रहातो काय?

जे लोक दुसऱ्याच्या अन्यायांची क्षमा करण्यास तयार नाहींत त्यांना आपल्या स्वतःच्या अन्यायाबद्दल दुसऱ्यांकडून क्षमा होण्याची आशा नको.

आपण क्षणभर अशी कल्पना करूं कीं, आपला मृत्यु अगदीं जवळ आला आहे. व आपल्या बांधवांशीं आपण कोणत्या रीतीनें वागलों ह्याचा जबाब परमेश्वराच्या न्यायासनासमोर देण्याचा समय नजीक येऊन ठेपला आहे. अशा प्रसंगीं जर आपल्या मनांत असे विचार आले कीं, आपण आपल्या बंधुजनांस कठोरपणानें

वागविलें; त्यांना आपण कधींहि क्षमा, दया किंवा सहिष्णुता दाखविली नाहीं, तर आपल्या भावी स्थितीबद्दल आपणांस काय वाटेल बरें? आपणांवर परमेश्वरानें दया करून आपले सहस्त्रावधि अन्याय पोटीं घालावे असें म्हणण्यास आपणांस तोंड राहील काय?

दुसऱ्यांनीं केलेल्या अपकारांबद्दल क्षमा करावी, व आपल्या शत्रूंवरहि ममता करावी, हें तत्त्व इतर धर्मांतहि सांगितलें आहे. पण आपल्या आर्यधर्माचें तर हें मुख्य तत्त्व आहे.

( ओंव्या )

पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं ॥
रिपुमित्रा दोहीं । सरिसा पाडू ॥ १
कां घरींचिया उजेड करावा । परकिया अंधार पाडावा ॥
हें नेणाचि गा पांडवा । दीप जैसा ॥ २
जो खांडाव । घाव घाली । कां लावणी जयानें केली ॥
दोघां एकचि साउली । वृक्ष जैसा ॥ ३
ना तरी इक्षुदंडू । पाळी तया गोडू ॥
गाळी तया कडू । नोहेचि जेवीं ॥ ४

—ज्ञानेश्वरी

म्हणून केवळ सहिष्णुता दाखवून आपलें इतिकर्तव्य झालें म्हणून समजूं नये. तर आपण ह्याहूनहि पुढें गेलें पाहिजे. "आपल्या शत्रूंवर ममता करावी; जे आपणांस शाप देतात त्यांना आपण आशीर्वाद द्यावे; जे आपला द्वेष करितात त्यांच्यावर उपकार करावा. जे आपला छळ करितात त्यांचें देवाजवळ कल्याण मागावें. परमेश्वराचीं आपण लेंकरें आहों असें दाखविण्याचा हाच मार्ग आहे.

परमेश्वरानें निर्मिलेल्या सूर्याचा प्रकाश जसा सज्जनांना मिळतो तसाच दुर्जनांनाहि मिळतो. त्यानें पाठविलेलें मेघोदक जसें न्यायी लोकांस तसेंच अन्यायी लोकांसहि मिळतें."

( श्लोक )

दावी दीर्घ सहिष्णुता, करि दया, मात्सर्यबुद्धी नसे ।
नेणे गर्व, वळे कुमार्गि न कदा, स्वार्थैकदृष्टी नसे ॥
नोहे क्षुब्ध, कुकल्पनावश नव्हे, सत्येंच कीं हर्षणें।
हीं सौजन्यविशिष्ट जो नर असे त्याचीं खरीं लक्षणें ॥ १

—सेंट पाल

१ सेंट म्याथ्यूज्

( श्लोक )

बरें तें या देहीं महिवरि कडलोट करणें ।
महा सर्पाच्या कीं वदनीं तरि हा हात धरणें ॥
उडी कीं वन्हींत त्वरित तरि घालूनि मरणें ।
जळो तें जें लोकीं त्यजुनि निज सच्छील फिरणें ॥

—वामन

# प्रकरण १७

## संद्वर्तन

केवळ संसारावर ज्यांची नजर आहे अशा लोकांस देखील हुपारीपेक्षां सच्छील आणि दृढनिश्चय ह्यांचाच अधिक उपयोग होईल. आतां सच्छीलाची जी महती आहे ती अशा प्रकारच्या स्वार्थदृष्टीनें ठरवावयाची नाहीं. तथापि त्यामुळें वर सांगितलेल्या गोष्टींची सत्यता कमी होते असें नाहीं. ज्ञानापेक्षां सदाचरणाची योग्यता अधिक आहे. आपणांस केवळ सुजनता मिळवावयाची असो, अथवा वैभव आणि सुख मिळवावयाचीं असोत, हे दोन्ही हेतू साध्य करून घेण्याचा मार्ग एकच आहे. सोन्यासारख्या कृतींनींच सोन्यासारखे दिवस येतात.

मनुष्याच्या जीविताची योग्यता त्याच्या नीतिमत्तेवरून ठरते. " अमुक गोष्ट केली पाहिजे, असें आपल्या विवेकबुद्धीनें आपणांस एकदां सांगितल्यावर मग कांकूं न करितां ती गोष्ट करावयाची असा दृढनिश्चय करावा. म्हणजे मनुष्यास मिळण्यासारखीं जेवढीं सुखें आहेत त्या सर्वांची किल्ली आपल्या हातीं आली म्हणून समजावें "

जो मनुष्य कर्तव्याची हयगय किंवा टाळाटाळ करितो त्याला परिणामीं सुखाची प्राप्ति कधींहि होणार नाहीं, हें खास समजावें. एकादा खरा व्यवहारचतुर मनुष्य घ्या किंवा एकादा साधु घ्या, त्या दोघांनाहि पुढील पद्यांतील वर्णन सारखेंच लागू पडेल:—

( श्लोक )

शूराला नच योग्य जें भय तया नेणे कदा तन्मन ।
धैर्यें घालि उडी जिथे करि तया कर्तव्य पाचारण ॥
धर्मा आचरितां गणी न लवही विघ्नां असंख्यांस तो ।
निष्ठा ईश्वरिं ठेवि. जाइ तरुनी सौख्येंचि तीं सर्व तो ॥ १

—केवल्

ह्या आयुष्यांत आपणांस खरी धन्यता मिळविण्यासाठीं कशाची गरज आहे बरें ? " फक्त एकच गोष्ट पाहिजे. दुसरें कांहीं नको. पैसा नको, अधिकार नको, हुषारी नको, कीर्ति नको, स्वातंत्र्य नको. आरोग्याचीहि फारशी मातबरी नाहीं. पण एक सच्छील, अथवा पूर्ण जितेंद्रियता असेल तर आपली उन्नति खास होईल. व अशा प्रकारची उन्नति जर आपण करून घेतली नाहीं, तर आपली अवनतिच होत जाणार ह्यांत शंका नाहीं. "

आपलें शील बरें-वाईट ठेवणें हें आपल्या स्वाधीन आहे. मोठा कवि, गायक, कलाभिज्ञ, अगर शास्त्रज्ञ होणें हें प्रत्येकास साध्य नाहीं. " तथापि दुसऱ्या पुष्कळ गोष्टी अशा कांहीं आहेत कीं, त्या आपणा सर्वांस साध्य आहेत. जे गुण सर्वस्वीं आपल्या स्वाधीन आहेत ते मिळविण्यांत तरी आपण कसूर करूं नये. ते गुण म्हटले म्हणजे खरेपणा, सभ्यता, सहिष्णुता, परोपकारबुद्धि, औदार्य, विषयांच्या ठिकाणीं अनासक्ति इत्यादि होत. आपणांस सहज दाखवितां येण्याजोगे अनेक गुण आहेत. त्यांसंबंधानें आमची नैसर्गिक अपात्रता आहे असें म्हणण्यास आपणांस मुळींच कारण नाहीं. असें असून आपण

१ कल्याकी

जाणून बुजून खालच्या पायरीवर रहातों ह्याला काय म्हणावें ? मनुष्य असंतुष्ट होतो, मानसिक लघुता दाखवितो, दुसऱ्याची हांजी हांजी करितो, पोकळ डामडौल करितो, मनाची व्यर्थ अस्वस्थता करून घेतो; ह्या सर्व गोष्टी कांहीं नैसर्गिक व्यंगामुळें किंवा अपात्रतेमुळें त्याला कराव्या लागतात काय ? छे ! छे ! अशी मुळींच गोष्ट नाहीं. मनुष्य मनावर घेईल तर वरील दोष त्याला सहज टाळतां येतील. हें तर काय, पण एकाद्याच्या अंगीं बुद्धिमांद्याचा दोष असेल तर तो देखील उद्योगानें दूर करितां येईल. "

ज्या गोष्टीमुळें आपणांस शरम वाटण्याचा संभव आहे असें कांहीं एक करूं नये. आपणाविषयीं आपलें स्वतःचें मत चांगलें असणें हें अत्यंत महत्त्वाचें आहे. सेनेका म्हणतो, "आपण निष्पाप आहों अशी आपल्या मनाची खातरी असणें हें एक निरंतरचें मिष्टान्नभोजनच होय."

फ्रांकलिन् ह्याचे बोधपर निबंध सुप्रसिद्ध आहेत. तथापि सद्गुण संपादण्याच्या कामीं जी युक्ति त्यानें सांगितली आहे, ती पसंत करण्यासारखी आहे असें वाटत नाहीं. सर्व सद्गुणांचें संक्षिप्त पण सुबोध वर्णन देऊन पुढें तो म्हणतोः—" ह्या सर्व गुणांची संवय लावून घेण्याचा मीं संकेत केला. तथापि ते सर्वच एकदम साधावयास गेलों तर मनाचा घोंटाळा मात्र होईल असें जाणून मीं एकेक सद्गुण घेऊन त्याच्याकडेच पूर्ण लक्ष देण्याचा बेत केला. एक गुण आपल्या स्वाधीन झाला म्हणजे मग दु-

१ मार्कस ऑरेलियस

सन्याकडे वळावयाचें. असें करितां करितां सर्व गुणांची मालिका हस्तगत करून घ्यावयाची. " ते गुण एणेंप्रमाणें:—मिताहार, वाक्संयम, व्यवस्थितपणा, दृढनिश्चय, मितव्यय, उद्योग, सत्यशीलता, न्यायीपणा, नेमस्तपणा, शुचिर्भूतपणा, शांति, पवित्रता आणि विनयशीलता. फ्रांक्लिन् ह्यानें स्वतः ह्या युक्तीचा अनुभव घेतला असेल असें मुळींच संभवत नाहीं. कारण कोणत्याहि एका दुर्गुणाची उपेक्षा करून आपण त्यास थारा दिला म्हणजे त्याचें सारें गणगोत येऊन नमलेंच म्हणून समजावें.

" एकाद्यानें कोणा गरीब मनुष्यास कांहीं द्रव्य देऊन त्याला दारू पिण्यास, किंवा जुगार खेळण्यास, किंवा एकादी निरुपयोगी वस्तु घेण्यास सांगितलें, तर आपणांस केवढें आश्चर्य वाटेल ! पण जी गोष्ट दुसऱ्यास करावयास सांगितली असतां आपण उपहासास पात्र होतों, तीच गोष्ट आपण स्वतः करणें योग्य होईल काय ? "

नेहमीं उच्च कल्पना डोळ्यांसमोर ठेवाव्या. नीच कल्पना मनांत आणूं नयेत. लॉर्ड बीकन्सफील्ड म्हणतो, " ज्या मनुष्याचें लक्ष श्रेष्ठ आणि उदात्त कल्पनांकडे जात नाहीं, त्याच्या मनांत नेहमी नीच कल्पनाच येतात. ज्याचें मन उन्नत्तीकडे वळत नाहीं त्याला नेहमीं जमिनीशीं नाक घांशीतच जावें लागतें. " म्हणून ज्यांनीं मोठा नांवलौकिक मिळविला आहे अशा लोकांचा कित्ता नजरेसमोर ठेवावा.

1 बिशप विल्सन्

( श्लोक )

निरर्थ यशशब्द हा जरि असें कुणी बोलती।
अपूर्व बहु मोहनी पदिं वि त्या न ते जागती ॥
मनीं धृति उदारता विकसती स्मरोनी कृती।
महानरवराचिया, तरुण तत्पथें वर्तती ॥ १

—जोनाबेली

ह्या आयुष्यांतील वस्तुस्थितीचा विचार केला म्हणजे आपल्या महत्त्वाकांक्षेचे नेहमींचे विषय अगदीं क्षुद्र आहेत, असेंच आपणांस वाटेल. शेक्सपिअर, मिल्टन्, न्यूटन, डार्विन् व आमच्या देशांतील ज्ञानदेव, तुकाराम, वगैरे नामांकित पुरुषांना सरकारानें दिलेला बहुमान किंवा पदव्या ह्यांपासून मोठेपणा आला नाहीं, हें सुप्रसिद्ध आहे. सामान्य प्रकारच्या महत्त्वाकांक्षेचा मुख्य दोष हा आहे कीं, ती कधींहि तृप्त म्हणून होत नाहीं. ज्याप्रमाणें डोंगर चढत असतां एका टेंकाडावर जातांच दुसरें पुढें उभें रहातें, त्याचप्रमाणें ह्या मनोरथांची स्थिति असते. महाविजयशाली अलेक्झांडर व नेपोलियन ह्यांची जयतृष्णा शेवटपर्यंत तृप्त म्हणून झाली नाहीं. खोट्या महत्त्वाकांक्षेच्या नादीं लागल्यामुळें त्यांना शांति आणि ईश्वराविषयीं कृतज्ञता ह्यांचा अनुभव कधीं आला नाहीं. बेकन् म्हणतो, "ज्यांना नेहमीं पुढें धांव मारण्याची संवय असते, त्यांना एकादे वेळीं अडथळा येऊन त्यांची गति कुंठित झाली, म्हणजे ते स्वतःवर देखील रागावतात. व त्यांची कृत्ति अगदीं बदलून जाते."

( श्लोक )

यज्जीव्यते क्षणमपि प्रथितं मनुष्यैः।

विज्ञानविक्रमयशोविभवादियुक्तं ॥
तन्नाम जीवितमिति प्रवदन्ति तज्ज्ञाः ।
काकोपि जीवति चिराय बलिंच भुक्ते ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः—**

( श्लोक )

जें अल्प जीवितहि गाजतसे जगांत ।
विज्ञान-विक्रम-यशें विभवेंहि युक्त ॥
त्यालाच जीवित असें म्हणती सुजाण ।
वांचे न काय बहु काक गिळोनि अन्न ॥ १

वरील श्लोकांतील कवीच्या उक्तीमध्यें बरीच अतिशयोक्ति आहे. जीवित कृतार्थ होण्याकरितां मोठमोठे पराक्रम आणि वैभव ह्यांचीच अवश्यकता आहे असें नाहीं. वर्डस्वर्थ कवीनें म्हटल्याप्रमाणें,

( ओंवी )

अहो सज्जनांचीं कृत्यें । धाकुटीं परि प्रेमभरितें ॥
अनाख्यातें नामरहितें । तज्जीवित शोभवितीं ॥ १

पण स्वार्थपरायण मनुष्याची महत्त्वाकांक्षा गंधर्वनगरीप्रमाणें केवळ भ्रमात्मक होय. अशा मनुष्याची शेवटीं काय स्थिति होते ती पहाः—

( श्लोक )

तृष्णा विलोलनयना शठ ही मृगाक्षी ।
धीमान् युवा बघुनि तद्गृहपंथ लक्षी ॥
वातायनांतुनि शिरे सदनांत जेव्हां ।
आत्मप्रभाव मग दाखवि शीघ्र तेव्हां ॥ १
भिंती निरुंद मग उंच विशाल होतीं ।
चुंबी नभा गृह, अलंकृत गुप्त हस्तीं ॥

तें राजमंदिरचि होइ, तया नराचीं।
नामाक्षरें झळकती स्फुट कांचनाचीं ॥ २
लाधे तथापि फल काय वरें तयातें।
श्लाघा, जधीं श्रवण न क्षम ऐकण्यातें ॥
सोनें, जधीं विकल इंद्रियवर्ग झाला।
कीर्ति, जधीं नुरलि हौसचि तन्मनाला ॥ ३
प्रेमाविणें तळमळे परि तें मिळेना।
ह्या लाधल्या विविध वस्तु असें कळेना ॥
तों मृत्यु घालि उडि, सर्व हिरोनि घेई।
आला तसाच यमराज तयास नेई ॥ ४

---थिलिस्

नुसती मोठी पदवी असली तथापि तिचा कांहीं उपयोग होत नाहीं. फ्रान्सची राणी मेरीडी मेडिसी, हिचा एक मुलगा फ्रान्सचा राजा होता; तिची एक मुलगी स्पेनची राणी, दुसरी मुलगी इंग्लंडची राणी, व तिसरी मुलगी सव्हॉय प्रांताची जहागीरदारीण होती. असें असून तिला असा प्रसंग आला कीं, तिच्या पोटच्या मुलांनीं देखील तिचा त्याग केला. त्यांनीं तिला आपल्या राज्यांत नुसता पाय ठेवूं दिला नाहीं; तिचा दहा वर्षेपर्यंत छळ होऊन ती उपासमारानें कलोन एथे मरण पावली.

सर्व राजांचे मुकुट थोड्या अधिक प्रमाणानें कंटकमयच असतात. ज्या मानानें राजा सुस्वभावी व पापभीरू असेल त्या मानानें त्याच्या जबाबदारीचें ओझें त्याजवर अधिक दडपून बसतें. आपल्या हातून एकादी चूक झाली असतां हजारों लोकांचें नुकसान होण्याचा संभव आहे, हें ज्या राजाच्या ध्यानांत वागतें तो सर्वकाळ चिंतातुर असेल ह्यांत काय नवल आहे?

मनुष्याच्या आयुष्यक्रमात, हळुहळु कां होईना, पण कांहीं तरी प्रगति होत गेली पाहिजे, म्हणजे त्याचें जिणें सुखावह होतें. पण प्रगति नसेल तर आयुष्य कंटाळवाणें होईल.

( ओंवी )

जन्मा आलियाचें फळ । कांहीं करावें सफळ ॥
ऐसें न करितां निष्फळ । भूमिभार होय ॥ १

—रामदास

मनुष्यमात्राची प्रगति व्हावी, त्याची स्थिती नेहमीं तशीच राहूं नये, असा ईश्वरी संकेत दिसतो. आपणांपैकीं पुष्कळांची अशी स्थिति आहे कीं, आपण हात जोडून स्वस्थ बसूं असें म्हणूं लागलों, तर तें चालणार नाहीं. आपण हातपाय हालविले पाहिजेत अथवा मरण्यास सिद्ध झालें पाहिजे.

तथापि आपला उत्कर्ष करून घेण्याच्या कामीं ज्या साधनांचा उपयोग करावयाचा, व जे हेतू साध्य करावयाचे, त्यांच्या बरेवाईटपणाविषयीं नीट विचार केला पाहिजे. खोट्यानाट्या युक्तीनें मिळविलेली स्थिति जरी बाह्यतः प्रगति अशी भासली, तथापि वास्तविक रीतीनें ती आपली पिच्छेहाटच झाली म्हणून समजावें. एकूण प्रगति आणि सद्वर्तन ह्या दोन गोष्टी आपल्या सुस्थितीस अवश्य आहेत; त्यांचा मेळ कसा घालावा हा महत्त्वाचा प्रश्न आहे. आपलें मन हेंच आपलें खरें राज्य असें समजून त्याच्यावर उत्तम रीतीनें अंमल चालविणें हाच आपला श्रेष्ठ मनोरथ असला पाहिजे. अधिकाधिक ज्ञान मिळविणें, अधिकाधिक सद्गुण संपादणें, अधिकाधिक सत्कृत्यें करणें हीच खरी प्र-

गति समजली पाहिजे. अशा प्रकारच्या प्रगतीला सीमाच नाहीं. अशा प्रगतीला कोणताहि अडथळा येण्याचें कारण नाहीं. जसजसें पुढें पाऊल टाकावें तसतशी अधिक निर्भयता वाटूं लागते. मनुष्याचा आद्य आणि सर्वांत उच्च मनोरथ आपलें कर्तव्य यथासांग करणें हा असला पाहिजे.

( श्लोक )

करीं साजे त्याग, श्रवणयुगलीं सच्छ्रवण जें ।
मुखीं सत्य, स्वच्छाचरण विलसे, शौर्यहि भुजे ॥
स्वशीर्षे थोराला नमन, विभवावांचूनि पहा ।
मन्याचा कीं स्वाभाविक शुभ अलंकार विवि हा ॥ १

—**वामन**

असें म्हणतात कीं, प्रख्यात सेनापति वेलिंगटन् ह्याच्या लेखांत किंवा भाषणांत 'वैभव' हा शब्द कधीं आला नाहीं. त्याच्या ध्यानींमनीं सदोदित कर्तव्याशिवाय दुसरें कांहीं नसे.

ह्याकरितां मनुष्यास महत्त्वाकांक्षा तर असलीच पाहिजे. पण ती साधूंची किंवा ऋषींची महत्त्वाकांक्षा असावी. नाहीं तर,

( श्लोक )

दिसे ज्या प्राणाची स्थिति जलजपत्रोदक जसें ।
तयासाठीं केले विविध बहु म्यां पातक असें ॥
पुढें द्रव्याढ्यांच्या प्रचुर धनलोभास्तव वृथा ।
विलज्जें म्यां केली बहुतर नृपात्मस्तुतिकथा ॥ १

—**वामन**

असा प्रकार होऊन पुढें पश्चात्ताप होतो. आजपासून शंभर वर्षांनीं तुम्हीं श्रीमंत होतां किंवा गरीब होतां, सर-

दार होतां किंवा शेतकरी होतां ह्या प्रश्नाचें काय महत्त्व राहणार आहे ? पण तुम्हीं आपलें आयुष्य सत्कर्मांत घालविलें किंवा दुष्कर्मांत घालविलें ह्याचा परिणाम मात्र दूरवर होणार आहे.

" आपल्या मनांत विचार काय आहेत. आपलें ज्ञान किती आहे. आपलीं मतें कोणत्या प्रकारचीं आहेत ह्या गोष्टी परिणामीं विशेष महत्त्वाच्या नाहींत. पण आपल्या हातून काय काय कृत्यें घडतात ही गोष्ट मात्र सदासर्वकाळ अत्यंत महत्त्वाची आहे. "

( श्लोक )

सुनीतिपथ सेवणें मलिन कर्म मानेंच ना ।
घडो मरण नावडे खलजनांप्रति प्रार्थना ॥
विपत्तिसमयींहि जो प्रकटवीच ना दीनता ।
सत्याविण असें असिव्रत कहं शक कोणता ॥ [1]

—वामन

भाषण आणि क्रिया ह्यांत पूर्ण सत्यपणा असावा. असत्य हें ह्या जगांतील आद्य पातक होय. सत्याचा मार्ग हाच खरा आणि उत्तम मार्ग होय.

" मनुष्यानें संग्रह करण्यास योग्य अशी सत्यासारखी मूल्यवान् वस्तु दुसरी नाहीं. " " जो मनुष्य सत्यास सोडून चालतो तो ईश्वरास तुच्छ मानतो व मनुष्यास भितो असेंच समजलें पाहिजे. " श्री राम, युधिष्ठिर, व हरिश्चंद्र हे केवढे सत्यभक्त होते हें सुप्रसिद्ध आहे.

आपल्या हातून चूक झाली तर त्याबद्दल शरम वाटावी हें उचित आहे. पण ती कबूल करण्यास कधीं लाजूं नये.

१ रस्किन् २ चॉसर ३ प्लुटार्क

" ज्यांच्या योगानें मनुष्यास खरें मनुष्यत्व येतें, व ज्यांच्या योगानें त्यास आपलें कर्तव्य नीट बजावितां येतें असे गुण अनेक आहेत. तथापि त्या सर्वांमध्यें अत्यंत अवश्य असा एक गुण आहे. त्यावांचून मनुष्यास मनुष्यत्व येत नाहीं; त्यावांचून आजपर्यंत कोणीहि मोठ्या योग्यतेस पावला नाहीं; त्यावांचून मनुष्याच्या हातून कोणतेंहि महत्कार्य होणें शक्य नाहीं. तो गुण सत्यशीलता हा होय. सर्व मोठ्या सत्पुरुषांच्या चरित्रांचें अवलोकन करा. त्यांना महात्मे आणि सत्पुरुष असें आपण कां म्हणतों? कारण ते नेहमीं सत्याचें ब्रीद पाळतात व आपली खरी स्थिति जगास दाखविण्यास भीत नाहींत."

( ओंव्या )

कां जे मार्गामार्ग देखावे । साच लटिकें ओळखावें ॥
हिताहित जाणावें । हिताचि लागीं ॥ १
पाहे पां नाव देखतां बरवी । कोणी आड घाली काय अगाधीं[२]
कां सुपंथ जाणोनि अडवी । रिगवत असे ॥ २
जो विष अमृत वोळखे । तो अमृत काय सांडूं शके ॥
तेंवि जो उजू वाट देखे । तो अव्हांटां[३] न वचे ॥ ३

—ज्ञानेश्वरी

वर्ड्स्वर्थ म्हणतो:—"मनुष्याच्या अंगीं दोन परस्परविरोधी भासणाऱ्या गुणांचें संमीलन झालें पाहिजे. उचित पारतंत्र्याबरोबर उचित स्वातंत्र्य असलें पाहिजे. उचित परावलंबनाबरोबर उचित स्वावलंबन असलें पाहिजे. आज्ञा कशी पाळावी हें प्रथम शिकलें पाहिजे. म्हणजे दुसऱ्यावर अंमल करण्याचें काम आपणांस सहज येईल. शरीर आणि

१ म्याक्समुलर २ खोल पाण्यांत ३ आड मार्गांत

मन ह्या दोहोंसहि कवाइतीनें व्यवस्थित केलीं पाहिजेत. तरच मनुष्य मोठीं कामें करण्यास पात्र होईल. ज्याला शिपायाचें काम चांगलें करितां येत नाहीं तो सेनापतीच्या कामास कधींच लायक होणार नाहीं."

कधीं कधीं आपण असें समजतों कीं, तापट स्वभाव हा कर्तृत्वशक्तीचा सूचक आहे, व शांत स्वभाव हा क्रियाशून्यत्वाचें चिन्ह आहे. परंतु ही समजूत चुकीची आहे. शांतस्वभाव मानसिक दृढतेवांचून असूं शकत नाहीं. व तापट स्वभावावरून मनुष्याची दुर्बलता व आत्मदमनाचा अभाव हीं दिसून येतात.

आपणांस अधिकाराचें पद प्राप्त झालें तर आपण अगदीं न्यायानें व सौजन्यानें वागण्याविषयीं फार जपलें पाहिजे. सादी यानें एक बोधपर गोष्ट सांगितली आहे ती अशीः—एका राजानें एका निरपराधी मनुष्यास फांशी देण्याचा हुकूम केला तेव्हां तो मनुष्य म्हणाला, "राजा, तूं आपल्या स्वतःच्या हिताची तरी काळजी राख. मला मरणाचें दुःख एक क्षणभरच वाटेल. पण तुझें पातक तुला निरंतर चिकटून राहील."

( आर्या )

देवें भाग्य आलिया थोर । त्याचा गर्व न धरावा अणुमात्र ॥
एकदांचि गेलें समग्र । कदा धीर न सोडावा ॥ १

—श्रीधर

अधिकार प्राप्त झाला म्हणजे त्या मानानें जबाबदारी उत्पन्न होते. मनुष्य अधिकारावर असो किंवा नसो, त्यानें आपणास काय आवडेल हें ध्यानांत न आणतां

आपण काय केलें पाहिजे ह्याचा विचार केला पाहिजे. हाच सुखप्राप्तीचा खरा मार्ग होय.

दोन कर्तव्यांपैकीं कोणतें करावें असा संशय उत्पन्न झाल्यास अधिक जवळचें असेल तें प्रथम करावें. कांहीं सन्मान्य लोक दुसऱ्यांवर उपकार करण्याच्या भरांत आपल्या कुटुंबांतील माणसांस देखील विसरतात. पण भूतदयेचा प्रारंभ आपल्या कुटुंबांत प्रथम व्हावा हेंच उचित होय.

जगांतील सर्व वस्तूंची प्रवृत्ति सद्धर्म वडवून आणण्याकडे आहे. ह्या गोष्टीबद्दल आपली खातरी सहज करून घेतां येईल. पातकाबद्दल शिक्षा होते असें आपण म्हणतों. पण ही शिक्षा आपणांस कोण करतो? आपणच ती शिक्षा करून घेतों. ह्या जगाची रचनाच अशी आहे कीं, सत्कर्मापासून आनंद होतो, व दुष्कर्मापासून दुःख होतें. पापाबद्दल दुःख भोगावें लागूं नये अशी व्यवस्था होण्यास सृष्टीच्या नियमांतच फेरफार आला पाहिजे.

आपल्या पातकांबद्दल आपणांस देवाकडून क्षमा होईल हें खरें आहे. तथापि ह्याचा अर्थ आपणांस मुळींच शिक्षा होणार नाहीं असा समजूं नये. तशी गोष्ट सर्वथा अशक्य आहे. एवढेंच नाहीं, पण ती शक्य असती तर मोठ्या अनर्थास कारण झाली असती. पापापासून उत्कर्ष होणें ह्यासारखें दुसरें दुर्भाग्य नाहीं. आपण पातक केलें असतां त्याची आठवण पुढें नेहमीं आपल्या काळजास घरें पाडीत राहील. ज्यांचा अपराध आपण केला असेल ते कदाचित् क्षमा करतील, पण तसें केल्यानें ते आमच्या डोकीवर मो-

ठेंच ओझें लादीत आहेत असें समजावें. कारण त्यांच्या सौजन्याच्या दिव्य प्रकाशांत आपला अन्याय अधिकच कृष्णवर्ण दिसूं लागेल.

( श्लोक )

अवश्यमेव भोक्तव्यं । कृतं कर्म शुभाशुभम ॥
कृतकर्मक्षयो नास्ति । कल्पकोटिशतेऽपि ॥ १

--सुभाषित

भावार्थः— मनुष्य जें कर्म करितो त्याचें शुभाशुभ फलत्याला भोगणें प्राप्तच आहे. तें कधींहि चुकणार नाहीं

आचरण हेंच आयुष्याचें सार आहे. शाश्वत सुख आणि वैभव हीं त्याच्यावरच अवलंबून असतात. बाह्य गोष्टींचें महत्त्व विशेष नसतें. मनुष्याच्या परिस्थितीपेक्षां त्याच्या अंतःस्थितीवर त्याची किंमत अवलंबून असते. म्हणून आपल्या आचरणावर नेहमीं सक्त नजर ठेवावी.

( श्लोक )

आचाराल्लभते ह्यायुराचारादीप्सिताः प्रजाः ॥
आचाराद्धनमक्षय्यमाचारो हन्त्यलक्षणम् ॥ १

- मनु

भावार्थ —सदाचारानें मनुष्याला आयुष्य, संतति, धन हीं प्राप्त होतात; व अशुभ गोष्टींचा नाश होतो.

आपण ज्या प्रकारची संवय लावून घेऊं त्या प्रकारचा आपला स्वभाव होत असतो. " आपण जीं कृत्यें करितों त्यांच्या योगानें आपल्या संवयी बनतात. संवयीप्रमाणें स्वभाव बनतो. स्वभावाप्रमाणें आपली भवितव्यता बनते. " प्रत्येक दिवशीं आपणां सर्वांची बऱ्या किंवा

१ बोर्डमन्

वाईट मार्गाकडे गति होत असते. ती चांगल्या मार्गाकडे झाली किंवा वाईट मार्गाकडे झाली हें आपण प्रत्येक रात्रीं शोधून पाहिलें पाहिजे.

इमर्सन म्हणतो, "मनुष्यजातीमध्यें परोपकारी आणि परापकारी असे दोन वर्ग आहेत." ह्यांपैकीं आपण दुसऱ्या वर्गांतले असलों तर आमच्यामुळें मित्रांचे शत्रु होतील, गतकालची आठवण दुःखद होईल, जीवित ही एक अनर्थपरंपराच होईल, जग कारागृहाप्रमाणें भासेल आणि मृत्यूचें स्वरूप भयानक दिसेल. पण उलट पक्षीं जर आपण एकाद्याच्या मनांत एक सुविचार स्फुरविला, किंवा एकाद्याच्या आयुष्यांतील एक घटका सुखावह केली, तरी आपण एक दिव्य सत्कृत्य केल्यासारखें होईल.

( श्लोक )

एते सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान् परित्यज्य ये ।
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृतः स्वार्थाविरोधेन ये ॥
तेऽमी मानवराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नन्ति ये ।
ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥ १

—भर्तृहरि

हे तों सत्पुरुष स्वकार्य त्यजुनि अन्यार्थही साधिती ।
हे तों मध्यम जे निजार्थ करुनी अन्यार्थ संपादिती ॥
हे तों राक्षस जे स्वकार्यविषयीं अन्यार्थ विध्वंसिती ।
जे कां व्यर्थ परार्थहानि करिती ते कोण कीं दुर्मती ॥ १

—वामन

प्रत्येक मनुष्य दररोज एक तास किंवा निदान अर्धा तास एकांतांत बसून शांत आणि एकाग्र मनानें आत्मचिंतन करण्यांत घालवील, तर त्यास केवढा तरी फाय-

दा होईल! असें करण्यास वेळ नाहीं असें कोणी म्हणेल तर तें व्यर्थ आहे. इंग्लंडांतील प्रख्यात मुत्सद्दी व मुख्य प्रधान सर रॉबर्ट पील हा दररोज पार्लमेंटांत काम करून आल्यावर झोंप घेण्यापूर्वीं बायबलाचा एक अध्याय नियमानें वाचीत असे. त्याप्रमाणें आपलें पूज्य धर्मपुस्तक जी भगवद्गीता तिचा दररोज निदान एक अध्याय वाचण्याचा क्रम आपण ठेविल्यास आपल्या मनावर मोठा सत्परिणाम होईल ह्यांत शंका नाहीं.

चांगल्या गोष्टींचें चिंतन करीत असावें, म्हणजे आपल्या हातून वाईट कृत्य सहसा घडणार नाहीं.

( श्लोक )

व्याघ्रीसरो भय करीत उभी जरा रे ।
देहासि रोग करिती रिपुतुल्य मारे ॥
आयुष्य भिन्नघट नीर तसें सरे हें ।
पापें तथापि जन आचरितात पाहें ॥ १

—वामन

आपणांस मृत्यु येणार आहे, आपल्या कर्मांचा निवाडा होणार आहे, व त्याचप्रमाणें स्वर्गप्राप्ति किंवा नरकवास घडणार आहे, हें सर्व जो नेहमीं ध्यानांत वागवील त्याचें आचरण पुण्यशील झाल्यावांचून राहणार नाहीं.

( श्लोक )

यः शास्त्रविधिमुत्सृज्य। वर्तते कामकारतः ॥
न स सिद्धिमवाप्नोति । न सुखं न परां गतिम ॥ १
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते । कार्याकार्यव्यवस्थितौ ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं। कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २

—भगवद्गीता

**भावार्थः**—( १ ) जो मनुष्य शास्त्राचे नियम सोडून मनास मानेल तसा वागतो, त्याला यश, सुख, आणि सद्गति ह्यांपैकीं कांहीं प्राप्त होत नाहीं. ( २ ) म्हणून काय करावें व काय करूं नये ह्याचा निर्णय करितांना शास्त्रप्रमाण मानावें. शास्त्रांचे नियम जाणून आपलें कर्तव्य करीत असावें.

आजचें कर्तव्य उद्यांवर ढकलूं नये. तारुण्याची किंवा अल्पवयीपणाची सबब पुढें आणूं नये. शरीराचा नुसता अस्थिपंजर झाला म्हणजे 'अशक्तः सततं साधुः' ह्या न्यायानें आपण सर्वच साधु बनत असतों. पण त्यांत काय पुरुषार्थ आहे?

( श्लोक )

नवे वयसि यः शांतः । स शांत इति मे मतिः ॥
धातुषु क्षीयमाणेषु । शान्तिः कस्य न जायते ॥ २

—सुभाषित

**भावार्थः**—तारुण्यामध्यें जो शांत राहील तो खरा शांतिमान् म्हणावा. शक्ति क्षीण झाल्यावर कोण शांत होत नाहीं?

तारुण्यावस्थेंत विशेषेंकरून, परमेश्वराचें वारंवार स्मरण करावें. आपणास पुण्यवंतासारखें मरण पाहिजे असेल तर स्वैरपणाचें वर्तन ठेवतां कामा नये. ज्याचें वर्तन शुद्ध आहे त्याला मरणाची कांहीं भीति वाटत नाहीं. इंग्लंडांतील थर्वाल नामक धर्मगुरु हा आपल्या शेवटच्या दुखण्यांत खालीं दिलेल्या वचनाचें सात भाषांमध्यें भाषांतर करण्यात गुंतला होताः—"निद्रा ही मृत्यूची बहीण आहे. निद्रारूपी मृत्यूमधून किंवा मृत्युरूपी महानिद्रेंतून परमेश्वरानें तुम्हांस जागृत करावें ह्या हेतूनें तुम्हीं त्याला अनन्यभावानें शरण जा."

सिसिरो म्हणतो, "आपलें कर्तव्य धैर्यानें आणि प्रसन्न मनानें केल्यापासून कोणता फायदा आहे बरें? हाच कीं आपल्या हातून सत्कृत्य घडतें; हा कांहीं ल्हान सहान फायदा नव्हे. आपण सत्कर्म करावयाचें तें सत्कर्माच्या आवडीसाठीं केलें पाहिजे; फलाच्या आशेनें किंवा शिक्षेच्या भीतीनें करूं नये."

सद्गुणाचें फल सद्गुण हेंच होय. त्याशिवाय दुसऱ्या फलाची अपेक्षा धरूं नये. तथापि कांहीं लोकांस कुमार्गापासून निवृत्त होण्याच्या कामीं, फल आणि शिक्षा ह्यांचा विचार केल्यानें मदत होईल ह्यांत शंका नाहीं. स्पिनोझा म्हणतो; "कांहीं मनुष्यें कुमार्गावरील चिखलांत रुतल्यासारखीं असतात. "त्यांना नरकाचें भय नसेल तर तीं आपल्या सर्व दुर्वासना पुरवून घेतल्याशिवाय रहाणार नाहींत. तीं दुष्कर्मांपासून निवृत्त होतात, व ईश्वराच्या आज्ञा पाळतात, पण हें सर्व तीं गुलामांप्रमाणें आपल्या इच्छेविरुद्ध जुलमानें करितात. व ह्या जुलमाच्या रामरामाबद्दल तीं देवाकडून ज्या फलाची अपेक्षा करितात तें ईश्वरभक्तीसारख्या उच्च वर्गांतलें नसून, त्यांच्या सद्गुणविरोधास अनुरूप असेंच कांहीं तरी असतें. दुसरे कांहीं लोक असें समजतात कीं, आपण धर्माचरण करितों ही एकप्रकारची त्रासदायक हमालीच आहे, व तिच्याबद्दल देवानें आपणांस अनेक प्रकारचीं सुखें द्यावीं; परंतु जो खरा सुज्ञ आहे त्याला सद्गुण हेंच सद्गुणाचें भरपूर फल आहे असें वाटतें; व त्यापुढें इतर सुखें तो तुच्छ मानतो. सद्गुणाचा मार्ग जरी बिकट आहे तथापि प्रयत्नानें तो स-

वांस साध्य आहे. सर्व उंची वस्तु कष्टसाध्य आणि दुर्मिळ असावयाच्याच."

मनुष्यप्राण्याच्या ठिकाणीं पूर्ण निर्दोषत्व येणें अशक्य आहे. तथापि इतर गोष्टींप्रमाणेंच आपलें शीलहि जेवढें निर्दोष करवेल तेवढें करण्याविषयीं आपला सतत यत्न असावा. परमेश्वरकृपेनें आपणा सर्वांच्या हृदयांत एक खातरीचा मार्गदर्शक आहे. आमच्या हृदयस्थ सद्बुद्धीच्या सल्लयानें जर आपण चाललों तर आपला मार्ग बहुधा चुकणार नाहीं. उदारपणाचें आणि सुजनतेचें वर्तन ठेवणें हें प्रत्येकाच्या स्वाधीन आहे.

नेहमीं आपल्या डोळ्यांसमोर उच्च कल्पना ठेवाव्या.

( श्लोक )

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ॥
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ १

—**भगवद्गीता**

**भावार्थः**—आपल्या स्वतःच्या प्रयत्नानें आपण आपली उन्नति करून घ्यावी. अवनति करून घेऊं नये. आपलें हित करून घेणे किंवा अहित करून घेणें हें सर्वस्वीं आपल्या स्वाधीन आहे.

( श्लोक )

करूनी थोर यत्नातें । नर मेळवि उन्नति ।
तरीच थोरवी पावे । अन्यथा लघु तो अति ॥ १

—**व्हागन्**

मनुष्यास आत्मशिक्षण मिळविण्याचा हाच उत्तम मार्ग आहे. व शेक्सपिअर कवीनें मार्क अँटोनीच्या मुखांतून ब्रूटसविषयीं जे उद्गार वदविले आहेत ते स्वतःस

लागू करून घेण्याची पात्रता जर कोणास येण्यासारखी असेल तर ती ह्याच मार्गानें येईल:—

( ओवी )

पंचतत्त्वांच्या अपूर्व मिश्रणें। निर्मिला तो नरवीर विधीनें ॥
त्याचें सौजन्य पाहूनि सन्मानें। विश्वही मान डोलवी ॥ १

—शेक्सपिअर

व एकाद्या स्त्रीला खालील पद्यांत वर्णन केलेली योग्यता मिळण्यासारखी असेल तर ती ह्याच रीतीनें मिळेल.

( श्लोक )

ती देवताच गमते अति निष्कलंका ।
मंत्री सखी सुवचना सुखदात्रि एका ॥
तीचें प्रसन्न मुख दीपित होय तेजें ।
स्वर्गीच केवळ सदाहि विराजते जें ॥ १

—वर्डस्वर्थ

सर वाल्टर स्कॉट ह्यानें मरतेसमयीं आपला भाचा लॉकहॉर्ट ह्यास उपदेश केला तो ध्यानांत ठेवण्यासारखा आहे:—" तूं सद्गुणी हो, धर्मनिष्ठ हो, साधु हो. मृत्युसमयीं तुला ह्यांपासूनच समाधान वाटेल. "

(श्लोक)

योऽतःसुखोंतरारामस्तथांऽतर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभतोऽधिगच्छति ॥ १

**—भगवद्गीता**

**भावार्थः**—ज्या योग्याला आपल्या हृदयामध्येंच सुख, आराम आणि ज्ञान हीं प्राप्त करून घेतां येतात, तो केवळ ब्रह्मस्वरूप होऊन ब्रह्मानंदाचें सुख पावतो.

(श्लोक)

सर्वत्र संपदस्तस्य । संतुष्टं यस्य मानसम् ॥
उपानद्गूढपादस्य । ननु चर्मावृतैव भूः ॥ १

**—सुभाषित**

**भावार्थः**—ज्याचें मन संतुष्ट आहे त्याला सर्वत्र सुखसमृद्धि मिळते. ज्याच्या पायांत जोडा आहे त्याला सर्व भूमि कातडें अंथरल्याप्रमाणेंच मृदु लागते.

# प्रकरण १८

## शांति आणि सौख्य

वैभव आणि सुख हीं सदैव एकत्र असतात हा समज अगदीं चुकीचा आहे. उलट असें आढळून येतें कीं, लक्ष्मी आणि सरस्वती जशा क्वचित् एकत्र सांपडतात, त्याचप्रमाणें वैभव आणि सुख ह्यांचीहि गोष्ट आहे. एखाद्या मनुष्यास संपत्ति, अधिकार, पदवी, दीर्घ आयुष्य इत्यादि गोष्टी अनुकूल असतील; आणि असें असतांहि त्याला खऱ्या सुखाची ओळख देखील नसण्याचा संभव आहे. सुखी होणें हें मनुष्याच्या मनावरच अवलंबून आहे. ह्या जगांत ज्यांना वैभव प्राप्त होतें, त्यांना त्याच मानानें संकटें व चिंता प्राप्त होतात. आपलें मन प्रसन्न ठेवण्याची हातोटी ज्याचे अंगीं नाहीं, त्याला जगांतील सर्व सुंदर आणि चमत्कारिक पदार्थ मिळाले, व सर्व प्रकारचे विलास आणि मौजा त्याच्या हातीं आल्या, तथापि त्यास खऱ्या सुखाचा अनुभव मिळणें सर्वथा अशक्य होय. प्रसिद्ध जर्मन् तत्त्ववेत्ता शोपेनहॉर म्हणतो, "एकाला हें सर्व जग शून्य, कंटाळवाणें, व निःसत्त्व वाटतें; पण तेंच दुसऱ्याला अर्थपूर्ण वाटत असून, त्यांत त्याला सुखाचीं, ज्ञानाचीं व मनोरंजनाचीं साधनें सर्वत्र भरपूर दिसतात." ज्याला संगीतकलेचें यत्किंचित्‌हि ज्ञान नाहीं, त्याला कोणतेंहि तंतुवाद्य म्हणजे केवळ लांकूड आणि तारा ह्यांशिवाय दुसरें कांहीं नाहीं असें वाटतें. पण त्या कलेमध्यें जो निपुण असतो तो त्याच वाद्यांतून सुस्वर आणि मं-

जुळ¹ आलाप काढून जनावरांस देखील मोहित करितो. सुखप्राप्तीची गोष्ट देखील अशीच आहे. योग्य मार्गानें सुख मिळविण्याचा यत्न केल्यास तें मिळेल. तथापि त्याजविषयीं फाजील चौकसपणा दाखविल्यास तें दूर पळतें. सुखाविषयीं अत्यंत आतुर न होणें, हेंच सुखप्राप्तीचें साधन आहे. "सुखांचा त्याग करावा, म्हणजे तीं आपल्या मागोमाग आलींच म्हणून समजावें."

( श्लोकार्ध )

सदा सन्तुष्टमनसः । सर्वाः सुखमया दिशः ॥

—भागवत

भावार्थ: ज्याचें मन संतुष्ट आहे त्याला सर्व दिशा सुखमय होतात.

आपल्या मनांत सदासर्वकाळ आपणा स्वतःविषयींचाच विचार बाळगूं नये. कारण जगांत आपण एकटेच प्राणी आहों असें नाहीं. रस्किन् म्हणतो, "मनोरंजनाचीं साधनें हुडकण्याच्या नादास लागूं नये. कोणत्याहि गोष्टीनें मनोरंजन होईल अशी आपली वृत्ति ठेवावी." ह्यामुळें नेहमीं उच्च प्रकारचें सुख मिळेल असें नाहीं, तथापि, सदा करमणूक होऊन आनंदी वृत्ति रहाणें हें सुद्धां फार महत्त्वाचें आहे.

विनोदी वृत्ति ही मनुष्यास दिलेली विशेष देणगी आहे. इतर प्राण्यांना मनुष्याप्रमाणें विचारशक्ति आहे किंवा नाहीं ह्याविषयीं थोडी शंका आहे. पण त्यांच्यामध्यें विनोद हा गुण असल्याचें मुळींच दिसून येत नाहीं. आपण ज्या दिवशीं मुळींच हांसलों नाहीं तो दिवस अगदींच फु-

¹ फ्रांक्लिन्

कुट गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. मंडळींत आनंदाचा हंशा पिकला म्हणजे काय बहार होते व जिकडे तिकडे कसा आनंदी आनंदच होऊन जातो बरें!

आनंदी मन असलें म्हणजे मनुष्यास लवकर थकवा येत नाहीं. व त्याच्या अंगीं पुष्कळ उपयुक्त कामें करण्याचा उत्साह रहातो. पण उदासवृत्तीचा मनुष्य केव्हांच थकून जातो.

आनंदी वृत्ति ही धर्माचरणाचें एक मुख्य साधन आहे. सच्चिदानंद' ह्या परब्रह्मस्वरूपाचा आनंद हा एक मुख्य भाग आहे. जर आपणांस एखादे दिवशीं राग आला, तर तो दिवस मावळण्याच्या पूर्वी विसरून जावा. भांडण होण्यास नेहमीं दोन माणसें लागतात. त्यांपैकीं आपण एक होऊं नये म्हणजे झालें.

कांहीं लोकांस उगीच कुरकूर करण्याची संवय असते. त्यांना जरी इंद्रभुवनांत नेऊन ठेविलें तरी तेथे देखील कांहीं कमीपणा काढून ते रडत बसतील. कांहीं लोकांचा स्वभाव ह्याच्या अगदीं उलट असतो. ते कोठेंहि असले तरी त्यांना सर्वत्र आनंदच होत असतो.

( श्लोक )

भीतीस गर्तेत मिळेल थारा। निराशतेचा न शिवेल वारा॥
न प्रीतिचा निर्झर शुष्क होई। पृथ्वी तदा स्वर्गचि अन्य होई॥१

—मॉरिस

आनंदी स्वभाव हें शक्तिवर्धक औषधच आहे. सूर्यप्रकाशानें जशीं सुंदर फुलें फुलतात व फळें पक्क होतात, त्याचप्रमाणें आनंदी वृत्तीनें सत्कृतिबीजास अंकुर फुटतो,

आणि आपणांमधील उत्तम गुणांचा विकास होतो. ह्या वृत्तीमुळें स्वतःचें सुख वाढतें एवढेंच नाहीं, तर दुसऱ्यांनाहि आनंद होतो. व ह्या दृष्टीनें पाहतां आनंदी वृत्ति ठेवणें हें इतर लोकांसंबंधानें आपलें एक कर्तव्यच होतें. इंग्लंडांत अशी एक जुनी समजूत होती कीं, ज्या ठिकाणीं इंद्रधनुष्याचा भूमीस स्पर्श होतो, तेथें एक सुवर्णपात्र उत्पन्न होतें. आनंदी मनुष्यांच्या अंगीं असाच कांहीं चमत्कारिक गुण आहे. ते आपल्या हास्यवदनानें, आपल्या शब्दानें, केवळ आपल्या सान्निध्यानें, जिकडे तिकडे आनंदच करून सोडतात. सूर्योदयाप्रमाणें त्यांच्या आगमनानें सर्व वस्तु प्रसन्न दिसूं लागतात. मनुष्याची वृत्ति जोंपर्यंत आनंदी आहे तोंपर्यंत त्याचा शक्तिपात सहसा होणार नाहीं. फ्लारेन्स नाइटिंगेल ह्या परोपकारी साध्वीचें नांव पुष्कळांस ठाऊक असेल. ती लढाईंतील जखमी व आजारी शिपायांस औषधोपचार करीत असे. त्यावेळीं औषधांपेक्षां तिच्या हास्यवदनानेंच पुष्कळ रोग्यांस आराम वाटत असे. अशा रीतीनें दुसऱ्याच्या दुःखाचे आपण वांटेकरी झाल्यानें आपलें दुःखहि हलकें होतें.

कांहीं लोकांचा असा समज असतो कीं, जेथें आनंद आणि विनोद आहे तेथें विवेक सांपडणें कठिण आहे. पण हें खरें नाहीं. आनंदी स्वभाव आणि विचारीपणा ह्या दोन गुणांचा परस्परविरोध असण्याचें कांहीं कारण नाहीं. उलट हे गुण पुष्कळ ठिकाणीं एकवटलेले दिसून येतात. " अत्यंत विचारी व मायाळू मनुष्यांच्या अंगींच आनंदी वृत्ति विशेषतः दिसून येते. व त्यांच्या ठिकाणीं

ती जशी शोभेत तशी उथळ मनाच्या निर्दय व मूर्ख मनुष्यांच्या ठिकाणीं शोभत नाहीं."

कांहीं लोकांस ह्या जगांतील जीवित म्हणजे एकप्रकारची सक्तमजुरीची शिक्षाच होऊन जाते. पण ही गोष्ट गरिबीवरच अवलंबून असते असें नाहीं. पुष्कळ श्रीमंत लोक देखील गरिबांप्रमाणें किंवा त्यांच्यापेक्षां देखील अधिक काबाडकष्ट करितात. स्वतःच्या संपत्तीमुळेंच ज्यांना विश्रांति, स्वास्थ्य आणि शांति ठाऊक नाहीं असे किती तरी लोक आहेत! जगांत अडचणी व दुःखें आपल्या हिश्शाप्रमाणें आपणांस प्राप्त होणारच, पण त्यामुळें मनाची शांति व सुख कमी होऊं न देणें, हें प्रत्येकाच्या हातीं आहे. आपल्या मनोमंदिरांत सुंदर कल्पना, व सुखदायक प्रसंगांची आठवण सदोदित ठेवणें हें मनःस्वास्थ्य प्राप्त करून घेण्याचें एक उत्तम साधन आहे.

आपणास सुख मिळावें असें प्रत्येकास वाटतें, पण तें कसें मिळवावें हें फार थोड्यांस ठाऊक असतें. त्यांना ह्या नरजन्माची महती केवढी आहे व त्यांत किती प्रकारचे आनंद प्राप्त होण्याजोगे आहेत ह्याची कल्पना मुळींच नसते.

किरकोळ अडचणींना उगीच मोठ्या संकटांचें स्वरूप देऊं नये. सिसिरो म्हणतो, "काल अनंत आहे, व विश्वाचा विस्तार अमर्याद आहे हें ज्याला समजतें, त्याला कोणती अडचण मोठी वाटणार आहे? ज्ञानी मनुष्याला ह्या मानवी क्षणिक आयुष्यामध्यें मोठी दिसण्या-

१ आर्नोल्ड

जोगी कोणती वस्तु असणार? त्याचें मन सदा जागृत आणि सावध असल्यामुळें त्याला कोणताहि प्रसंग आकस्मिक वाटणार नाहीं, व त्यामुळें तो केव्हांहि डगमगणार नाहीं." हें ज्ञान व ही योग्यता अंगीं नसल्यामुळें पुष्कळांस किरकोळ अडचणींचाहि मोठा बाऊ वाटतो.

मनुष्य साधारणपणें सुख तेव्हांच विसरून जातो. पण दुःखासंबंधानें मात्र राईचा डोंगर करितो. जरा कोठें खरचटलें तर त्याला वाटतें कीं आपणास मर्मस्थानींच जखम झाली आहे. एका गृहस्थास कांहीं क्षुल्लक इजा झाली असतां त्यानें लगेंच शस्त्रवैद्यास बोलाविलें. वैद्यानें येऊन जखम पाहिली, व घाईघाईनें मलमपट्टी आणण्याकरितां मनुष्य पाठविला. तेव्हां त्या गृहस्थानें घाबरून वैद्यास विचारलें, "वैद्यबोवा, जखम इतकी भयंकर आहे काय हो?" वैद्य शांतपणें बोलला, "नाहीं, मुळींच नाहीं. पण जर माझा मनुष्य पट्टी घेऊन जलद आला नाहीं, तर ही जखम बहुधा आपोआप बरी होईल, म्हणून मीं घाई केली." खरोखर म्हटलें तर दुःख आणि दुखणें हीं योग्य काल गेल्यानंतर आपोआपच नाहींतशीं होतात.

**मिल** म्हणतोः—" तत्त्वज्ञानी लोकांची गोष्ट क्षणभर राहूं द्या. पण साधारणपणें ज्याचे मनावर विद्येचा संस्कार झाला आहे, ज्याला ज्ञानाचा झरा सांपडला आहे. व जो आपल्या विविध शक्तींचा उपयोग करण्यास शिकला आहे, त्याला आपल्या सभोंवतीं देखील आनंदाचीं अनेक साधनें दिसतील. सृष्टींतील पदार्थ, कलाकौशल्याच्या वस्तु, कवींच्या कल्पना, ऐतिहासिक

कथा, मनुष्याचे भूतकालचे व वर्तमानकालचे रीतिरिवाज, व त्याच्या भावी उत्कर्षाचीं चिन्हें, इत्यादि गोष्टींपासून त्याला सुख झाल्यांवाचून रहाणार नाहीं. पण ज्याला इतरांविषयीं सहानुभूति नाहीं, व कोठेहि आपलेपणा न वाटल्यामुळें जो वरील गोष्टींकडे केवळ जिज्ञासा तृप्त करण्याच्या इच्छेनें, व परकीपणानें पहातो, त्याला मात्र वरील गोष्टींपासून आनंदाच्या गुदगुल्या होणार नाहींत."

परमेश्वरानें आपणांकरितां ह्या जगांत सुंदर वृक्ष, सुवासिक फुलें, हिरवेंगार गवत, नद्या, सरोवरें, समुद्र, पर्वत आणि प्रकाश हीं निर्माण केलीं आहेत. पण ज्याची उल्हासवृत्ति आहे त्यालाच त्यांपासून आनंद होईल.

(श्लोक)

प्रत्यूषकाल अति रम्य सुशांत आहे ।
वारा सुगंधयुत शीतल मंद वाहे ॥
वाटे भुजा पसरुनीच वसंत आला ।
आलिंगुनी मुदित भूमि करावयाला ॥ १

—मॉरिस्

पण सौंदर्यापासून आनंद होण्यास तें जाणण्याची शक्ति असली पाहिजे. कारण त्याशिवाय तज्जन्य सुखाचें ज्ञान अथवा अनुभव शक्यच नाहीं. कुत्रा व हत्ती ह्यांच्या शहाणपणाविषयीं आपण पुष्कळ गोष्टी ऐकिल्या आहेत; पण ह्यावरून सृष्टींतील अत्यंत सुंदर देखावा पाहून त्यांच्या मनास आल्हाद होईल असें मानण्यास कांहीं कारण नाहीं.

"काय करावें हा, आह्मांला कांहीं कामच नाहीं, ह्यामुळें फार कंटाळा आला आहे: कांहीं सुचत नाहीं."

असे उद्गार  कांहीं लोक तक्यास टेंकून हात चोळीत चोळीत काढतांना आपण अनेक वेळां ऐकतों. पण हा दोष सर्वस्वीं त्यांजकडेसच असतो. "चांगली शरीरसंपत्ति, हातपाय, डोळे, कान, आणि फुरसद इतक्या गोष्टी ज्याला अनकूल आहेत, त्यानें वरील प्रकारची कुरकूर करणें हें लाजिरवाणें होय. व तो मनुष्य ईश्वरानें दिलेल्या देणग्यांस सर्वथा अयोग्य आहे असेंच म्हटलें पाहिजे."

केवळ संपत्ति आणि पदवी ह्यांच्या योगानें सुख प्राप्त होत नाहीं. प्रेम, उदारता, आणि शांति हीं जर मनुष्यामध्यें नसतील, तर कितीहि संपत्ति आणि अधिकार मिळाला तरी त्याला सुखाची प्राप्ति होणें शक्यच नाहीं. इराणच्या बादशहाची[1] अशी गोष्ट सांगतात कीं, एकदां त्याला मुळींच करमेनासें झाल्यामुळें त्यानें आपल्या पदरच्या ज्योतिष्यांस सुखप्राप्तीचा उपाय विचारिला. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, एकादा पूर्ण सुखी मनुष्य शोधून त्याचा अंगरखा अंगांत घालावा, म्हणजे सुख मिळेल. त्यावरून पूर्ण सुखी मनुष्याचा तपास सुरू झाला. प्रथम सर्व राजवाडा धुंडाळला. नंतर देशांतील सर्व संपन्न लोकांमध्यें चौकशी केली. पण कांहीं केल्यानें तशा प्रकारचा मनुष्यच मिळेना. शेवटीं शोधतां शोधतां एक मजूर भेटला. तो पूर्ण सुखी अशा संज्ञेस पात्र होता. पण हाय हाय ! इतका शोध करून शेवटीं जी वस्तु हवी होती ती मिळाली नाहींच. कारण तो मजूर बिचारा बोलून चालून दिगंबर पडला, मग त्याचा अंगरखा कोठून मिळणार ?

[1] सौदे

माग सांगण्यांत आलेंच आहे कीं, सुख हें पैसा अगर सत्ता ह्यांच्या जोरावर कधींहि मिळत नाहीं. हा सिद्धांत जगांत आजपर्यंत होऊन गेलेल्या ज्ञाते लोकांच्या मतें ठाम ठरून गेलेला आहे. राजे लोकांच्या मुकुटाची आंतील बाजू नेहमीं कंटकावृत असते. " राजे लोकांच्या बाह्य वैभवानें व भपक्यानें बहुजन नेहमीं फसला जातो. पण त्यांत मोठेंसें नवल नाहीं. कारण लोकांचें मत नेहमीं बाह्य रंगावरूनच बनत असतें. आपल्या जवळील अत्यंत मूल्यवान् वस्तु लोकांच्या नजरेस पूर्णपणें येतील अशा विशेष रीतीनें राजे लोक आपलें वैभव लोकांपुढें मांडीत असतात. आणि आपलीं छिद्रें आणि उद्वेगजनक गोष्टी मात्र अगदीं लपवून ठेवितात. त्यामुळें बहुजन त्यांनाच सुखी समजत असतो. पण खरें सुख अथवा दुःख शोधून काढण्याची गुप्त जागा जें हृदयमंदिर त्याची किल्ली मिळाली म्हणजे मात्र खरा सुखी कोण व खरा दुःखी कोण हें ताबडतोब समजतें. माझ्या स्वतःच्या अनुभवावरून मला पक्कें कळून चुकलें आहे कीं, राजे लोकांनीं बाहेरून कितीहि डौल केला तरी त्यांच्या नशिबीं मोठा वांटा दुःखाचा व लहान वांटा सुखाचा हें ठरलेलें आहे. "

ज्या लोकांस ह्या जगांत सुखाचा अनुभव येत नाहीं त्यांना कदाचित् म्यासिलन् नामक ग्रंथकाराची पुढील उक्ति वाचून कांहीं समाधान वाटण्यासारखें आहेः—" हे मानवा, तुला एथे सुख होत नाहीं ह्याचें काय कारण

१ झेनाफन्

असावें खरें ? मला वाटतें कीं, ही पृथ्वी तुला राहण्यास योग्य स्थळ नाहीं; तूं स्वर्गलोकींच राहण्यास योग्य आहेस; हा भूलोक तुझी खरी जन्मभूमि नव्हे; ज्या ज्या वस्तु ईश्वरास प्रिय नाहींत, त्यांचा तुला कांहीं उपयोग नाहीं. " " पण खरें म्हटलें तर ह्या जगांत सुखाचे अनेक प्रकार आहेत, व सज्जनांना अनेक मनोहर मार्ग आहेत त्यांची गणती करणें देखील अशक्य आहे. अत्यंत थोर साधूंच्या सुजनतेचें, व ह्या जगांतील अत्यंत श्रेष्ठ सुखांचें वर्णन करावयाचें असल्यास ता अवर्णनीय आहेत असेंच म्हणावें लागतें. "

"आणि तत्त्वदृष्ट्या विचार केला तर इटालीचा महा कवि ड्यांटे ह्याच्या[1] उक्तीप्रमाणें आपणांसहि म्हणतां येईल कीं,

( श्लोक )

गमे माते कीं हें अखिल जग मोदें स्मित करी।
चहूं बाजूंनींही उठति परमानंदलहरी॥
जगीं शांती प्रेमा अनवरत वा त य व ित।
अनेया संपत्ती अमित सुख सर्वत्र दिसती॥ १

तुकाराम बोवांनीं खालील सुंदर अभंग रचिला तेव्हां त्यांच्या मनांत अशाच प्रकारची कल्पना घोळत असावी असें वाटतें.

( अभंग )

ऐसें भाग्य कई लाहता होईन। अवघे देखें जन ब्रह्मरूप॥ १
मग तया सुखा अंत नाहीं पार। आनंदें सागर हेलावती॥ २

सृष्टींतील प्रत्येक वस्तु शहाणपणाच्या व हितावह नियमांनीं नियंत्रित आहे, व ती सांखळींतल्या दुव्याप्रमाणें

[1] बेकन

इतर वस्तूंशीं जोडलेली आहे. सृष्टींतील प्रत्येक घडामोड एकंदरींत हितपरिणामीच असते. आपणांस कांहीं त्रास झाला अथवा नुकसान सोसावें लागलें तर तें आपल्या गतापराधाबद्दल शासन म्हणून असतें, किंवा त्यापासून एकंदर जनसमूहास तरी फायदा होतो. सेनेका म्हणतो, " ज्याच्या शेवटीं सुखप्राप्ति नाहीं असें एकहि कर्तव्य नाहीं, व जो तोडतां येणार नाहीं असा एकहि मोहपाश नाहीं. "

ग्रीक तत्ववेत्ता एपिक्युरस ह्यानें मनुष्याच्या वासनांचे तीन वर्ग कल्पिले आहेत :- कांहीं वासना स्वाभाविक आणि अवश्य असतात. कांहीं स्वाभाविक असतात पण अवश्य नसतात. कांहीं स्वाभाविक नसतात व अवश्यहि नसतात. पैकीं पहिल्या प्रकारच्या वासना तृप्त करण्यास फार थोडा श्रम व खर्च पुरतो. दुसऱ्यांनाहि फारसें लागत नाहीं. कारण स्वाभाविक वासना तृप्त होण्यास फार द्रव्य किंवा श्रम लागूं नयेत अशी सृष्टीचीच योजना दिसते. पण तिसऱ्या प्रकारच्या वासनांच्या नादीं जर मनुष्य लागला तर मग त्याला सीमाच नाहीं व त्याचें समाधान होणेंहि शक्य नाहीं.

ह्या आयुष्यामध्यें आपणांस पूर्ण सुखाचा अनुभव घ्यावयाचा असेल तर जीं अनेक क्षणिक व दिखाऊ सुखें आहेत त्यांना प्रथम फांटा दिला पाहिजे. आत्मसंयमनानें जितकें सुख मिळतें तितकें आपल्या सुखोपभोगाच्या इच्छा पुरविण्याच्या खटपटीस लागल्यानें कधींहि मिळणार नाहीं. इंद्रियें हीं सुखाचीं साधनें आहेत खरीं; तथापि जर

आपण त्यांच्या ताब्यांत गेलों तर बेलगामी व बेफाम घो- ड्यावरील स्वाराची जी दुर्दशा तीच आपली होईल, म्ह- णजे व्यसनरूपी खडकावर आदळून आमचा चुराडा हो- ईल ह्यांत शंका नाहीं.

( श्लोक )

ठावें नसे अन्यवशत्व ज्याला ।
शुद्धा मती कवैक हाचि ज्याला ॥
चातुर्य हो सत्यचि हें जयाचें ।
तज्जन्म तच्छिक्षण धन्य याचें ॥ १

—वटन्

प्रस्तुतच्या काळीं मनुष्यास फार थोडी फुरसद मिळते ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. हल्लीच्या मन्वंतरांत मनु- ष्याच्या पाठीमागें पोटाचा धंदा सारखा लागलेला आहे. आज सारा दिवस दगदग करून मिळविलें काय तर सरासरी पोट भरण्यापुरते पैसे मिळविले. पण एक क्षणभ- रसुद्धां स्वस्थचित्तानें बसण्यास फुरसद नाहीं." असे उ- द्गार किती लोकांच्या तोंडून निघत असतील बरें !

शांतिसुखाचा अनुभव प्राप्त होण्यास मनाचें स्वास्थ्य पाहिजे. कोणतेंहि चांगलें काम गडबडीनें कधींहि होत नसतें. विचारपूर्वक काम करण्यास वेळ आणि स्वस्थता ह्यांची जरूर असते.

" आपणां सर्वांस खरोखर जें कांहीं पाहिजे तें अं- तःस्वास्थ्य होय. म्हणजे हृदय आणि मस्तक हीं सदा स्वस्थ असलीं पाहिजेत. आपली वागणूक शांत, संयमी, स्वावलंबी व अनासक्त असावी. म्हणजे मग उत्साहज-

१ चिलखत

नक पदार्थांची गरज नाहीं. कारण ग्लानिच कधीं येत नाहीं. चित्ताला उद्वेग नसल्यामुळें झोंप आणणाऱ्या पदार्थांची अवश्यकता भासत नाहीं. मन ताब्यांत असल्यामुळें ईश्वरदत्त पदार्थांचा दुरुपयोग न करितां उपभोग घेतां येतो. आणि मग तपस्व्यांच्या कडक व्रतांचा अवलंबहि करावयास नको. तात्पर्य. नुसत्या खाण्यापिण्यांत. नव्हे. तर सर्व प्रकारच्या वासना. विचार. व आचरण ह्यांतहि नियमन झाल्यानें असें होतें कीं. ईश्वरदत्त स्वाभाविक सुखसाधनें सोडून काल्पनिक सुखांच्या मागें सैरावैरा धांवण्याचा आपला ताप सर्वस्वीं चुकतो. म्हणजे आपणांस स्वस्थता आणि सुख हीं सहजगत्या लाभलल्या साधनांपासून प्राप्त होतात."

"देवानें लावून दिलेल्या मार्गानें चालावें. नाहीं तर प्रबल इच्छेला वश होऊन कांहीं गडबड केल्यास त्याबद्दल बक्षीस मिळालेंच म्हणून समजावें. हें बक्षीस कोणतें म्हणाल तर कर्तव्यकर्मापासून आपली च्युति होणें हेंच होय. आणि मग विनय. प्रामाणिकपणा. योग्यायोग्य विचार ह्यांना रजा मिळते. ह्यापेक्षां आणखी मोठें नुकसान तें कोणतें ?"

रस्किन् म्हणतो:—"आपणांस पुष्कळ गोष्टी मिळाल्या नाहींत म्हणून नेहमीं आपली कुरकुर असते. एकाद्या निवडणुकीचे वेळीं मला मतें पाहिजेत. मला स्वातंत्र्य पाहिजे, मला करमणुकीचीं साधनें पाहिजेत, मला द्रव्य पाहिजे अशी ओरड सर्वत्र ऐकूं येते. पण मला शांति

१ किंग्स्ले २ एपिक्टीटस

पाहिजे असें कोणी म्हणतो किंवा जाणतो काय? ती जर कोणाला हवीशी असेल तर ती प्राप्त करून घेण्याचे दोन मार्ग आहेत. व त्यांपैकीं एक तर सर्वांनीं आपल्याच ताब्यांत आहे. तो हाच कीं आपलें मन सुंदर आणि उदात्त विचारांनीं अगदीं भरून ठेवावें. आपलें मनोरूपी भांडार उत्तम विचारांनीं भरून ठेविल्यानें आपल्या ताब्यांत एक सुखाची खाणच येते. व तिच्यापुढें संकटें आणि विपत्ति ह्यांचें कांहीं चालत नाहीं. ही गोष्ट पुष्कळांस माहीत नसते, ह्याचें कारण लहानपणापासून आपणांस तशा प्रकारचें शिक्षण मिळत नाहीं हें होय. सुंदर कल्पनातरंग, मागील मनोहर प्रसंगांची आठवण, उच्च प्रतीचे इतिहास, सुबोधवचनें, हे सर्व अमूल्य व सुखदायक विचारांचे खजिनेच होत. चिंतेनें ह्यांत फरक होत नाहीं. दुःखानें ह्यांना उदासीनता येत नाहीं. गरिबीच्या योगानें त्यांस आपण मुकत नाहीं. अशीं हीं विन हातांनीं तयार झालेलीं विश्रान्तिगृहें आपल्या आत्मारामाच्या सुखाकरितां सहज प्राप्त होण्याजोगीं आहेत."

"मनाचा समतोलपणा सर्वदा राखीत जा," म्हणून अंटोनियस नामक रोमन बादशहानें आपल्या मृत्युसमयीं जवळच्या अधिकारीवर्गास उपदेश केला तो फार महत्त्वाचा आहे. हा समतोलपणा गौतमबुद्धांसारख्या महात्म्यांच्या पवित्र चरित्रांत सर्वत्र दिसून येतो.

"वासनांचा त्याग करावा, म्हणजे पूर्ण समाधान मिळेल"[1] मोठ्या नुकसानीच्या बाबींनीं आपणांस फार

1 टॉमस ए. केंपिस

दुःख होतें. पण किरकोळ अडचणीमुळें आपण जवळ जवळ तितकाच त्रास करून घेतों.

( अभंग )

आपुलें क्षुब्ध मन । आपणांही गांजी ॥
तेंत जगामाजी । अन्य नसे ॥ १

किंवदंती.

शरीरसंपत्तीसारखी दुसरी संपत्ति नाहीं व हृदयाच्या आनंदासारखें दुसरें सौख्य नाहीं. सुख शोधण्यासाठी आपणास दूर जाण्याचें कारण नाहीं. कारण तें नेहमी आपल्या जवळ आपल्या हृदयमंदिरांत आहे. "स्वर्ग स्वर्ग म्हणतात तो देखील तेथेच आहे." ह्या जगांत जर आपणांस सुखप्राप्ति करून घेतां येत नाहीं, तर हें जग सोडल्यावर ती करून घेतां येईल असें तरी कशावरून म्हणावें ? परमेश्वर त्यावेळीं आपणांवर हल्लींच्यापेक्षां अधिक नजर ठेवील असें थोडेंच आहे. ह्या जगांत आपल्या सुखाच्या आड येणाऱ्या गोष्टी म्हटल्या म्हणजे गर्व, लोभ, स्वार्थलंपटपणा, व महत्त्वाकांक्षा ह्या होत. हे विकार जर आपणामध्यें नसतील तर आपणांस एथे देखील सुख होईल. पण ते जर आपणांस चिकटून राहिले तर आपण कोठेहि गेलों तरी सुखाचें नांव नको. ह्या जगांत मूल्यवान् मानलेल्या वस्तूंसाठीं जर आपण एवढे चिंताक्रांत असतों, तर स्वर्गांत गेल्यावर तेथील वस्तूंबद्दल आपणांस किती बरें काळजी करावी लागेल! एथे जर आपणांस इतरांशीं गुण्यागोविंदानें रहातां येत नाहीं, तर इतर ठिकाणीं तरी तसें करितां येईल ह्याचा काय नियम आहे ?

जर बाह्य उपाधीवर आपण आपलें सुखदुःख अवलंबून ठेविलें व पूर्ण सुखाकरितां दुसऱ्या जगावर भिस्त ठेविली, तर दुसऱ्या जगांत गेल्यावर तिसऱ्यावर भिस्त ठेवूं, व ह्याप्रमाणेंच नेहमी होत जाईल. म्हणून सुखप्राप्ति होणें किंवा न होणें हें सर्वस्वी आपल्या मनावर अवलंबून आहे ह्यांत शंका नाहीं.

सुखापासून तीन प्रकारचे आनंद होत असतात. एक पुढें सुख येणार ह्या आशेनें होणारा; दुसरा, प्रत्यक्ष सुख प्राप्त झालें म्हणजे होणारा; तिसरा, पूर्वी प्राप्त झालेल्या सुखाच्या स्मरणापासून होणारा. आपणांस अंतरलेले आपले प्रिय-आप्त पुनः भेटणार आहेत, ज्या गोष्टी हल्लीं आपल्या ज्ञानाच्या बाहेर आहेत त्या आपणांस पुढें कळणार आहेत, वगैरे भावी सुखाच्या कल्पनांपासून एक मोठा व शुद्ध आनंद आपणांस होतो, ह्यांत शंका नाहीं; तथापि प्रस्तुतकाळीं प्राप्त होणाऱ्या सुखांस तुच्छ मानणें किंवा त्या सुखांबद्दल आपणांस कृतज्ञता न वाटणें, हें अत्यंत अनुचित होय.

आपण अशा रीतीनें वागावें कीं, कवीच्या उक्तीप्रमाणें आपणांस खालील उद्गार यथार्थत्वेंकरून व अंतःकरणपूर्वक काढितां यावे:—

( श्लोक )

प्रभो सकलही तुझे असति हेतु कल्याण ते ।
सुखे घटवि तू तयां, व्यजिन मी न मच्छांतिते ॥
पिता जवळि होय तै भय न वाटते बालका ।
असोनि जवळी तुझ्या, मज शिवेल ती भीति कां ॥ १

—केवल

( श्लोक )

शक्नोतीहैव यः सोढुं । प्राक्शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं । स युक्तः स सुखी नरः ॥

—भगवद्गीता

**भावार्थः**—जो मनुष्य हे शरीर सोडण्यापूर्वी कामक्रोधादिकांचा वेग सहन करण्यास समर्थ होतो तोच खरा योगी व ताच खरा सुखी होय.

अशा मनुष्याला सर्वत्र परमेश्वराचें सान्निध्य आहे असा प्रत्यक्ष अनुभव येईल.

ह्या जगांत जसजशी प्रगति होत जाईल तसतशी मनुष्यास अननुभूत व अश्रुतपूर्व सुखें मिळत जातील असा संभव दिसतो. पण अशा प्रकारची प्रगति होण्यास मनुष्याच्या आत्म्यानें शरीरावर शहाणपणानें व प्रेमानें अंमल चालविला पाहिजे, म्हणजे मनुष्य उत्तरोत्तर उन्नतावस्थेस पोंचेल. पण जर शरीराचाच पगडा मनावर बसेल, आणि वासना प्रबल होऊन विचारशक्तीला काबीज करितील, तर मात्र आत्मा आणि शरीर ह्यांची जोडी चांगली होणार नाहीं. व मग तो मनुष्य मूर्ख, दुराचारी, आणि दुःखी होईल: आत्म्यास जर शरीरावर अंमल चालवितां आला नाहीं तर त्याला गुलामाच्या स्थितींत रहावें लागेल.. धनी किंवा बंदागुलाम ह्यांच्याशिवाय तिसरी स्थिति आत्म्यास शक्यच नाहीं.

ह्या जीवितापासून आपणांस सुख होत नसेल तर तो आपलाच दोष आहे. रस्किन् म्हणतो, "सुखी होणें हें प्रत्येकास शक्य आहे असें असतांहि तें फार थोड्यांस

साधतें." मन शांत व सुखी ठेवण्याकरितां त्यांत शहाणपणाचे आणि उदात्त विचार सांठवून ठेविले. पाहिजेत. प्लेटो म्हणतो, "सौंदर्य, शहाणपणा, सौजन्य, इत्यादि दैविक गुणांनींच आत्म्याचें पोषण होतें. पण त्याला जर दुर्गुणांचें खाद्य दिलें तर तो शुष्क होत जातो."

म्हणून पहिल्यापासून चांगल्या गुणांची निवड शहाणपणानें करून,

( श्लोक )

आत्मानंदा र नेई निजगृहिं हृदयीं देई थारा तयाला ।
वात्सल्यानें तयाचें श्रवन करुनियां वाढवीं तू तयाला ॥
सानीं थोरां प्रसंगीं मिळविल तुज तो आपुल्या निश्चयानें ।
आहे आनंद एकस्तवनाच विभुचें ईश पावे नतेनें ॥ १

—जोन इंजलो

साक्रेटिस म्हणतो, "आपली उन्नति करण्याविषयीं जो मनोभावें झटतो, तो उत्तम मनुष्य होय. व ह्या रीतीनें आपण पूर्णत्वास पावत आहों असा ज्याला अनुभव येतो तो सर्वांत सुखी होय."

( ओंव्या )

कर्मभूमि नरदेहा ऐसें । निधान लाधलें अनायासें ॥
तेथिंचेनिहि आयुष्यें । जो विषयविलासें गुंतला ॥ १
तो अमृत विकूनि कांजी प्याला । रत्नें देऊनि कोंडा घेतला ॥
पर्वत फोडूनि टोळ धरिला । गज विकिला इटेसाठीं ॥ २
डोळे फोडूनि काजळ ल्याला । नाक कापोनि शिमगा खेळला ॥
तैसा नरदेह नाडला । नाश केला आयुष्याचा ॥ ३

—एकनाथी भागवत

श्लोक )

अथा: पादरजोपमा गिरिनदीवेगोपमं यौवनम् ।
आयुष्यं जललोलबिंदुचपलं फेनोपमं जीवितम् ॥
धर्मं यो न करोति निन्दितमतिः स्वर्गार्गलोद्घाटनम् ।
पश्चात्तापयुतो जरापरिगतः शोकाग्निना दह्यते ॥ १

—हितोपदेश

**भावार्थः**—द्रव्य हे पायाच्या धुळीसारखें आहे. यौवन हें पर्वतावरून येणाऱ्या नदीप्रवाहासारखें हांहां म्हणतां निघन जाणारें आहे. आयुष्य हे लोंबणाऱ्या जलबिंदूसारखें चंचल आहे. असें असतां जो मनुष्य स्वर्गद्वार उघडण्याची धर्मरूपी किल्ली हस्तगत करून घेत नाहीं, त्याला म्हातारपणीं पश्चात्ताप होऊन तो शोकाग्नीनें जळून मरतो.

# प्रकरण १९

## धर्म

धर्म ह्या विषयामध्यें स्थूल मानानें दोन गोष्टींचा अंतर्भाव होतो: एक, अध्यात्मविद्या; व दुसरें, आत्मकर्तव्य. ह्यांपैकीं अध्यात्मविद्या ही अत्यंत विद्वान् लोकांस देखील गहन आहे. पण आत्मकर्तव्य हें एकाद्या बालकास देखील समजण्यासारखें आहे.

"आत्मकर्तव्याचे नियम ग्रीस देशांतील अपॉलो नामक देवाच्या कौलांप्रमाणें दुटप्पी अर्थाचे नसतात. त्यांची भाषा दुर्बोध नसते. त्यांचा भावार्थ गूढ नसतो. त्यांमध्यें फसवणुकीचा कांहीं प्रकार नसतो. त्या नियमांप्रमाणें वागणारांस जें फल मिळावयाचें म्हणून सांगितलें आहे तेंच खातरीनें प्राप्त होतें. हे नियम नभोमंडलाप्रमाणें सर्वांस दृश्य, चंद्राप्रमाणें उज्ज्वल, व सूर्यतेजाप्रमाणें आरोग्यदायक आहेत. जी गोष्ट आपणांस पूर्णपणें समजत नाहीं तिचा आपण शोध केला पाहिजे, हें खरें आहे. तथापि शोध करूनहि जर आपणांस ती कळली नाहीं, तर तिच्या संबंधानें आपण कर्तव्यपराङ्मुखतेच्या दोषास पात्र होत नाहीं. पण आत्मकर्तव्य हें अगदीं स्पष्ट असल्यामुळें तें करण्यास जो चुकेल तो महद्दोषी म्हटला पाहिजे[1]."

"ईश्वराच्या कृत्यांविषयीं बारकाईनें छडा लावीन असें जर कोणी म्हणेल तर ती गोष्ट मनुष्याच्या क्षुद्रबुद्धीस दुरापास्त आहे इतकेंच नाहीं, नर अपायकारकहि आहे.

१ जेरेमी टेलर

ईश्वराचें ज्ञान हें आपलें जीवनच आहे, व त्याचें स्मरण हा एक परमानंद आहे. तथापि त्याच्याविषयीं आपलें अत्यंत श्रेष्ठ ज्ञान म्हटलें म्हणजे हें कीं त्याचें स्वरूप आपणांस कळत नाहीं व कधींहि कळणार नाहीं. त्याचा महिमा आमच्या बुद्धीच्या आटोक्या बाहेर आहे, व त्याचें वैभव आपणांस अतर्क्य आहे, असें मनांत समजून पूज्यबुद्धीन धारण केलेलें मौन हेंच त्याजविषयींचें आमचें सर्वोत्कृष्ट वक्तृत्व होयें. ”

प्रसिद्ध तत्त्ववेत्ता लॉक् ह्यानें मुलांविषयीं जें सांगितलें आहे तें पुष्कळ प्रौढ वयाच्या माणसांसहि लागू पडण्यासारखें आहे. तो म्हणतोः—मुलांच्या मनांत ईश्वराविषयीं प्रेमभाव आणि पूज्यबुद्धि ठसवून द्यावी. प्रथमतः एवढेंच पुरेसें आहे. ह्यापेक्षां अधिक खुलासा करण्याच्या भरीस पडूं नये. आत्मा म्हणजे काय आहे, परमेश्वराचें स्वरूप किती अगम्य आहे, वगैरे गोष्टी त्यांस बाल्यावस्थेंत समजावून देण्याचा प्रयत्न केला तर त्यांच्या मनांत भलत्याच कल्पना शिरून त्यांच्या विचारशक्तीचा घोंटाळा मात्र होईल. मला वाटतें कीं जो सर्वांस अतर्क्य आहे त्या परमेश्वराच्या वास्तविक स्वरूपाचा निर्णय आपल्या कल्पनेच्या जोरानें करण्याच्या भरीस कोणी पडूं नये हेंच योग्य आहे. पुष्कळ लोकांची बुद्धि ज्ञेय आणि अज्ञेय ह्यांमधील भेद कळण्यासारखी तीव्र नसते. असे लोक परमेश्वराचें स्वरूप शोधण्यांत माथाकूट करूं लागले तर ते एक तर नास्तिक होतात, किंवा, धर्मभोळे होतात.

१ ह्युकर

( श्लोक )

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ १

—भगवद्गीता

**भावार्थः**—जे लोक परमेश्वराच्या अव्यक्त स्वरूपाचें चिंतन करण्याचा प्रयत्न करितात, त्यांना तें काम फार जड जातें. देहधारी मनुष्यास ईश्वराच्या अव्यक्त स्वरूपाचें आकलन होणें फार दुर्घट आहे.

अध्यात्मविद्या आणि धर्ममतें ह्यांत धर्माचा तात्त्विक दृष्टया विचार केलेला असतो. पण धर्माचा व्यावहारिक भाग तो नव्हे. ज्याच्या योगानें जगांत कसें वागावें हें समजतें, ज्याच्या योगानें उत्कर्षाच्या समयींहि मनुष्य बेताल होत नाहीं, ज्याच्या योगानें काळजीच्या व संकटाच्या प्रसंगीं चित्ताचें समाधान होतें, ज्याच्या योगानें मनाची शांति व समता कायम रहाते, तोच धर्माचा मुख्य भाग होय. धर्माचा संबंध मन व शरीर ह्या दोहोंशींहि आहे. मन व शरीर ह्या दोहोंसहि फार पूज्यबुद्धीनें वागविलें पाहिजे.

“ ज्यांच्या योगानें आपण इंद्रियांच्या आधीन होत नाहीं, ज्यांच्या योगानें वर्तमानकाळापेक्षां भूत आणि भविष्यत् हे काल अधिक महत्त्वाचे वाटतात, त्या सर्व गोष्टी मनुष्याच्या मनाची उन्नति करणाऱ्या आहेत.[१] ”

धर्माचरण ही आपल्या इतर व्यवसायांपासून अलग अशी एक स्वतंत्र गोष्ट आहे, व नियमित वेळीं तिची कवाईत केली म्हणजे आपलें कर्तव्य झालें असें समजूं नये

१ जॉन्सन्

धर्माचा आमच्या सर्व व्यवसायांशीं निकट संबंध आहे आपल्या प्रत्येक आचाराच्या व विचाराच्या मूळाशीं धर्म असला पाहिजे, व त्यापासून त्यास इष्ट प्रेरणा आणि वळण हीं मिळालीं पाहिजेत.

आह्मीं कोणत्या रीतीनें वागावें अशाविषयीं ईश्वराचे जे हेतु आहेत, त्यांचें ज्ञान अगदीं आपल्या सन्निध आहे. तें शोधण्याकरितां दूर जाण्याची जरूर नाहीं. तें स्वर्गी नाहीं किंवा सातां समुद्रांपलीकडे नाहीं. तें शोधावयास मी कोठें जाऊं असें कोणास म्हणावयास नको. तें ज्ञान प्रत्यक्ष आपल्या मुखांत व आपल्या हृदयांत आहे.

जीझस् ह्यास एका गृहस्थानें धर्माविषयीं प्रश्न केला असतां त्यानें त्यास खालील उत्तर दिलें:

( श्लोक )

निष्ठा प्रभूवरि अनन्य तुझी असावी ।
तूं आपुल्यासम जनांवरि लोभ ठेवी ॥
तत्त्वें अशीं उभय वागवि तूं मनांत ।
सद्धर्मसार सगळेच असे तयांत ॥ १

" निराश्रित मनुष्यें विपत्तीनें गांजलेलीं पाहून त्यांचा समाचार घेणें व त्यांस मदत करणें, व जगामध्यें वागत असतांहि अगदीं निष्कलंक रहाणें हाच खरा व शुद्ध धर्म होय."

आपण कोठून आलों व कोठे जाणार हें आपणांस सांगतां येणार नाहीं. आपले विचार कसे असावे व आपण

---

* ह्यांपैकीं दुसरें तत्त्व जितकें व्यापक असावें तितकें नाहीं. कारण त्यांत मनुष्येतर प्राण्यांचा स्पष्ट उल्लेख नाहीं.

१ सेंट जेम्स

कशावर श्रद्धा ठेवावी ह्यासंबंधानें कदाचित् कोणास शंका वाटेल. पण आपण काय काय कर्तव्य केलें पाहिजे हें आपणां सर्वांच्या अंतःकरणास ठाऊक असतें. आपल्या शेजाऱ्याविषयीं जें आपलें कर्तव्य आहे तें आपल्या ईश्वरविषयक कर्तव्याचा एक भाग आहे. मनुष्याविषयीं प्रेम असणें हेंच ईश्वरावरील प्रेमाचें खरें निदर्शक होय.

इतर लोकांसंबंधानें आपल्या मनांत असंतोष उत्पन्न झाला म्हणजे आपण असा विचार करावा कीं, आपल्या स्वतःची आपणास हवी तशी सुधारणा करितां येत नाहीं, तर मग लोकांनीं आमच्या मनाजोगतें व्हावें ही केवढी मुष्किलीची गोष्ट आहे बरें!

कदाचित् दुसऱ्याविषयीं कुरकुर करण्यास आपणांस योग्य कारण असलें तथापि आपण क्षमा केली पाहिजे. कारण आपणांस क्षमेची अपेक्षा आहेच.

धर्माचरणाच्या कामीं पुष्कळ लोकांच्या मनावर दुःखाच्या भीतीमुळें जेवढा जोरदार परिणाम होतो, तेवढा सुखाच्या आशेनें होत नाहीं.

( श्लोक )

जो निश्चयें उमजतो क्षणभंगुर हें ।<br>
काया असे गहन कर्मविपाक आहे ॥<br>
तो भूमिचें सकल राज्यहि मेळवाया ।<br>
स्वर्गाहि पातकलवा न धजे कराया ॥ १

—रेले

म्हणून आपल्या सत्कर्मापासून मिळणारें चांगलें फळ जसें ध्यानांत ठेवलें पाहिजे, त्याचप्रमाणें दुष्कर्मापासून होणारे दुष्परिणामहि लक्षांत ठेविले पाहिजेत. आपली ज्ञा-

नशक्ति फारच थोडा वेळ आपल्या स्वाधीन असणार हें उघडच आहे. ज्ञानाचा प्रकाश जोंपर्यंत मिळत आहे तोंपर्यंत आपण ईश्वरप्राप्तीच्या मार्गाचें आक्रमण केलें पाहिजे. आपला ज्ञानसूर्य मावळल्यावर आपणांस अज्ञानांधःकारांत वाट दिसणार नाहीं; म्हणून—

( श्लोकार्ध )

गृहीत इव केशेषु । मृत्युना धर्ममाचरेत् ॥

—हितोपदेश

**भावार्थः**—मनुष्याने आपली शेंडी काळाच्या हातांत आहे असे समजून धर्माचे आचरण करावे.

"एका मनुष्यानें आपलें घर वाळूच्या पायावर बांधलें. दुसऱ्या एका मनुष्यानें आपलें घर खडकावर बांधलें. नंतर पाऊस पडून पाण्याचा मोठा पूर आला, व मोठें वादळ सुरू झालें. तेव्हां वाळूच्या पायावरील घर धडाधड पडून वाहून गेलें. आणि खडकावरील घर तसेंच कायम राहिलें. जो मनुष्य ईश्वराचे हेतु समजत असून त्यांप्रमाणें वागत नाहीं त्याची ह्यांपैकीं पहिल्या मनुष्याप्रमाणें स्थिति होते. व जो त्याप्रमाणें वागतो त्याची दुसऱ्या मनुष्याप्रमाणें स्थिति होते.'[1]"

जो मनुष्य दुसऱ्या लोकांस व विशेषतः मुलांस कुमार्गाकडे वळवितो, त्याला तर काय भयंकर अधोगति मिळणार ह्याची कल्पना देखील करवत नाहीं. "मुलांच्या हातून अन्याय हे थोड्या बहुत प्रमाणानें व्हावयाचेच. पण ते अन्याय त्यांच्या हातून जो घडवून आणितो त्याला सर्वथा धिक्कार असो! अशा मनुष्यास लहान मु-

१ सेंट म्याथ्यूस

लांची नीति बिघडण्याची संधी मिळावी ह्यापेक्षां त्याच्या कंबरेस धोंडा बांधून त्याला समुद्रांत फेंकून द्यावा हेंच योग्य होईल. "

"एकाद्या मनुष्यास पृथ्वीचें राज्य मिळालें असलें, तथापि जर तो मनुष्य धर्मापासून भ्रष्ट झाला असेल तर त्याचें जिणें व्यर्थ होय. धर्मच्युत मनुष्यास जो कोणी धर्मनिष्ठ करील त्याच्या पायांत त्यानें आपल्या कातडीचे जोडे करून घातले तरी देखील तो आपल्या उपकारकर्त्याचा उतराई होणार नाहीं. "[1][2]

तथापि मनुष्याच्या हातून कितीहि पातकें झालेलीं असोत, तो जर वेळीच सावध होऊन खरा पश्चात्ताप पावेल तर त्याला देखील सद्गतीविषयीं निराश होण्याचें कारण नाहीं.

( श्लोकार्ध )

अजामिळ अघासुर व्रजवधू बकी पिंगळा ।
अशां गति दिली उरे न तृण भेटतां इंगळा ॥

—मोरोपंत

( ओंव्या )

दुष्टसंगे विषयासक्त । जरी झाला लौल्यंगत ॥
अनुताप उपजल्या तेथ । होय विरक्त क्षणार्धें ॥ १
महादोषासी प्रायश्चित्त । केवळ अनुताप निश्चित ॥
अनुतापेवीण प्रायश्चित्त । ते जाण एथ विटंबना ॥ २
अनुतापाएवढा सखा । जगीं आणिक नाहीं लोकां ॥
धडाडिल्या अनुताप देखा । सकळ पातकां भस्म करी ॥ ३

—एकनाथी भागवत

१ सेंट ल्यूक २ सेंट म्याथ्यू

मनुष्याची सुधारणा जुलमानें कधींहि होत नाहीं. उपदेश करण्यापेक्षां स्वतःचें उदाहरण घालून दिलें असतां त्याचा अधिक उपयोग होतो. एकाद्या खऱ्या साधूच्या सहवासांत दररोज दहा मिनिटें गेलीं तरी मनुष्याच्या विचारांत व वर्तनांत केवढा फरक पडेल ! पण त्याच मनुष्याचा धर्मछल केला असतां कांहींएक उपयोग होणार नाहीं.

नेहमीं सुविचार मनांत बाळगावे. म्हणजे आपल्या हातून कुकर्म सहसा घडणार नाहीं. " सत्य, प्रामाणिकपणा, शुद्धता, रमणीयता, सद्‌गुण, सत्कीर्ति इत्यादि गुण दाखविणाऱ्या ज्या ज्या वस्तु असतील त्या सर्वांचें नेहमीं चिंतन करावें.''[१] पापाचरण प्रथम मनानें अनेकवार घडतें आणि नंतर तें हातानें घडतें.

सेनेका म्हणतोः—" जी गोष्ट कोणाहि मनुष्यास कळूं नये असें आपणास वाटतें ती ईश्वरापाशीं आपण कधीं मागूं नये. तसेंच जें जें ईश्वरास आवडण्यासारखें नाहीं तशा प्रकारचें कोणतेंहि मागणें मनुष्याजवळ करूं नये."

आपण क्षणभंगुर व अणुरेणूप्रमाणें लहान आहों, म्हणून आपणांविषयीं ईश्वराच्या मनांत काळजी असण्याचा संभव नाहीं, अशा प्रकारची शंका कदाचित् कोणास वाटेल, पण ती सर्वथा निराधार आहे. उंच, निंच, लहान, मोठा, हा भेद परमेश्वराच्या ठिकाणीं मुळींच नाहीं. त्याचेंच आपणांस आश्वासन आहे, तें एणेप्रमाणेः—

१ फिलिपिअन्स

( श्लोक )

मन्मनां भव मद्भक्तो । मद्याजी मां नमस्कुरु ॥
मामेवैष्यसि युक्त्वैव । मात्मानं मत्परायणः ॥ १
ये तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य मत्पराः ॥
अनन्येनैव योगेन । मां ध्यायन्त उपासते ॥ २
तेषामहं समुद्धर्ता । मृत्युसंसारसागरात् ॥
भवामि न चिरात्पार्थ । मय्यावेशितचेतसाम् ॥ ३

—भगवद्गीता

**भावार्थः**—( १ ) माझ्या ठिकाणीं मन ठेव, माझी भक्ति कर, माझें पूजन कर, मला नमस्कार कर, म्हणजे मलाच येऊन मिळशील. ( २ ) जे लोक आपलीं सर्व कर्में माझ्या ठायीं अर्पण करून, सर्वस्वीं मजवर भरीभार ठेवून अनन्यभक्तीनें माझें ध्यान करितात, आणि माझी उपासना करितात ( ३ ) त्यांचें मी मृत्यूपासून आणि संसारसागरापासून संरक्षण करितों.

ईश्वर सर्वसाक्षी आहे. ज्यांना आपल्या दुष्कर्माबद्दल पश्चात्ताप झाला आहे, व जे दुःखानें विव्हल झाले आहेत त्यांच्या प्रार्थनांचा तो अव्हेर करीत नाहीं. म्हणूनच तुकाराम बोवांनीं म्हटलें आहे:—

( अभंग )

आलिया भोगासीं असावें सादर ॥
देवावरी भार घालूनिया ॥ १

—तुकाराम

ईश्वर आपला पाठिराखा व साहाय्यकर्ता आहे. तथापि त्यामुळें आपण आळशी आणि निरुद्योगी होतां कामा नये. पण ईश्वरी कृपा असल्यावांचून आपला उद्योग सफळ होणार नाहीं. ज्या शहरावर ईश्वराची कृपा नाहीं त्या शहराच्या वेशीवर केवढा मोठा पहारा अस-

ला तरी तो व्यर्थ होय. मनुष्याला ज्या उत्तम उत्तम देणग्या प्राप्त होतात त्या ईश्वराच्या कृपेवांचून होत नाहींत."

परलोकप्राप्तीकरितां आपण संसाराचा त्याग केला पाहिजे असें धर्माचें सांगणें नाहीं. इतकेंच नाहीं, तर ह्या जगांत राहून निरपेक्षबुद्धीनें आपलें नेमलेलें कर्तव्य करणें ह्याला कर्मयोग असें नांव दिलें आहे; व इहलोकीं आणि परलोकीं सुख प्राप्त करून घेण्याचा हा उत्तम मार्ग आहे म्हणून भगवद्गीतेंत सांगितलें आहे. ऐहिक आणि पारलौकिक उत्कर्ष साधण्याकरितां लागणारें शहाणपण एकाच प्रकारचें आहे. कारण आपला आयुष्यक्रम यशस्वी होण्यास आपलें प्रत्येक कृत्य धर्मास अनुसरून असलें पाहिजे.

( श्लोक )

सोडोनी निजबांधवां त्यजुनियां कर्तव्यही आपुलें ।
एकांतीं मठवास नित्य करणें हें कोण मानी भलें ॥
ह्या संसारपथीं स्वकर्म करितां कीं अल्प सामान्यही ।
आत्मत्याग करावया स्थल मिळे ईशाप्तिचा मार्गही ॥ १

—केबल्

मनुष्यानें इतर मनुष्यांवर प्रेम करावें हा उपदेश बहुतेक धर्मांमध्यें आढळून येईल. तथापि परमेश्वर सर्व भूतांच्या ठायीं वास करितो ही कल्पना ज्यामध्यें प्रधानभूत आहे त्या आर्यधर्मांत भूतदयेचें पूर्ण स्वरूप दृष्टीस पडतें.

( श्लोक )

एवं सर्वेषु भूतेषु । भक्तिरव्यभिचारिणी ॥
कर्तव्या पंडितैर्ज्ञात्वा । सर्वभूतमयं हरिम् ॥ १

---

सेंट पीटर

**भावार्थः**—परमेश्वर सर्व भूतांच्या ठिकाणी आहे हे जाणून ज्ञानी मनुष्यांनी सर्व प्राण्यांवर प्रीति करावी.

" कोणी म्हणतात कीं मित्रावर प्रेम करावें, व शत्रूंचा द्वेष करावा. परंतु मी तुम्हांला असें सांगतों कीं शत्रूंवर देखील प्रेम ठेवावें. जे आपणांस शाप देतात त्यांस आपण आशीर्वाद द्यावा. जे आपला द्वेष करितात, त्यांचें हित करावें. जे आपणांशीं मत्सरबुद्धीनें वागतात, त्यांचें कल्याण करण्याविषयीं ईश्वराची प्रार्थना करावी. असें झालें तरच आपण ईश्वराचे भक्त म्हणवून घेण्यास पात्र होऊं. परमेश्वर सूर्याचा प्रकाश सज्जनांवर आणि दुर्जनावर सारखाच पाडतो. व तो पाऊस पाडतो त्याचा उपयोग न्यायी व अन्यायी ह्या दोघांसहि सारखाच होतो. जे लोक तुमच्यावर प्रीति करितात त्यांच्यावर तुम्हीं प्रीति केली तर त्यांत काय नवल आहे? कोणी सामान्य प्रतीचा मनुष्य देखील तसें करील ? "

आपणांस कधीं कधीं दुःखाचे व चिंतेचे प्रसंग यावयाचेच. तथापि संकटांचाहि मोठा उपयोग आहे. संकटांपासून आपल्या अंगीं सहिष्णुता येते. सहिष्णुतेपासून अनुभव आणि शिक्षण हीं प्राप्त होतात. आपणांस जीं आत्मोन्नति व वैभव हीं पुढें साधावयाचीं आहेत, त्यांच्यापुढें प्रस्तुत काळचीं संकटें क्षुद्र आहेत.

इपिक्टीटम् म्हणतो:—" आपण ईश्वराच्या इच्छेप्रमाणें वागत आहों, व केवळ मनानें[1] नव्हे तर प्रत्यक्ष आचरणानें सज्जनांच्या मार्गानें जात आहों, अशी आपल्या

1 सेंट म्याथ्यू

मनाची पूर्ण खातरी होण्यांत जो आनंद आहे त्यापुढें इतर सर्व आनंद तुच्छ आहेत. म्हणून तोच आनंद प्राप्त करून घेण्याच्या उद्योगास आपण लागावें." आपल्या धर्माप्रमाणें खरोखर वागणारे लोक फार थोडेच असतील. धर्माच्या बाबतींत वितंडवाद करणारे, दुसऱ्यांशीं तंटा उपस्थित करून त्यांस शिवीगाळ करणारे, परधर्मीयांचा छळ करून त्यांचा जीव घेणारे, धर्मासाठीं आपल्या प्राणांची देखील आहुति देणारे, सारांश, धर्माप्रमाणें प्रत्यक्ष आचरण करणें ही एक गोष्ट खेरीज करून बाकी पाहिजे तें करण्यास तयार होणारें पुष्कळ लोक सांपडतील.

"थोड्याशा नफ्याच्या आशेनें लोक मोठमोठे प्रवास करण्यास तयार होतात. परंतु आपल्या शाश्वत कल्याणासाठीं एक पाऊल देखील टाकण्याचें काम पुष्कळांच्या हातून होत नाहीं. लिहिणें, वाचणें, दुसऱ्यांविषयीं सहानुभूति दाखविणें, प्रसंगविशेषीं मौन धारण करणें, देवाची प्रार्थना करणें, संकटें धैर्यानें सोसणें, एवढ्याच काय त्या गोष्टी आपणांस धर्मासाठीं कराव्या लागतात. पण पारलौकिक सुखासाठीं एवढेचसे काय, पण ह्याच्याहूनहि अधिक क्लेश किंवा श्रम सोसावे लागले तरी ते फार आहेत असें म्हणतां येणार नाहीं." खरोखर म्हटलें तर आपलें कर्तव्य किती सुगम आहे बरें! "आह्मीं न्यायानें आणि सदाचरणानें वागावें ह्याखेरीज परमेश्वर आह्मांपासून दुसरी कोणतीहि अपेक्षा करीत नाहीं."

तथापि आह्मां मानवांचें कर्तव्य जरी ह्याहून सहस्र-

१ केंपी २ मिका

पट बिकट असतें, व आपणांस मोठमोठे स्वार्थत्याग करावे लागते; फार काय सांगावें, पण ह्या जगांतील सर्व वस्तूंचा त्याग जरी करावा लागता, तरी देखील आपणांस असंतोष मानण्यास कांहीं कारण झालें नसतें. कारण आमच्या शाश्वत जीवितापुढें ह्या जगांतील आमचें वास्तव्य 'दर्यामे खसखस' ह्या म्हणीप्रमाणें अत्यंत अल्प आहे.

( श्लोक )

ग्रीष्मीं भूवरि येति जाति जलदच्छाया असंख्या जशा ।
देवा मानववशपंक्ति तुझिया नेत्रांसमोरी तशा ॥
हे सवत्सरसंघ जे पळुनियां जाती क्षणांचे परी ।
नामें उज्ज्वल भूवरी चमकुनी जाती, लया सत्वरी ॥

—आर्येंद्र

आपण परमेश्वराची प्रार्थना अत्यंत शुद्ध मनानें केली पाहिजे.

( श्लोक )

असासि तू मम सन्निध सर्वदा । स्मरुनि वर्तन ठेविन हे सदा ॥
धरिन जो पथ मी करिं जी क्रिया । तवचि कारणि ती नच माझिया ॥ १

—थोरो

खालील प्रसिद्ध श्लोकाचाहि भावार्थ तोच आहे.

( श्लोक )

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा । बुद्ध्यात्मना वा प्रकृतिस्वभावात ॥
करोति यद्यत्सकलं परस्मै । नारायणायेति समर्पये तत् ॥ १

—महाभारत

अशा रीतीनें जो वागेल त्याला कर्तव्यसाधनाशिवाय दुसऱ्या फळाची अपेक्षा मुळींच वाटणार नाहीं, व त्याच्या हातून नेहमीं सत्कर्मच घडेल. अशा प्रकारची बुद्धि असणें

ह्यांतच खरा आनंद आहे. म्हणून धर्माचें फल केवळ परलोकींच मिळावयाचें आहे असें समजूं नये. तें मिळण्याची सुरवात ह्या जगांतच तात्काळ होते. आपणा प्रत्येकाच्या अंतःकरणामध्यें आनंदाचा व धर्मबुद्धीचा जिवंत झरा आहे. पण तो गढूळ होऊं न देणें हें आपलें काम आहे. "आह्मां मर्त्यांस परमेश्वरानें कांहीं अशा मनोवृत्ति दिल्या आहेत कीं त्या भूलोकींच्या नसून स्वर्गींच्याच आहेत असें वाटतें." त्यांचा लोप न होतां विकास होत जाईल असें वर्तन आपण ठेविलें पाहिजे.

सिसिरोची पुढील उक्ति अगदी यथार्थ आहे:—"सज्जनांशिवाय दुसऱ्या कोणासहि खरें सौख्य प्राप्त होत नाहीं, व जेवढे म्हणून सज्जन असतील तेवढे सर्व सुखी असतात, हे दोन सिद्धांत जर खरे असतील तर तत्त्वज्ञानासारखा अभ्यास करण्यास योग्य असा दुसरा विषय नाहीं; व सद्गुणासारखी दैविक वस्तुहि दुसरी नाहीं हें उघडच आहे.

ह्या जगांत मनुष्यास पुष्कळ प्रकारचे मोह पडण्याचा संभव आहे. तथापि ते सर्व त्याच्या शक्तीच्या आटोक्यांतले आहेत. परमेश्वरानें मनुष्यास मोहांतून सुटण्याचा मार्ग खुला ठेविला आहे.

तथापि मनुष्याच्या मनाचे ठिकाणीं बरीच दुर्बलता आहे ह्यांत शंका नाहीं. म्हणून आपलें आचरण निष्पाप आणि निष्कलंक रहाण्याकरितां आपण नेहमीं परमेश्वराचें ध्यान आणि चिंतन केलें पाहिजे. आपणास एकाद्या भयंकर ठिकाणीं जाण्याचा प्रसंग आला तर आपण आप-

त्याबरोबर कोणी तरी सोबती घेऊन जातों. आपल्याबरोबर जर एकादा सद्गुणी मित्र असेल तर त्याच्या सहवासामुळें षड्रिपूंच्या तडाक्यांतून आपलें संरक्षण होण्याचा संभव असतो. मनुष्याच्या सोबतीपासून जर एवढी मदत होते, तर प्रत्यक्ष परमेश्वराच्या सान्निध्यापासून केवढी होईल बरें! सर्व कालीं व सर्व ठिकाणीं आपणांस परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणाचा सहवास मिळण्याजोगा आहे? परमेश्वर सर्वव्यापी आणि सर्वसाक्षी आहे. तथापि त्याच्या सान्निध्यापासून आपलें आचरण निष्कलंक ठेवण्याच्या कामीं मदत व्हावी अशी इच्छा असेल तर तो जवळ आहे ही गोष्ट आपण नेहमीं ध्यानांत वागविली पाहिजे. व ह्या हेतूनें ईश्वराचें ध्यान व भजन प्रत्येक मनुष्यानें केलें पाहिजे.

( श्लोक )

बाध्यमानोऽपि मद्भक्तो । विषयैरजितेन्द्रियः ॥
प्रायः प्रगल्भया भक्त्या । विषयैर्नाभिभूयते ॥ १
यथाग्निः सुसमिद्धार्चिः । करोत्येधांसि भस्मसात ॥
तथा मद्विषया भक्तिरुद्धवैनांसि कृत्स्नशः ॥ १

टीकाः—

( ओंव्या )

माझ्या ठायीं अनन्य प्रीति । सप्रेमयुक्त भजन स्थिति ॥
ऐशिया भक्तासी विषय बाधती । हे व्याख्यानस्थिति केंवी घडे ॥१
माझ्या ठाया अल्पही भक्ति । श्रद्धायुक्त प्रवेशल्या चित्तीं ॥
संचित क्रियमाण पापपंक्ती ॥ होय जाळिती निःशेष ॥ २

—एकनाथी भागवत

आपणावर एकादा दुःखाचा प्रसंग आला, अथवा आपल्या हातून एकादा दोष घडला असून त्याबद्दल आप-

णांस अनुताप झाला, तर परमेश्वरास मनोभावें शरण जाणें व त्याच्या नामाचा गजर करणें ह्यासारखी मनुष्याचें समाधान करणारी कोणतीहि गोष्ट नाहीं. अशावेळीं नास्तिक म्हणवून घेणारांस कोणत्या प्रकारें समाधान होत असेल याची कल्पना करितां येत नाहीं.

आपण आपलें वर्तन अगदीं निर्दोष ठेवण्याविषयीं यत्न केला पाहिजे. अशा प्रकारच्या प्रयत्नाचें फल फार मोठें आहे, व तें तात्काळ मिळतें. आपल्या बहुतेक दुःखांस आपणच कारण असतों. आम्हीं आपल्याच सावलीला भीत असतों, व आपल्याच स्वप्नांनीं अस्वस्थ होत असतों. पण आपण यत्न केला तर शांतीचा लाभ होणें दुर्घट नांहीं; आपणांस शांतिसुखाचा लाभ होत नसेल तर तो आपलाच दोष आहे असें म्हटलें पाहिजे. धर्माच्या योगानें आपणांस ह्या जगांत देखील विश्रांति, निर्भयता, शांति आणि निश्चिंतपणा हीं प्राप्त होतात. स्वर्ग स्वर्ग म्हणून जो म्हणतात तो केवळ पुढेंच मिळावयाचा आहे असें नाहीं. तो आपल्या हृदयांतच आहे.

( ओंव्या )

विषम भोग आल्याहि जाण । निजशांति धरूनि संपूर्ण ॥
सुखें वर्तती साधुजन । विवेकसंपन्न क्षमावंत ॥ १
हाता आलिया निजशांति । संसार बापुडें तें किती ॥
तेचि शांतीची स्थिति । स्वयें श्रीपती सांगत ॥ २

—एकनाथी भागवत

आपणांस ह्या जगामध्यें ईश्वराच्या कृपेनें कोणत्याहि प्रकारचें भय बाळगावयास नको. कारण,

( ओंव्या )

सद्भावें करितां माझी भक्ति । भक्तांसी नव्हे विघ्नप्राप्ति ॥
भक्तसाह्य मी श्रीपति । अहोराती संरक्षी ॥ १
करितां भगवद्भजन । भक्तांसी बाधीना विघ्न ॥
ते भक्तीचें महिमान । स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥

—एकनाथी भागवत

त्याचप्रमाणें आपणांस सारा दिवस काळजी करीत बसण्याचें कांहीं कारण नाहीं. " आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांकडे पहा. ते कधी पेरणी करीत नाहीत, कापणी करीत नाहीत किंवा धान्य सांठवीत नाहीत. तथापि परमेश्वर त्यांना अन्न देतो. आपली मनुष्यांची स्थिति त्यांच्याहून किती तरी चांगली आहे! आपणांस वस्त्रप्रावरणांकरितांहि काळजी करावयास नको. रानांतील फुलझाडांकडे पहा! तीं विणीत नाहीत किंवा श्रम करीत नाहींत. पण त्यांना जो सुंदर पोषाख असतो तसा मोठ्या सार्वभौम राजासहि मिळत नसेल. जें आज आहे तर उद्यां चुलीत पडावयाचें, अशा रानांतील गवताला देखील जर परमेश्वर उंची पोषाख देतो, तर तो तुला वस्त्रें देणार नाहीं काय? काय तुझी अश्रद्धा ही!

( श्लोक )

येन शुक्लाकृता हंसा । शुकाश्च हरितीकृताः ॥
मयूराश्चित्रिता येन । स ते वृत्तिं विधास्यति

—हित[illegible]

**भावार्थ**—ज्यानें हंसांस पांढर[illegible]
[illegible]ग दिला मोरांस चित्रविचित्र र[illegible]
अन्नवस्त्राची तजवीज खातरीनें क[illegible]

१ मेट

आपण परमेश्वराची भक्ति करावयाची ती द्रव्य, वैभव वगैरे मिळण्याच्या हेतूनें न करितां, केवळ निष्काम-बुद्धीनें केली पाहिजे. तरच तिच्यापासून आपलें कल्याण होईल.

( ओंव्या )

लवण जीवना आलें शरण । तें तात्काळ झालें जीवन ॥
ऐसा अनन्य मज जो शरण । तो मीचि जाण होऊनि ठाके ॥ १
मज रिघोनियां शरण । जो वांछी महिमा सन्मान ॥
तो गुळा आंतील पाषाण । केवळ जाण गुळ दगडु ॥ २
जो कां गुळें माखला दगडु । तो चाटितां वरिवरि दिसे गोडु ॥
शेखीं परिपाकीं निवाडु । अति जडु कठिणत्वें ॥ ३

—एकनाथी भागवत

ह्या संसारांत तीन प्रकारचे लोक पहाण्यांत येतात. त्यांचा स्वभाव ज्या गुणांवर अवलंबून असतो, ते गुण तीन आहेत. कोणताहि मनुष्य घेतला तरी त्याच्या मनावर ह्या तिहींपैकीं कोणत्या तरी एकाचा विशेष अंमल आहे असें दिसून येईल. ते गुण सत्त्व, रज, आणि तम, हे होत. त्यांचीं लक्षणें एणेप्रमाणें:—

**सत्त्वगुणः—**

( ओंव्या )

वाढलिया सत्त्वगुण । चित्त सदा सुप्रसन्न ॥
कामक्रोधाचें स्फुरण । सर्वथा जाण स्फुरेना ॥ १
जें चित्त [illegible] विषयांलागीं । तें उदास होय विषयभोगीं ॥
[illegible]ीं । तें विषयसंगीं गुंतेना ॥ २
[illegible]त्थ । पद्मिणीपत्र अ[illegible] ॥
[illegible] । विषयातीत मद्बोधें ॥ ३
[illegible] । तें मरण आल्या देहापाशीं ॥

भय नुपजे सात्विकामी । मत्पदासी विनटले ॥ ४
इंद्रियनिग्रहो यथोचित । जो शमदमां सदा क्रीडत ॥
शांति वसे जया आंत । तो जाण निश्चित सात्विक ॥५

**रजोगुणः—**

( ओंव्या )

खवळलिया रजोगुण । विषयचिंता अति दारुण ॥
कर्मेंद्रियां क्रियाभरण । नाना परीचें जाण उत्पादी ॥
शरीर असतां स्वस्थ । मन चिंतातुर अति भ्रांत ॥
वाढविता विषयस्वार्थ । दुःखी होत सर्वदा ॥ २
जे सदा फळकामें कामुक । वांछीत स्वर्गसुख रसभोग सुख ॥
द्रव्यार्थी अतिदांभिक । रजोगुणी लोक ते जाण ॥ ३

**तमोगुणः—**

( ओंव्या )

जागाचि परि निदेला असे । कर्म करी स्फुरण नसे ॥
जेंवि कां आभाळांत अंवसे । राती चाले जसें आंधळें ॥ १
सकळ शरीराचा गोळा । होय आळसाचा मोदळा ॥
हा तमोग्लानीचा सोहळा । पडळ ये डोळां चित्तवृत्ति ॥ २
यापरी तमाचें बळ होय । तें मनातें अज्ञान खाय ॥
ते काळीं मन नष्टप्राय । मूर्छित राहे गूढत्वें ॥ ३

**—एकनाथी भागवत**

ह्या तीन गुणांपैकीं सत्त्वगुण हाच श्लाघ्य होय. व तोच मनुष्याची उन्नति करणारा आहे. तमोगुण हा सर्वांत निंद्य आहे. व त्याचें उत्तम उदाहरण कुंभकर्णाच्या इतिहासावरून नजरेस येतें. रजोगुणापासूनहि मनुष्यास शेवटीं पश्चात्ताप होतो. पुराणप्रसिद्ध राजा पुरूरवा । ं अनेक वर्षें विषयोपभोगांत घालविल्यानंतर त्याला शेव काय अनुभव आला तो पहा

( ओंव्या )

नरदेहाचें उत्तमोत्तम । अमूल्य आयुष्य केलें भस्म ॥
जळो जळो माझें कर्म । निंद्य अधर्म मी एक ॥ १
नरदेहाच्या आयुष्यपुष्टि । साधक रिघाले वैकुंठीं ॥
ज्ञातें ब्रह्म होती उठाउठीं । तें म्यां कामासाठीं नाशिलें ॥२
राजे मुकुटाचे प्रतापपूर्ण । माझ्या चरणा येती शरण ॥
तो मी कामाच्या आधीन । हें निर्लज्जपण म्यां केलें ॥ ३
कामासक्त ज्याचें चित्त । त्याचे सकळहि नेम व्यर्थ ॥
आपुलें पूर्ववृत्त निंदित । अनुतापयुक्त नृप बोले ॥४

—एकनाथी भागवत

रजोगुण आणि तमोगुण जिंकून सत्त्वगुणाची वृद्धि झाली असतां मनुष्यास शाश्वतसुखाची प्राप्ति होते. सत्त्वगुणाची वृद्धि होण्याचा मुख्य उपाय म्हटला म्हणजे ईश्वरभक्तिच होय.

( ओंव्या )

नरदेह पावलिया जाण । आपणचि नव्हे ज्ञान ॥
तेथें करावें भगवद्भजन । देहाभिमान सांडुनी ॥ १
तां अनन्य भगवद्भजन । सहजें वाढे सत्त्वगुण ॥
वास्तव जाण । उपजे ज्ञान सविवेक ॥ २
र्गाचिये वृत्ति । रजतम दोन्ही झडती ॥
र्गाचिये स्थिति । अभेदभक्ति उल्हासे ॥ ३
वाचें अभेदभजन । होय स्वानंदाचें साधन ॥
या नांव बोलिजे विज्ञान । तेथें तिन्ही गुण मिथ्यात्वें ॥ ४
नरदेह जोडलिया हातीं । प्राणियांसी एवढी प्राप्ति ॥
यालागीं मनुष्यदेहीं भक्ति । अवश्य समस्तीं करावी ॥ ५
हें भागवताचें गुह्यज्ञान । मुख्यत्वें भक्तिप्राधान्य ॥
आवें करितां भगवद्भजन । स्त्रिया जन उद्धरिती ॥ ६

—एकनाथी भागवत

अशाप्रकारें भगवद्भक्ति केल्यानें मनुष्याच्या अंगीं सत्त्वगुण वाढून तो कोणत्या योग्यतेस पावतो ह्याचें एकनाथांनीं सुंदर वर्णन केलें आहे:—

( ओंव्या )

समूळ-फलाशा त्यागूनि । निर्विकल्प निरभिमानी ॥
जो लागे स्वधर्माचरणीं । तें रजतम दोन्ही जिणे सत्त्व ॥
जें भाग्याचें भरण उघडे । तें हरिकथाश्रवण घडे ॥
मुखीं हरिनाम कीर्ति आवडे । तेणें सत्त्व वाढे अति शुद्ध ॥
कां दैवें जोडल्या संतसंगति । हरिकथा श्रवण लांचावती ॥
वाचा लांचावे नामकीर्ति । अतिप्रीति अहर्निशीं ॥ ३
ऐशिया अनुवृत्ती । रजतम दोन्ही क्षीण होती ॥
सत्त्व वाढे उद्रेकवृत्ति । त्या सत्त्वाची ख्याति समूळ ऐक ॥ ४
भासकत्वें प्रकाश बहुल । विशदत्वें अति निर्मळ ॥
शिव म्हणजे शांत सरळ । सत्त्वाचें केवळ स्वरूप मुख्य ॥
सत्त्वाची सत्त्ववृत्ति । आतुडे ज्या साधका हाती ॥
ते काळींची पुरुषस्थिति । एक तुजप्रती सांगेन ॥ ६
तें विवेकाचें तारुं आतुडे । वैराग्याचें निजगुज जोडे ॥
सर्व इंद्रियां प्रकाश घडे । शिगे चढे स्वधर्म ॥ ७
ते काळीं जन जाण अधर्मता । सर्व अभिमान असत्यता ॥
बलात्कारेंहि शिकवितां । न करी सर्वथा अधर्म ॥ ८
निकट असतां दुःखसाधन । सात्त्विक सदा सुखसंपन्न ॥
बलात्कारें क्षोभवितां मन । सात्त्विक जाण क्षोभेना ॥ ९
ऐशिया निजसत्त्व दृष्टी । सुखदुःखा येतां भेटी ॥
त्यासी स्वानंदें कोंदाटे सृष्टि । शुद्ध सत्त्वपुष्टि या नांव ॥

अशाप्रकारची वृत्ति ज्यांची असेल त्यांना इंग्रजी कवींचीं पुढील वचनें लागू पडतील:—

( श्लोकार्ध )

ज्या ज्या स्थलावरुनिया प्रभुदृष्टि जाई
तें तें सुधांस गमतें सुखशांतिदायी ॥

( श्लोक )

जो जो असे कुशल तो करु सत्कृतीतें
तच्चिंतनींच दवडो न अहर्निशातें ॥
ऐशापरी मरण जीवित आणि काल ।
आनंदरूपचि तयाप्रति भासतील ॥ १

—किंग्स्ले

सरते शेवटीं, लेखणी खालीं ठेवण्यापूर्वीं मयूरकवीच्या शब्दांनीं परमेश्वराची प्रार्थना करून हें पुस्तक पुरें करितों.

( श्लोक )

सुसंगति सदा घडो सुजनवाक्य कानीं पडो ।
कलंक मतिचा झडो विषय सर्वथा नावडो ॥
सदंघ्रिकमळीं दडो मुरडितां हटानें अडो ।
वियोग घडतां रडो मन भवच्चरित्रीं जडो ॥ १
न निश्चय कधीं ढळो कुजनविघ्नबाधा टळो ।
न चित्त भजनीं चळो मति सदुक्तमार्गीं वळो ॥
स्वतत्त्व हृदया कळो दुरभिमान सारा गळो ।
पुन्हां न मन हें मळो दुरित आत्मबोधें जळो ॥ २